# श्यामसुंदर

लेखक

श्रीयुत श्रीपाद कृष्ण कोल्हटकर,

बी. ए., एल्एल्. बी.

प्रथमावृत्ति–१९२५

आपटे आणि मंडळी,

कोरेगांव (सातारा).

किंमत २॥ रुपये

# प्रकाशकाचें निवेदन

प्रस्तुत कादंबरी प्रकाशित करण्याचा मान श्रीयुत तात्यासाहेब कोल्हटकर यांनीं आपलेपणानें मला दिला, याबद्दल मला खरोखरीच अभिमान वाटतो. या कृपेबद्दल मी त्यांचा ऋणी आहे.

प्रस्तुत पुस्तकांतील विषय अत्यंत महत्त्वाचा पण वादग्रस्त आहे. लेखकानें त्यासंबंधीं केलेलें विवेचन सर्वांना पटेलच असें मला वाटत नाहीं, आणि तशी मी आशाही करीत नाहीं. एवढें खास आहे कीं, प्रस्तुत कृति लेखकाच्या कीर्तींत भरच घालील.

ही कादंबरी मला आवडली आहे त्याचप्रमाणें कित्येक वाचकांना ती अत्यंत आवडेल. ज्यांना तिच्यांतील विचारसरणी रुचणार नाही, त्यांना निदान कथानक व करुणरस तरी खास रुचेल, अशी मला उमेद वाटते.

कादंबरीचा शेवट इतका करुणरसोत्पादक नको होता, असें कित्येक सहृदय मित्रांचें मत पडलें; पण हा प्रश्न लेखकाच्या प्रतिभेच्या स्वाधीनचा असल्यामुळें त्यांत ढवळाढवळ करणें इष्ट नाहीं असें मला वाटतें व वाचकांनाही तसेंच वाटेल अशी आशा आहे.

हस्तचित्रापेक्षां फोटो घालण्याची योजना कलेच्या व सौंदर्याच्या दृष्टीनें विशेषशी पथ्यकर नसली तरी चित्रकलेची अब्रु सांभाळण्याच्या इच्छेनेंच हा नवा मार्ग धरला आहे. प्रस्तुत पुस्तकांतील फोटो महाराष्ट्र फिल्म कंपनीचे मालक व माझे मित्र श्री० बाबुराव पेंटर यांच्या कृपेनें मिळाले. त्याबद्दल त्यांचे व त्यांच्या फिल्म कंपनीतील नटांचे मी मनापासून आभार मानतो.

पुस्तक प्रकाशनाच्या धंद्यास चांगल्या छापखान्याच्या सहाय्याची फारच आवश्यकता असते. ती बाब विजय प्रेसचे मालक श्री० आप्पासाहेब गोखले यांनीं धंदेवाईकाच्या दृष्टीनें नव्हे तर मित्रप्रेमानें भागविली आहे, याबद्दल ते केव्हांही स्तुतीस पात्र आहेत. विजय प्रेसकडे काम दिल्यानंतर मला त्याबद्दल कांहींही पहावें लागलें नाहीं. काम कसें झालें आहे तें वाचकांपुढें आहेच. अर्थात् येथें पैशाचा प्रश्न नसून प्रेमाचा आहे. मग आभाराचें प्रदर्शन कशाला ?

कोरेगांव, जि० सातारा. }                                ना. ह. आपटे.

पुढील तीन ग्रंथ

१ बनारसी बोरें

२ संसारांत पडण्यापूर्वी

३ बंगालचे अलंकार

लवकरच प्रसिद्ध होतील.

आपटे आणि मंडळी

कोरेगांव ( सातारा ).

# श्यामसुंदर



## प्रकरण पहिलें

## बाल्य



महाराष्ट्रांत पेशवाई नष्ट होऊन इंग्रजी अमल सुरु झाला तेव्हां सार्वजनिक जीवनांतल्याप्रमाणे कौटुंबिक स्थितींतही क्रांति घडून आली. पूर्वी सामान्य कुटुंबांतील पुरुषांचें शिक्षण जवळ जवळ लिहिण्यावाचण्यापुरतेंच मर्यादित असल्यामुळें उभयतां संसाराचा गाडा आनंदानें हांकीत असत. एखादा पुरुष शास्त्री किंवा पंडित असला तरी त्याचे धार्मिक व सामाजिक विचार पत्नीच्या समजुतीहून विशेष भिन्न नसल्यामुळें त्यांच्या सांसारिक सुखांत अंतर पडण्याचें कारण नसे. सांप्रत काळीं अनेक पुरुषांस त्यांच्याइतक्या किंवा त्यांच्याहून किंचित् कमी शिक्षणाच्या अर्धांगी मिळूं लागल्यामुळें त्याच स्वरूपाचें नसलें तरी तितक्याच प्रमाणाचें कौटुंबिक सुख मिळूं लागलें आहे; व तें सुख कांहीं कुटुंबापुरतेंच मर्यादित न राहतां उत्तरोत्तर अधिकाधिक क्षेत्र व्यापीत जाणार अशीं स्पष्ट चिन्हें दिसत आहेत. पण या दोन काळांतील मध्यंतरींच्या ७०–७५ वर्षांच्या काळांत संसाररथाचीं चक्रें अशीं समसमान नसत. त्यांपैकीं एक अस्सल पेशवाई घाटाचें, लहान, जड व ओबडधोबड असे तर दुसरें अस्सल इंग्रजी नमुन्याचें, मोठें, हलकें व सुबक असे. यामुळें त्यांच्या गतींत वैषम्य उत्पन्न होऊन रथास पदोपदीं

धक्के बसत, चक्रात स्नेहाचें वास्तव्य असताही त्यांची नेहमी कुरकूर चाले, व आक्रमावयाचा मार्ग वाकडा किंवा विषम नसताही कधीकधीं रथास बाजूच्या खड्डयात पडण्याचा प्रसंग येई.

बळवंतराव व सुंदराबाई यांचें जोडपें अशा विषम जोडप्यांपैकींच असे. बळवंतरावांचे वडील जुन्या मार्गांतील होते, तरी त्यांनीं मुलाला नवीन तऱ्हेचें शिक्षण देण्यांत मुळींच कसूर केली नव्हती. पंचविशीच्या आंतच बळवंतरावांनीं एम्. ए., एल्एल्. बी. होऊन महाराष्ट्रांतील अत्यंत सुविद्य इनामदारांत आपली गणना करून घेतली. त्यांच्या विद्वेवर व कर्तबगारीवर खूष होऊन सरकारनें त्यांजकडे गांवच्या फौजदारी खटल्यांचें काम दिलें. त्या काळीं स्त्री-शिक्षणाची महती नसून उलट कुचेष्टाच होत असल्यामुळें सुंदराबाईंस माहेरीं काय किंवा सासरीं काय, सामान्य लिहिण्या-वाचण्याचेंही शिक्षण मिळालें नाहीं. कामाच्या गर्दीमुळें बळवंतरावास बायकोच्या शिक्षणाकडे लक्ष्य देण्यास सवड होत नसे. पुढें पुढें ते सामाजिक सुधारणेंत मन घालूं लागले. परंतु त्या काळच्या सामाजिक सुधारकांचा बहुतेक उत्साह प्रतिपक्षाशीं वादविवाद करण्यांतच खर्च होत असल्यामुळें स्वतःच्या विचारास घरच्या घरींही मूर्त स्वरूप देण्यास त्यास फावत नसे. बळवंतराव एकंदर सुधारकवर्गास अपवाद नसल्यामुळें सुंदराबाई विद्येच्या बाबतींत कोऱ्या करकरीतच राहिल्या.

या दंपत्याचे स्वभावाच्या व समजुतींच्या बाबतींतही फारसें जमण्यासारखें नव्हतें. बळवंतरावांचा स्वभाव बुद्धिप्रधान तर सुंदराबाईंचा भावनाप्रधान होता. शोकाचा कडेलोट जरी झाला तरी बळवंतरावांच्या डोळ्यांस टिपूस येत नसे; पण दुसऱ्याचें येवढेसें दुःख दिसलें, कीं सुंदराबाईंचें मन घाबरें होऊन डोळे डबडबून जात. बळवंतराव प्राण गेला तरी आपल्या तत्त्वापासून बालाग्रही ढळावयाचे नाहींत; उलट सुंदराबाई वेळप्रसंग पाहून आपला हेका लागलीच सोडून देण्यास तयार होत. बळवंतराव कर्तव्यापुढें प्रेमास भीक घालीत नसत, तर सुंदराबाई प्रेमापुढें एखादे प्रसंगीं कर्तव्यासही मोजीत नसत. बळवंतराव अत्यंत प्रखर, तर सुंदराबाई अत्यंत मृदु स्वभावाच्या होत्या. बळवंतराव एकेश्वरी मताचे होते तर सुंदराबाईंस तेहतीस कोटी देवही अपुरेच वाटत. त्यांचा कोल्हापुरच्या

अंबाबाईविषयीं कांहींसा पक्षपात असला तरी इतर साऱ्या देवांवर सारखाच भाव असे. बळवंतराव स्नान केल्यावर चित्तशुद्धीकरितां किंचित् काल निराकार ईश्वराचें चिंतन व भगवद्गीतेचा पाठ करीत, तर सुंदराबाई देव्हाऱ्यांतील साऱ्या देवांवर गंध, अक्षता, फुलें, बेल व तुळशी वाहण्यांत, त्यांजपुढें धूपदीप, वाती व कापूर जाळण्यांत आणि तुळशीला प्रदक्षिणा घालण्यांत दोन दोन तास खर्च करीत. निर्गुण उपासनेची त्यांना कल्पना-च येत नसे. बळवंतराव जरी रोज ओवळ्यानें जेवीत असले तरी सुंदरा-बाईच्या सोवळ्यांत कधीं अंतर पडलें नाहीं. साधुसंतांवरही त्यांचा फार विश्वास असे, मग ते कोणत्याही धर्माचे असोत. त्याजवरून वैराग्या-प्रमाण फकीरांनाहि दानधर्म करण्यांत येई, व त्या जत्रेस जात तितक्याच हौसेनें एखाद्या पीराचा उरुस पहाण्यासही जात. त्यांची एकही एकादशी कडकडीत उपोषणावांचून व एकही द्वादशी ब्राह्मण-सवाष्णींवांचून जात नसे. बळवंतराव त्यांच्या धर्मसमजुतीच्या फारसे वाटेस जात नसल्यामुळे त्यांचे नेमधर्म, उपासतापास सारें कांहीं बिनबोभाट चाले. सुंदराबाईही नवऱ्याच्या वाचन लेखनादि व्यवसायांत कधीं व्यत्यय आणीत नसत. एखादे वेळीं बळवंतरावांच्या वाचनांत एखादी हृदयंगम कल्पना येऊन त्यांनीं ती आनंदाच्या भरांत सुंदराबाईस सांगितलीच तर त्या ती जांभई देत ऐकत असत; व नवऱ्याची मर्जी पाहून त्यांनीं तिजबद्दल पसंती दर्शविलीच तर आळोखेपिळोखे देत दर्शवीत असत.

पत्नीवर बळवंतरावांचें मनापासून प्रेम नसण्यास वर दर्शविलेल्या भेदाशिवाय आणखीही एक कारण असे. सुंदराबाईंचा चेहरा जरी प्रेमळ व मोहक असे तरी वर्णानें त्यांची काळ्यासावळ्यांतच जमा असे. त्यांच्या वर्णावरून व बुद्धिमांद्यावरून बळवंतराव त्यांस कधीं कधीं थट्टेनें शूद्र म्हणत असत. प्राचीन काळच्याप्रमाणें सांप्रत काळींही ब्राह्मण नवरा व शूद्र बायको अशीं विजातीय दंपत्यें असूं शकतात असें बळवंतरावांनीं म्हटल्यास सुंदराबाईस त्या वाक्याचा विशेष उमज पडत नसे, व म्हणून रागही येत नसे. त्यांच्या दुःखाप्रमाणें रागही बहुधा अश्रूंच्याच रूपानें प्रकट होत असे. त्यांच्या लोण्यासारख्या मनाला शोकाची किंवा कोपाची आंच थोडी जरी लागली तरी तें भराभर वितळत असे.

वयास पंचवीस वर्षे झाली तरी सुंदराबाईस अपत्य होण्याचें चिन्ह दिसेना. त्या काळी मुलीचे लग्न आठव्या नवव्या वर्षी होऊन चौदाव्या पंधराव्या वर्षींच तिला मातृपदाची प्राप्ति होत असे. तो मान फार झाले तर पांचसहा वर्षे लांबला तर लांबे. पण ही उत्तर मर्यादाही उलटून सुंदराबाईस पांचसहा वर्षे गेली होती. अशा स्थितीत त्यांचे मन अस्वस्थ होऊ लागल्यास नवल नाही. त्यांच्या देखत बायका आपापसांत कुजबुजू लागल्या, म्हणजे त्यांना वाटे की त्यांची आपल्या वांझपणाबद्दल कुचेष्टाच चालली आहे. एखादी बाई आपल्या बाळाला मांडीवर घेऊन खेळवू लागली की त्या देखाव्याकडे त्या आशाळभूतपणाने पाहू लागत. एखादी लेकुरवाळी स्त्री एका अपत्यास दूध पाजीत, दुसऱ्यास भात भरवीत व तिसऱ्यास थोपटीत बसली म्हणजे तिचा त्यांना हेवा वाटे; आणि या छबकड्यांपैकी एखादे आपल्या वाट्यास आले असते तर आपण किती सुखी झालो असतो असा विचार त्यांच्या मनात खेळू लागे. बळवंतरावाच्या सुधारकी विचारांची अजून त्यांना पुरती ओळख नसल्यामुळे आपला पति पुत्रप्राप्तीसाठी दुसरे लग्न तर करणार नाहींना अशीही शंका त्यांच्या मनांत येत असे, व अशा वेळी त्यांची स्थिति फारच करुणास्पद होई. कुटुंबपोषण हा जसा पुरुषाचा विशिष्ट अधिकार, तसा कुटुंबविस्तार हा स्त्रियांचा विशेष हक्क असतो, व कुटुंबाचा योगक्षेम हातून नीटपणे चालत नसल्यास पुरुषास जसे जिणे लाजिरवाणे वाटते तसे स्त्रियासही घर मुलांबाळांनी गजबजून सोडण्याचे सामर्थ्य अंगी नसल्यास वाटते. गृहिणी गृहाचे जसे भूषण तसे अपत्य तिचे भूषण असते, अर्थात् ते विभूषणाचे भूषण असते. शिशु मातेचे स्तनपान करीत असता मौक्तिकहारापेक्षा, कटीवर असतां कंबरपट्ट्यापेक्षां व ओचे धरून पायाशीं लोळण घेत असतां पैजणापेक्षा मूल्यवान् अलंकार तिला वाटत असतो. गृहिणीस गृह म्हणण्याचा परिपाठ आहे; पण या लाक्षणिक संकेतापेक्षां अपत्यास माता म्हणणे किती तरी सत्यास धरून होईल! गृहिणी घरात आल्यावर तिचा त्याजवर अमल चालू लागतो; व अपत्य मातेच्या उदरांतून बाहेर पडल्यावर त्याचा तिजवर चालू लागतो. पण गृहिणी गृहांत प्रवेश करण्यापूर्वी त्याचा व तिचा कांही संबंध नसतो;

उलट अपत्य बाहेर येण्यापूर्वी मातृदेहाचाच भाग असते. शरीरानें अलग झाल्यावरही ते तिला जीव की प्राण वाटावे यांत आश्चर्य नाहीं.

सुंदराबाईनें अनेक देवांस व पीरास नवस केले; प्रदक्षिणा घालून घालून मारुतीचा पार झिजविला; किती तरी साधूंच्या चरणी लोटांगणें घालून त्यांचे आशीर्वाद मिळविले; सोळा सोमवार आदिकरून अनेक व्रतें-वैकल्ये केली व प्रसाद भक्षण केले; पण त्यास यश येण्याचे चिन्ह दिसेना. इकडे बळवंतराव पूर्ववत् लेखनवाचनावरच संतुष्ट असत. ते पाहून पुरुषाना मायेचा मुळींच ओलावा नसतो हे सुंदराबाईचे मत दृढ होई.

अखेरीस सुंदराबाईस दिवस गेल्याचीं चिन्हे दिसू लागलीं. आपला संशय खरा आहे अशी तिची खात्री होताच तिने ती बातमी हर्षाने पतीच्या कानावर घातली. बळवंतरावासही हा अनुभव नवीनच होता. त्यानीं आनंदाच्या भरात सुंदराबाईस बाणभट्ट कादंबरीतील विलासवतीचे गर्भिणी-स्थितींतील वर्णन वाचून व स्पष्ट करून दाखविले. त्यास उत्तरादाखल तिने एक दीर्घ जांभई दिली. पण या खेपेस त्यानीं ती अरसिकपणाचें लक्षण म्हणून मानिली नाहीं.

पूर्णमास भरल्यानंतर सुंदराबाईस पुत्ररत्न झाले. इतक्या नवसांसायासानीं मुलगा झाल्यावर तिचा आनंद काय विचारावा! फार वर्षांपासून पुत्र-मुखदर्शनासाठीं उत्सुक झालेल्या तिच्या डोळ्यांचे पारणे फिटले. एखादा अलौकिक चमत्कार जितक्या कौतुकाने दाखवावा तितक्या कौतुकाने ती त्याला प्रत्येकास दाखवू लागली, व त्याजकडून त्याचा सत्कार तितक्याच कौतुकाने न झाल्यास हिरमुसली होऊ लागली. तिने त्याला दूध पाजण्याकरितां हृदयाशी धरिले तेव्हां त्या हृदयातून पाझरणारा आनंद दुधाइतकाच विपुल होता. त्याचे रडणे ऐकून तिच्या हृदयाचे पाणी पाणी होऊ लागले. त्याचे वास्तव्य तिच्या बाजेवरच होते, म्हणून तिला त्याजकडे सारखे टक लावून पहातां येत असे. मांजराने मुलावर झडप घालून त्याला कांहीं इजा केली नाहींना हे पहाण्याकरितां ती रात्रीतून दहादहादां उठू लागली.

जन्मल्यानंतर कांहीं दिवस मुलाचे तोंड अव्यक्त स्वरूपाचें असतें. त्यास तोंडवळ्याचें व्यक्त स्वरूप आलेलें नसतें. त्याचे वाटेल त्यानें वाटेल

त्या तोंडाशीं सादृश्य जुळवावें. सुंदराबाईस आपल्या मुलाच्या तोंडांत बळवतरावांच्या चेहऱ्याशी व बळवतरावांस त्यांत ग्लॅड्स्टन, इमर्सन इत्यादि प्रसिद्ध पाश्चात्य पुरुषांच्या चेहऱ्याशी साम्य दिसू लागलें. बळवतरावाची दृष्टि विशेषकरून डोक्याच्या आकाराकडे असे तर सुंदराबाईची ओठाकडे असे. मुलानें जांभई देऊन तोंडाचा कितीं जरी विस्तार केला तरी तें लहानशा बोळक्यासारखें चिमकुलें दिसे, व त्याच्या वळलेल्या मुठी उघडून हाताचे पंजे पसरल्यास ते केळफुलाच्या पारीतील फणीसारखे नाजूक दिसत. वीस वर्षांपूर्वी सुंदराबाई जी बाहुली प्रेमानें पोटाशीं धरीत असे तीच सजीव होऊन आल्यासारखी तिला वाटूं लागली.

मुलाच्या तोंडवळ्यासंबंधानें जसा पतिपत्नींमध्यें मतभेद होई तसा नांवाबद्दलही होऊं लागला. बळवतरावांचा ओढा बंगाली नांवाकडे असे; पण सुंदराबाईस तीं फारच बोजड वाटत. तिला मुलाच्या चिमुकल्या मूर्तीइतकेंच आखूड नांव पाहिजे होतें. अखेरीस त्याच्या वर्णावरून बळवंतरावानीं 'श्याम' हें नांव सुचविल्याबरोबर तिनें त्याला तावडतोब रुकार दिला. यशोदेस जसा मेघश्याम कृष्ण तसाच तो तिला नव्हता का? शिवाय रामनाम जसें घ्यावयास सोपें तसेंच श्याम हेंही नांव होतें. याप्रमाणें उभयतांच्या मतानें 'श्याम' हें नांव ठरून तेंच त्याला बारश्याचे दिवशीं ठेवण्यांत आलें. त्याच दिवशीं त्याची पाळण्यांत स्थापनाही झाली. त्या प्रसंगीं तिच्या शेजारणींनीं आपल्या वेड्यावाकड्या सुरांत 'बाळा जोजो रे' या शब्दांनीं प्रारंभ होणारा जो प्रेमळ पाळणा म्हटला तो ऐकून तिच्या डोळ्यांत प्रेमाश्रु उभे राहिले.

त्याच दिवशीं गांवांतील प्रमुख जोश्याकडून मुलाची पत्रिका करविण्यांत आली. सुंदराबाई मुलाचें भविष्य ऐकण्यास अत्यंत उत्सुक होती. तें भविष्य तिनें स्वतः अतिशय उज्ज्वल रंगांनीं रंगविलें होतें. आपला मुलगा सर्वांत वरिष्ठ दर्जाचा सरकारी अंमलदार होऊन प्रजेवर हुकमत गाजवीत आहे, तो सातमजली हवेलींत रहात असून गाड्याघोडे उडवीत आहे, त्याच्या पदरीं अनेक नोकरचाकर असून ते त्याच्या तोंडचा शब्द ऐकण्यास सारखे झुलत आहेत, त्याच्या पंक्तीस प्रत्यहीं शें दोनशें पान जेवून उठत आहे, त्याची बायको नखशिखांत अलंकारांनीं

मढलेली असून लक्ष्मीप्रमाणे घरांत वावरत आहे, त्याचे घर आपल्या गोजिरवाण्या नातवडां-पणतवडांनी गजबजून गेले आहे, असे कल्पनाचित्र तिने आपणासमोर उभे केले होते. जोशी जे भाकीत करील त्यांत तप-शिलाचाच काय तो फरक पडावयाचा अशी तिची भोळी समजूत होती. पण जोश्याने भविष्य सांगण्यापूर्वी एक दीर्घ सुस्कारा सोडलेला पाहून तिच्या अंतःकरणास चरकाच बसला. खुनाचा आरोपी खटल्याचा निकाल ऐकण्यापूर्वी न्यायाधीशाच्या तोंडाकडे जसा केविलवाण्या दृष्टीने पहातो तशी ती जोश्याच्या तोंडाकडे पाहू लागली. अशुभ भविष्य ऐकण्यापेक्षां न ऐकलेले पुरवले असे तिला वाटू लागले. तिचे मनोगत जाणून जोशी घाईघाईने म्हणाला, "इतके घाबरण्याचे कारण नाही. मुलाचा स्वभाव गोड व मनमिळाऊ होणार असून तो अत्यंत लोकप्रियही होईल. (येथे सुंदरा बाईने मुलाचा मुका घेतला.) पण त्याजपासून मातापितरांस मात्र फारसे सुख होणार नाही. त्याचा त्यास दीर्घ कालपर्यंत वियोग होणार आहे." हे ऐकून सुंदराबाईने मुलास घट्ट पोटाशी धरिले; जणु काय कोणी त्याचा वियोग घडविण्याकरितां त्यास तिजपासून हिसकावूनच घेत आहे! बळवतराव जवळच होते; ते म्हणाले, "यांत भिण्यासारखे आहे काय? जरी हे भविष्य खरे ठरले तरी त्यावरून मुलास विद्याभ्यासाकरितां देशांतरी जावे लागणार येवढेच निघते की नाही? ते तर आपणास पाहिजेच आहे. विद्या शिकल्याशिवाय मुलगा वैभवाला तरी कुठून चढणार? शिवाय हीं भविष्ये कधी खरी होतात की काय? तुझ्या वेड्या समजुतीकरितां म्हणून मी जोशीबुवांस तसदी तरी दिली. मनुष्याचे भवितव्य ललाटावरील रेषांवर अवलंबून नसून डोक्याच्या आंतील मेंदूवर असते, व हातावरील रेषांवर नसून मनगटाच्या जोरावर असते." जोशीबुवा उसळून यावर कांही प्रत्युत्तर देणार होते. पण सत्तेपुढे शहाणपण नाही हे जाणून व समग्र भवितव्य ऐकविल्यास बळवतरावास जरी कांही वाटले नाही तरी बिचाऱ्या सुंदरा-बाईचे कोंवळे मन विदीर्ण होईल हे ओळखून त्यांनी पडते घेतले, व दक्षिणा घेऊन तेथून पाय काढिला. बळवतरावांनी केलेल्या युक्तिवादाने सुंदराबाईचेही तितक्यापुरते समाधान झाले. भाकीत खरे ठरले तर

आपलें बाळ थोर पदास चढेल, आणि ते खोटें ठरलें तर आपण उभयतां एकत्र नांदूं असा तिनें आपल्या मनाशी विचार केला. मात्र तिने मुलाला पाळण्यांत निजविण्याचे जें ठरविले होतें ते फिरवून त्याची पुन्हां आपल्या बाजेवर स्थापना केली. बाळ आईच्या बाहुपाशांत असतांना कोणता चांडाळ त्यांची ताटातूट करण्यास धजणार आहे ! मुलाचे अगडेटोपडे, औषधपाणी वगैरेची व्यवस्थाही ती आता गडीमाणसांवर न विसंबतां स्वतः करूं लागली.

उषेच्या उदयापूर्वी अस्पष्ट दिसणाऱ्या वस्तु उषःकालीं ज्याप्रमाणें स्पष्ट दिसूं लागतात त्याप्रमाणे बाळंतिणीच्या खोलींत कोंडलेले ते अस्पष्ट चेहऱ्याचे मूल हळूहळू उजेडांत येऊ लागल्यामुळेच की काय, त्याच्या चेहऱ्यास व्यक्तता येऊ लागली. त्याच्या अंगास असलेल्या सुरकुत्या नाहीशा होऊन त्यात बाळसे भरू लागले. त्याची चचल दृष्टि स्थिर होऊ लागली. हळूहळू ते मातेस ओळखावयास लागून तिजकडे टक लावून पाहूं लागले. मूल आपणास ओळखते हे पाहून सुंदराबाईचा हर्ष त्रिभुवनांत मावेना. माझं छकुडं, माझं मकुड इत्यादि अनेक वेड्यावाकड्या नावांनी ती त्याला आळवूं लागली. प्रेमाच्या भरात मुलास मुलीच्या नांवाने व मुलीस मुलाच्या नांवाने संबोधण्याचा लेकुरवाळ्या बायाचा जो प्रघात असतो त्याला अनुसरून ती कधीकधी आपल्या मुलाला 'श्यामी' या नावाने संबोधूं लागली. अशा प्रसंगी उभयतांचा पुढे मागे होणारा वियोग व त्याच्या स्त्रीलिंगी नावाने सूचित होणारी असहायावस्था याच्या कल्पनांचा संगम होऊन तिच्या वात्सल्यास फारच भरते येई; व गोड पक्वान्न अधाशीपणाने खाणाऱ्या बुभुक्षिताप्रमाणे ती त्याच्या गोड गालाचे मटामट मुके घेई. आपले बाळ आजच्याच स्वरूपांत नेहमी रहावे असे तिला प्रत्यही वाटे; पण दुसऱ्या दिवशी ते तिला अधिकच सुंदर दिसावयास लागून ती आपली चूक मनाशीं कबूल करी. तथापि त्याच्या सौंदर्यांत भर पडण्याचा यापुढेही संभव आहे हे क्रमप्राप्त अनुमान मात्र ती तर्कशून्य माता कधीं काढीत नसे. आशावादी भावी कालाकडे तर निराशावादी भूतकालाकडे आपली आशाळभूत नजर फेकीत असतात; पण चालू क्षणांतच ब्रह्मानंद सांठविलेला आहे असे मानणारी एक प्रेमळ माताच होय.

अर्भकाचे हास्य-रुदन बहुधा भावनामूलक नसून यांत्रिक असतें. आईनें ओठाला बोट लाविले कीं त्याचे तोंड हंसरे होते, व बोट काढिलें कीं ते रडवे होते. या अकारण हास्य-रुदनावर प्रयोग करून वत्सलरसाचा आस्वाद घेतांना प्रेमळ माताही दिसून येतात. त्यांस सुंदराबाई अपवाद नव्हतीच. कधीकधीं तिने रागाचा उसना आव आणून मुलास खोटेंच रागें भरावे, व त्याने तोंड गोरेंमोरें करून रडण्याकरिता ओठ वाकडा केला कीं त्यास उगे करण्याकरिता 'ओग माझी बाई ती!' असें म्हणून उराशीं कवटाळून धरावे. रडताना मुलाच्या ओठास जी वक्रता येई ती सुंदराबाईस फारच आवडे. तिचे दर्शन होण्याकरिता मुलाला रडवावे लागे हेच काय ते तिच्यांत वैगुण्य असे. पुष्कळदां निस्सीम प्रेमही प्रेमविषयाच्या क्षुल्लक लकबींशीं सलग्न असते.

मुलाच्या अकारण रडण्याचा फायदा घेऊन त्यास वेळीं अवेळीं रडवूं पहाणारी ही आई त्यास दातांची व्यथा होताच बावुडवाण्या मुद्रेने त्याच्या अंथरुणापाशीं सारखी बसून राहिली. दाताचे दुखणे पुष्कळदां मुलाच्या जिवावरचे असते. मुलाने जन्मकाळीं आपल्या आईस ज्या प्रसव-वेदना व जे कष्ट दिले असतात त्याचा कांहींसा अनुभव दात स्वतःच्या जन्मकाळीं मुलाचा पुनर्जन्म घडवून त्यास आणून देतात. सीझरसारख्या मोठमोठ्या पुरुषानींही जन्मकाळीं आपआपल्या मातास दिला नसेल इतका त्रास हे द्विजोत्तम अर्भकास देत असतात. जुन्या नाटकांतून राक्षस-चमूतील एकएकजण पडद्याबाहेर येताना जसें थैमान घाली तसेंच मुलाचा एकएक दात हिरड्यांतून बाहेर पडताना घालीत असतो. श्यामचें दाताचें दुखणें प्रमाणाबाहेर लांबलें. त्याच्या पोटात दुधाचा थेंब ठरेना. तो मलूल होऊन तासचे तास निपचित पडून राही, किंवा सुंदराबाईकडे केविलवाण्या नजरेनें पहात राही. ते पाहून तिचा जीव गोळा होऊन वरवर येऊ लागे. आपल्या लाडक्याचा आणि आपला ऋणानुबंध इतक्या लवकरच तुटणार की काय हा भयंकर विचार तिच्या मनांतून हालेना; व आपल्या विश्वासावर निर्धास्तपणे राहिलेले आपले चिमुकले मूल मृत्यूच्या अक्राळ-विक्राळ दाढेंत जाण्याच्या बेतात असता त्याला परत आणणें आपल्या हातचे नसावें या स्वतःच्या असहाय स्थितीबद्दल ती स्वतःची निर्भर्त्सना

करी. मुलाला वांचविण्याबद्दल ती डॉक्टरांच्या व वैद्याच्या काकळुती करी, आणि त्यांनीं पाठविलेल्या बाटल्यांत व पुड्यात जणु काय आपल्या मुलाचा प्राण सांठविला आहे अशा बुद्धीने ती त्यांस जपे. परंतु त्यांतील औषध बोंडल्यानें मुलाच्या पोटांत जाई त्यापेक्षाही अधिक त्वरेनें उसळून बाहेर पडतांना पाहून तिचा जीव कासावीस होई. औषधांच्या जोडीस गंडे, दोरे, ताईत बांधण्याचा व अंगारे लावण्याचा तिनें सपाटा सुरू केला, पण त्यासही यश येण्याचें चिन्ह दिसेना. आपलें निम्मे आयुष्य मुलाला देऊन उभयतांनीं बरोबरच जीवितयात्रा संपविण्याची सोय असती तर किती चांगलें झालें असतें, असाही विचार तिच्या डोक्यांत एखादे वेळीं डोकावून जाई. फार काय, पण स्वतःचें उरलेलें सारें आयुष्य मुलास अर्पण करून त्याचा चिरवियोग करून घेण्यासही ती निःस्वार्थी माउली तयार झाली असती.

याप्रमाणें महिना दीड महिना सुंदराबाईस अलोचन जागरणें घडवून व प्राणांतिक अवस्था भोगावयास लावून आजारानें माघार घेतली. मुलाच्या मुखावर पुन्हा टवटवी येऊन ती सुंदराबाईच्या तोंडावर प्रतिबिंबित झाली. जो दुधाचा ओघ केवळ मुलाच्या अपचनामुळें इतके दिवस तुंबून राहिला होता तो पुन्हा पूर्ववत् अविच्छिन्नपणें वाहूं लागला. गुरूच्या विद्यामृताप्रमाणें मातेचें दुग्धामृतही दात्यास व याचकास एकदम तृप्त करितें.

ज्या दातांनीं मुलाची दशा करून सोडिली होती त्याच्यावरील राग सुंदराबाई पार विसरून गेली. प्रथम प्रथम ते लाजेमुळें आपलें तोंड स्पष्टपणें दाखवीत नसत; पण ते धीट होऊन बाहेर डोकावूं लागले तसतशी त्याजमुळें श्यामच्या चेहऱ्यास विलक्षण शोभा येऊं लागली. त्याचें हास्य तर त्याजमुळें फारच खुलून दिसूं लागलें. तें पाहून सुंदराबाईस त्याचें चुंबन घेण्याचा मोह अनावर होई. अशा प्रसंगीं ते दांत तिचा कडकडून चावा घेऊन आपल्या पूर्वीच्या वैराची तिला आठवण करून देत. पण ती सहनशील आई त्या दशांचेंही कुदकळ्यांच्या स्पर्शाप्रमाणें कौतुक करून आपले ओंठ त्यांच्या प्रहाराकरितां वारवार पुढें करी. रक्तवर्ण उषेंतून बाहेर पडणाऱ्या रविकिरणाचा जसा अर्घ्यप्रदानानें सत्कार करण्यांत येतो तसा ती हिरड्यांतून नुक्तेच बाहेर पडलेल्या त्या दातांचा पयोदानानें करी. त्या शुभ्र दंतपंक्तींतून निघणारा मधुर हास्यध्वनि ऐकून तिला वाजाच्या पेटीच्या

पांढऱ्या पडद्यातून येणाऱ्या मंजुळ स्वरांनीं व्हावा तसा आनंद होई. दांतांचा उपयोग अन्नाकरिता आहे हे अजाण अर्भकास कुठून ठाऊक असणार? त्याच्या तडाख्यांत येईल त्या वस्तूवर त्यानें त्याचा प्रयोग करावा. त्यानें अंगावरील कपडे अन्नाप्रमाणें चघळावे व ताटांतील अन्न अंगावर उडवून कपड्याप्रमाणें धारण करावें. त्याचें उष्टावण इतर संस्काराप्रमाणें मोठ्या थाटानें पार पडलें होतें.

रांगणें, चालावयास लागणें इत्यादि बाबतींत मुलाची प्रगति मुंगीच्या पावलानें होत असते. पण प्रेमळ आई त्याचा कधींही कंटाळा करीत नाहीं. श्याम उताण्याचा पालथा होऊं लागल्यापासून तो त्याचा पांगुळगाडा सुटेपर्यंतची त्याची उन्नति तिला मराठ्यांच्या उत्कर्षाच्या इतिहासाहूनही मनोरंजक वाटली. तो चालतां चालतां पडूं लागल्यास ती त्याच्या हातास आपल्या बोटाचा टेका देई. आपल्या प्रियतमाला प्रत्येक पावलास आपली गरज आहे या विचारांत अनुकंपा व आत्मगौरव या दोन्ही भावांचें मिश्रण असल्यामुळें अर्भकाचें संगोपन कोमल व कठोर वृत्तीच्या मनुष्याकडून सारख्याच तत्परतेनें होत असतें.

श्याम प्रथम 'आई' या शब्दाचा उच्चार करण्यास शिकला. 'शिकला' म्हणण्यापेक्षा 'सुंदराबाईनें त्यास शिकविलें' म्हणणेंच अधिक योग्य होईल. सामान्य भाषांतील मातृवाचक शब्दांत बहुधा ओष्ठ्य वर्णांचें प्राधान्य असल्यामुळें ते अर्भकांना उच्चारावयास सोपे जातात. परंतु मराठी भाषेंतील तो शब्द आद्य स्वरांनीं घटित असल्यामुळें उच्चारावयास इतर भाषांतील शब्दांपेक्षांही सुलभ जातो. प्रेमाच्या आद्य देवतेचें नांव आद्याक्षरांनीं घटित असणेंच अत्यंत योग्य आहे. 'आई' हें नांव इतर कोणत्याही नांवापेक्षा उच्चारावयास सोपें. त्याचा उच्चार करावयास ओठांची किंवा दांतांची मुळींच जरूर नसते. 'बाबा' व 'मम' यांची पायरी त्याच्या मागाहूनची; आणि 'दादा' व 'ताई' या नांवांशीं ओळख तर दांत आल्यानंतरच व्हावयाची. मराठी भाषेंत कितीही वैगुण्यें असलीं तरी ती बोलणाऱ्या अर्भकांस जगांतील इतर अर्भकांच्या अगोदर आपल्या मातृदेवतेस नांवानें आळविणें शक्य असतें या एका गुणापुढें तीं वैगुण्यें पूर्णपणें लोपून जातात. उत्कट भावनांचे स्वाभाविक उद्गार 'आई' या शब्दाच्या रूपानें तेव्हांच बाहेर पडतात. व

आजाऱ्याच्या विव्हळण्याप्रमाणें मरणाराचा शेवटचा सुस्काराही याच शब्दांत विलीन होतो.

श्यामला इतराचे थोडथोडे अनुकरण करिता येऊं लागले तसतसें सुंदराबाई त्यास 'आई डोळे कसे करिते', 'बाबा रागावतात कसे' वगैरे अनुकरणात्मक धडे देऊन त्यांची इतरादेखत कौतुकाने कवाईत करून घेऊ लागली. या बाललीलांत मुलाच्या शेकडो पूर्वजांच्या लकबींची थोडी थोडी छटा दिसून येत असावी. कांहीं माकडचेष्टा तर त्याच्या अगदीं अव्वलच्या पूर्वजांस शोभण्यासारख्या असतात. श्यामने सुंदराबाईच्या डोळे वटारण्याची आपल्या गरगरीत डोळ्यांनीं हुबेहूब बतावणी केली कीं तिला पान्हा फुटून तिने त्यास हृदयाशी कवटाळून धरावे. बळवतरावांच्या कपाळाच्या आठ्यांच सोंग तर तो इतकें बेमालूम आणीत असे की तिची हंसता हसता पुरेवाट होत असे. बळवतरावाची विद्या जशी पुस्तकी असे तसे प्रेमही पुस्तकीच असे. श्यामला घेतल्यास तो आपले कपडे घाण करावयाचा या भीतीने त्यांनी दुरूनच टाळ्या व चुटक्या वाजवून त्याचें कौतुक करावे. सुंदराबाईस या दुज्या भावाचे फारसे वैषम्य वाटत नसे. कारण त्यामुळे तिला एकटीलाच श्यामला खेळविण्याचा मक्ता मिळत असे.

कष्टाने वाचविलेल्या पैशाची जशी किमत वाटते तशी कष्टानें वाचविलेल्या प्राणाचीही वाटते. जो श्याम पूर्वी सुंदराबाईच्या गळ्यातील ताईत होता तो दातांच्या आजारापासून तिच्या हृदयसिंहासनावर बसून तिच्या चैतन्याची सूत्रे हलवूं लागला. त्याच्यापुढे तिला लाक्षणिक किंवा वास्तविक अर्थाच्या कोणत्याही देवाची मातब्बरी वाटेनाशी झाली. तिच्या हृदयातील पतीच्या मूर्तीची व देव्हाऱ्यातील देवताच्या मूर्तीची तिजकडून वेळेवर पूजा होईनाशी झाली. मुलाच्या पाजण्याभरवण्यामुळे बळवतरावाच्या खाण्यापिण्याची तिजकडून हेळसांड होऊ लागली; व मुलाच्या न्हाण्यामुळें देवाचे पंचामृतस्नानादि उपचार मागे पडूं लागले. रांगणाऱ्या मुलापुढें लंगडा बाळकृष्ण तिला तुच्छ वाटूं लागला. ती देवपूजेत असता मुलगा अंगड्याटोपड्यानिशी रांगत येऊन तिला शिवला तर ती देवाचा बोज राखण्याकरिता बाह्यात्कारी त्याला डोळ्यांनीं दटावण्याचा बहाणा करी, पण मनांतून त्याच्या चेष्टेचें कौतुक करीत त्याला मांडीवर घेऊन पाजूं लागे.

मुलानें एखादे वेळीं बाहुलीला दूर भिरकावून देऊन एखाद्या देवाच्या मूर्तीचा नाद धरिला तर तोही पुरविण्यास ती कांकू करीत नसे. त्या अजाणत्या बालकाला देव कशाशीं खातात हे माहीत नसल्यामुळें तो स्वतःच्या अंगठ्याऐवजीं लंगड्या बाळकृष्णाचाच अंगठा चोखूं लागे; व दत्तात्रेयाची मूर्ति आपल्या तोंडाजवळ धरून तिला ब्रह्म-देवाप्रमाणें चतुर्मुख बनवी. शंकराची पूजा चालली असतांना तो बेल व फुलें चारी दिशांस उधळून शिवानें आपल्या श्वशुराच्या यज्ञाचा जसा विध्वंस केला होता तसा त्याच्या पूजेचा करी. बरें, त्याला शैवाच्याप्रमाणें शंकराबद्दलच पक्षपात होता असेंही नाहीं. एका हातानें शिवाची संभावना चालली असतां तो दुसऱ्या हातानें विष्णुपूजेचें तुलसीदलादि साहित्य उडवून विष्णूचीही शोभा करी. मारुतीला तर तो आईची नजर चुकवून त्याच्या शेपटासुद्धां गुंडाळून एका बाजूला फेंकीत असे. कृष्ण गौळणींचे दहीदूध चोरून पळवीत असें म्हणतात, पण आमचा धीट श्याम बाळ-कृष्णाच्याच वांट्याचें दहीदूध त्याच्या डोळ्यांदेखत स्वाहा करी, व हे दगडे मुकाट्यानें पहाण्याखेरीज त्याला गत्यंतर नसे. तो रामाची सीता चोरट्या रावणाप्रमाणें त्याच्या पश्चात न लांबविता त्याच्यासमोर पळवी. नैवेद्य दाखविण्याकरितां सुंदराबाईनें डोळे मिटले म्हणजे श्यामला तो तिचा नित्याचाच बहाणा वाटून त्यानें तो नैवेद्य ताटासह तोंडांत टाकावा; व ती आतां एकदम डोळे उघडून आपल्या चेष्टेचें कौतुक करील अशा अपेक्षेनें तिच्या तोंडाकडे पहात रहावें. हे सारे आनंदित प्रकार सुंदरा-बाई उघड्या डोळ्यांनीं पाही; इतकेंच नाहीं, तर त्यांचें कौतुकही करी. मुलाच्या जन्मास कारणीभूत झालेले ते सारे देव आतां त्याचें खेळणें होऊन बसले होते. त्यास प्रत्यक्ष जन्म देणारी माताच जर त्याच्या हातची बाहुली होऊन बसली होती तर तिच्या सूत्रानें चलनवलन करणाऱ्या देवांनीं त्याच्या हातचें खेळणें व्हावें यांत नवल कसचें?

मनोरंजक वाङ्मयाच्या बाबतींत प्रौढ माणसें फारच दुराराध्य असतात. कोणास कादंबरींत बोध असल्याशिवाय ती हातीं धरावीशी वाटत नाहीं, तर कोणास वेळ दवडण्यास उपयोगी पडण्यासारखी कोणतीही कादंबरी चालते; मग ती नीतिपर असो अगर अनीतिपर असो.

कांहीजण बुद्धीस पटणारी, तर काहीजण कल्पनेचे पोषण करणारी कादंबरीच पसंत करितात. कित्येकास सोपी, तर इतरास घोटाळ्याची रचना आवडते. एकदा वाचिलेले पुस्तक पुन्हा हाती धरणे बहुधा सर्वांच्याच जिवावर येते. पण अर्भकाच्या इतर गोष्टीप्रमाणे संतोषही थोड्यानेच होण्यासारखा असतो. एकच गोष्ट लागोपाठ दहा वेळा सांगितली तरी त्यास तिचा कंटाळा येत नाही. तिचा अर्थ कळला पाहिजे असाही तो आग्रह धरीत नाहीत. त्याच्या आरंभीच्या गोष्टीत ज्ञानकांडापेक्षा कर्मकांडासच विशेष प्राधान्य असते. त्याच्या कथा क्रीडात्मक व क्रीडा कथात्मक असून त्याजमधील सीमा आळखू येत नाही. 'लव लव साळुबाई मामा येतो। खोबऱ्याची वाटी देऊन जातो.' या गोष्टीचे पठन चालले असता अर्भकास बोट नाचवावयास मिळाली म्हणजे त्याची कांही तक्रार नसते. साळुबाईच्या लवण्याचा व मामाच्या औदार्याचा कार्यकारणभाव कळला नाही तरी त्याचे अडत नाही. 'अवडक चवडक दामाडू। दामाडूचे पचाडू' हे सयमक गीत एका सुरात चालले असता एकमेकाच्या हातावर चापट्या मारावयास मिळाल्या म्हणजे तो दामाडू व पचाडू यांचे नाते शोधण्याच्या भानगडीत पडत नाहीत. हास्यरसाच्या बाबतीत मात्र लहान मूल वडील माणसापेक्षा अधिक चोखंदळ असते. प्रौढ माणसाच्या हास्यास केवळ विसंगतपणाच्या वर्णनानेमुद्धा भरते येऊ शकते. पण लहान मूल असे थिल्लर नसते. त्यास हंसविण्याकरिता 'भात, वरण, तूप' इत्यादि सुसंगत वस्तूंचा तपशील लागतो. बरे, नुसता तपशील ऐकून त्याच्याठायी तोंडास सुटणाऱ्या पाण्यापलीकडचा रस उद्भवेल अशी अपेक्षा केली तर तीही चुकीचीच ठरेल. कढीची पाळ फुटून ती थेट त्याच्या काखेपर्यंत जाऊन धडकेल तेव्हाच कोठे त्याच्या गांभीर्याचा भंग होऊन त्याच्या हास्यास उकळी फुटावयाची. श्रोतृवृंद अर्भकांचा असल्यास वक्तयास स्वतःच्या बगलेतून गोष्टी काढण्यापेक्षा त्या त्याच्या बगलापर्यंत नेऊन भिडविणेच भाग पडते. अशा बोलाच्या भाताने व बोलाच्याच कढीने सुंदराबाई रोज किती तरी वेळां आपल्या लहानग्याच्या हास्यरससमुद्रास भरती आणीत असे ! अशा वेळी त्याचे हिरकण्याप्रमाणे चमकणारे दांत त्याच्या श्यामवर्ण छबीस फारच खुलून दिसत.

आपल्या लेकराच्या केसावर कात्रीचा प्रयोग होऊ देण्यास सुंदराबाई प्रतिकूल असल्यामुळे त्याचे जावळ काढण्याचा विधि तिसऱ्या वर्षापर्यंत लांबविण्यात आला. तोपर्यंत ते केस बरेच डोईजड होऊन स्वैर वृत्तीनें त्याचे कपाळ झांकण्याचा गुन्हाही करू लागले होते, यामुळे ते कातरण्यास सुंदराबाईंनं मुळीच हरकत घेतली नाही.

श्यामची यापुढील कांही वर्षे दांडगाई करण्यात व अनेक प्रकारचे खेळ खेळण्यात गेली. खेळांत त्याचा नेहमी पुढे पाय असे. शेजाऱ्याच्या मुलांशी विटीदांडू, चेंडू, लगोऱ्या खेळण्यात त्याचा किती तरी वेळ जाऊ लागला. खेळावयास कोणी सोबती न मिळाल्यास तो गोट्या खेळत बसे किंवा पतंग उडवी. बळवंतराव आपल्याच कामांत नेहमी मग्न असल्यामुळे व सुंदराबाईंची त्यास प्रत्येक गोष्टांत फूस असल्यामुळे त्याचा स्वभाव हूड बनत चालला.

# प्रकरण दुसरें

## विद्यार्थिदशा

मुलाचें बाळपण आईस कितीही स्पृहणीय वाटलें तरी त्यास निसर्गानें मर्यादा लावून दिली आहे. श्याम उत्तरोत्तर वयानें व अंगापिंडानें वाढूं लागला. सातव्या वर्षी त्याची थाटानें मुंज करण्यांत आली. समारंभातील प्रत्येक सोहळ्याचे वेळीं मुदगाबाईचें हृदय वात्सल्यानें भरून येत होतें. सोडमुंजीच्या प्रसंगीं श्याम ओठावर काजळाच्या मिशा लावून व हातांत काठी घेऊन लटकाच रुसून जाऊं लागला असतां उपाध्यानें त्याला स्वतःची मुलगी देण्याचें कबूल करून त्याची जी समजावणी केली ती पाहून तिला मुलाला कोठें ठेवूं व कोठें न ठेवूं असें झालें.

श्याम सात वर्षांचा झाला तरी त्यास मुदगाबाई शाळेंत घालण्याचें नांव काढीना. घरांत सात पिढ्यांस पुरेल इतकी दौलत असतां शिकून काय करावयाचें आहे असें तिचें म्हणणें पडलें. पण तें बळवंतरावांनीं लागलीच खोडून काढिलें. त्यांचें आजपर्यंत मुलाकडे फारसें लक्ष नसे. पण त्याचें शिकण्याचें वय होतांच त्यांनीं आपली बेफिकीर वृत्ति सोडून दिली व त्याला शाळेंत तावडतोब घालण्याचा आपला हेका तडीस नेला. घरांतील मोलकरणीचा मुलगा व श्यामचा सोबती दगडू नांवाचा होता. त्यास नुकताच शाळेंत धाडलें असून त्याचा अभ्यास सुरळीतपणें सुरू झाला होता. त्याजकडे बोट दाखवून बळवंतराव म्हणाले, "हा जातीनें कुणबी असून ब्राह्मणाप्रमाणें विद्या शिकत आहे, आणि श्याम ब्राह्मण असून त्याला तुम्ही निरक्षर ठेवणार! मनाची नाहीं तर जनाची तरी काहीं लाज बाळगा. बायकांप्रमाणें पुरुषांना निरक्षर राहून चालत नाहीं. श्यामचें आजपर्यंत खेळण्याचें वय होतें, म्हणून मी त्याच्या खेळण्याच्या आड आलों नाहीं. आतां त्याचें शिकण्याचें वय सुरू झालें आहे. हें वय तुम्ही उनाडपणांत दवडूं द्याल तर तुम्ही त्याची वैरीण आहांत असें लोक समजतील. तुम्ही वैरीण झालांत तरी मी त्याचा वैरी होणार नाहीं साफ." असें निर्वाणीचें

उद्गार ऐकल्यावर बिचारी सुंदराबाई तरी काय करणार ? ती निमूटपणें मुलाला शाळेंत पाठविण्याच्या तयारीला लागली. तिनें श्यामच्या अंगावर त्याच्या मुंजींतील उंची कोट घातला. डोक्यावर जरीची टोपी ठेवून दिली आणि पायांत पाटलोण व बूट घातला. बळी द्यावयाच्या पशूला जसा साज चढवितात तसाच हा साज आपण श्यामला मास्तराच्या छडीला बळी देण्याकरिताच चढवीत आहोंत असा विचार येऊन ती मधून मधून डोळे पुशीत होती. स्वतः श्यामला शाळेची विशेष कल्पना नसल्यामुळें तो मात्र आनंदानें उड्या मारीत होता.

बळवंतराव श्यामला शाळेंत स्वतःच नेऊन पोहोंचविणार होते. तें सुंदराबाईंस काळासारखें वाटलें. अपत्यजन्मानें पतिपत्नींच्या स्नेहग्रंथीस दृढता येते असा साधारणपणें जगाचा अनुभव आहे. पण या नवरा-बायकोमध्यें प्रथमपासून असलेलें परस्परासंबंधींचें औदासीन्य श्यामच्या जन्मापासून वाढतच गेलें होतें. श्यामला शाळेंत घातलें त्या दिवसापासून सुंदराबाईंच्या हृदयांतील औदासीन्याची जागा भीतीनें घेतली.

श्याम बापाबरोबर शाळेंत जाऊन पोहोंचला तेव्हां परिचित जगाहून अगदीं निराळें जग त्याच्या दृष्टीस पडलें. तेथें घरांतील शांतता नांदत नसून मोठा गोंगाट माजला होता. तेथें आईच्या प्रेमाचें साम्राज्य नसून शिक्षकाच्या धाकाचें साम्राज्य होतें. पाठीवरून प्रेमानें फिरणारा मऊ हात कोठें दिसत नसून पाठीचें धिरडें काढणारी छडी मात्र प्रत्येक शिक्षकाच्या हातांत दिसत होती. श्यामचा सारा आनंद मनातल्या मनांत जिरून गेला. शाळेचे मुख्य अध्यापक बळवंतरावांस अदबीनें नमस्कार करून त्यांच्या इच्छेवरून त्यास सर्वांतील खालच्या वर्गांत घेऊन गेले. प्रत्येक वर्गांतून जातांना मुलांची खडी ताजीम मिळून त्याचे डोळे जिज्ञासेनें एकदम श्यामकडे वळत, त्यानेंच तो अर्धमेला होऊन गेला. त्यास ज्या वर्गांत बसावयाचें होतें त्यांत पोहोंचल्याबरोबर तेथें त्यास आपल्याच बरोबरीचीं अनेक मुलें असलेलीं दिसून आलीं. त्यामध्यें दगडूही होता. परंतु श्याम लाजेनें इतका चूर होऊन गेला होता कीं त्याच्या डोळ्याशीं डोळा भिडविण्याचें धैर्य त्याला झालें नाहीं. लवकरच बळवंतराव त्यास शिक्षकाच्या हवालीं करून निघून गेले. आईबापांविरहित राहण्याचा त्यास हाच

पाहिला प्रसंग असल्यामुळें तो गांगरून गेला यांत नवल नाही. बळवंतराव दिसेनासे होत तोंपर्यंत तो त्यांच्याकडे पहात होता. ते दृष्टीआड झाल्यावर त्यास रडण्याचा मोठा हुंदका आला, व तो स्फुंदून स्फुंदून रडूं लागला. तें पाहून तेथें जमलेल्या बालसृष्टीतील भिन्न भिन्न व्यक्तींनीं आपापल्या मनोधर्माप्रमाणें निरनिराळ्या प्रकारानीं वागावयास आरंभ केला. तेथें अनेक प्रकारचे मानवी स्वभाव बालरूपानें गोळा झाले होते. पुढील पिढींतील न्यायी न्यायाधीश व अन्यायी अमलदार, दयाळू डाक्तर व निष्ठुर पोलीस शिपाई, इतरांचें दुःख हलकें करण्याकरितां सर्वस्व अर्पण करणारे उदारात्मे व स्वतःचा खिसा भारी करण्याकरितां दुसऱ्याच्या वित्तावर झडप घालणारे दरोडेखोर, निष्कपट योद्धे व कपटपटु राजकारणी पुरुष, चवचाल नागरिक व साधे खेडवळ, व्यसनी व निर्व्यसनी इत्यादि अनेक वृत्तीचे व भिन्नभिन्न व्यवसायक्षेत्रांतील अनेक पुरुष अंकुररूपानें एका सूत्रांत गोंविल्याप्रमाणें तेथें बसले होते. त्यांपैकीं कांहींजणांस श्यामच्या स्थितीबद्दल वाईट वाटलें तर कांहींजणांस आनंद वाटला. कांहीं गंभीर वृत्तीचीं मुलें त्याजकडे तटस्थपणें पहात बसलीं तर कांहीं बालिश वृत्तीचीं मुलें त्यास वांकोल्या दाखवूं लागलीं. कांहींजणांची मजल तर त्यास खडे मारण्यापर्यंत गेली. तें पाहून मास्तरांनीं त्या खोडकर मुलांवर छडीचा, गालगुच्याचा व कान पिळण्याचा प्रयोग केला, तेव्हां त्यांच्या खोड्यास कांहींसा खळ पडला. श्यामचें रडूं पाहून दगडू कळवळून त्याचें सांत्वन करण्याकरितां जवळ येऊन त्याचे डोळे पुसूं लागला होता, त्यालाही छडीचे एक दोन फटकारे मारण्यास त्यांनीं कमी केलें नाही. या शिक्षाचा प्रयोग कांहीं दिवसांनीं आपणावर व्हावयास चुकणार नाहीं हें श्यामला कळून चुकलें. कधीं घरीं जातों व आईच्या गळ्यांत गळा घालून मोकळ्या मनानें रडतों असें त्यास होऊन गेलें. मास्तरांनी त्यास पाटीवर काढण्यास श्री हें अक्षर दिलें होतें. पण त्याच्या विचारांच्या खळबळीमुळें पाटीस अखेरपर्यंत 'श्री'मती होण्याचा योग आला नाहीं. अखेर शाळा सुटण्याची घंटा झाली, व इतर मुलांप्रमाणें श्यामही आपल्या घरीं तातडीनें चालता झाला.

इकडे सुंदराबाई त्याच्या वाटेकडे डोळे लावून बसली होतीच. तो

दुरून दिसतांच ती लगबगीने त्याला सामोरी गेली, व प्रेमानें पोटाशी धरून त्याजवर टिपें गाळू लागली. श्यामही मुक्त कंठानें रडूं लागला. आपली भेट किती तरी वर्षांनी झाली आहे असें त्या मायलेकरास वाटत होतें.

श्यामच्या तोंडून शाळेचें वर्णन ऐकून सुंदराबाईच्या काळजांत चरें झालें. अशा कसाईखान्यात आपलें वत्स पाठविणारे बळवंतराव तिला कसाबासारखे वाटूं लागले.

दुपारीं पुन्हा शाळेंत जाण्याची वेळ झाली. पण त्या वेळीं बळवंतराव घरी नव्हते या गोष्टीचा फायदा घेऊन सुंदराबाईनें मुलाला शाळेंत न पाठवितां त्याच्या जिवाला बरें वाटत नाहीं असा दगडूच्या हातीं मास्तरांना निरोप पाठविला. श्यामला सकाळीं शाळेंत जो त्रास झाला होता त्याची भरपाई करण्यासाठीं तिनें त्याला मनसोक्त खेळण्याची परवानगी दिली. इतकेंच नाहीं, तर त्याच्या खेळांत त्याचे नेहमींचे सवंगडी मिळण्यासारखे नाहींत हें पाहून ती स्वतःच त्यास मदत करूं लागली. लपंडावांत श्याम लपून बसल्यावर ती त्यास शोधून पाहूं लागली, अधळ्या कोशिंबिरींत ती स्वतःवर राज्य घेऊन व डोळे गच्च बांधून घेऊन त्यास पकडण्यांत घटका घटका घालवूं लागली; चेंडूच्या खेळांत त्यानें फेंकलेले चेंडू झेलूं लागली. या मायलेकरांच्या खेळांत बहुधा सुंदराबाईसच हार खावी लागे. पण या गोष्टीबद्दल तिला विषाद न वाटतां आनंदच वाटत असे, व यामुळें श्यामला खेळांत इतर सोबत्यांपेक्षां तीच आवडूं लागली.

पहिल्या दिवसाचा क्रमच पुढेंही कांहीं दिवस चालू राहिला. श्यामनें सकाळीं शाळेंत जावें व दुपारीं कसल्या तरी ज्वरानें आजारी पडून अंगांतून घाम काढण्याकरितां आईबरोबर लपंडाव वगैरे खेळ यथेच्छ खेळावे. खेळून थकवा आलाच तर विसावा मिळण्याकरितां पतंग उडवीत बसावें. पतंग तयार करण्यास व तो उडवितांना दोऱ्याची चक्री धरण्यास सुंदराबाईचा फार उपयोग होई. पतंग उडविणें हा लहान मुलांचा फार आवडता खेळ असतो. ज्या वयांत आपली सूत्रें दुसऱ्याच्या हातीं असून त्याजकडून आपली उन्नति घडून येत असते त्या वयांत पतंगासारख्या निर्जीव वस्तूची कां होईनात, सूत्रें आपल्या हातीं धरून त्याची उन्नति घडविणें आपणास साहजिकच अत्यंत अभिमाना-

स्पद वाटते. पुस्तीसारख्या किंवा खड्यांसारख्या अप्रिय वस्तूंच्या कारणी लागावयाचे कागद जर आपणास चोरून पतंगप्राप्त्यर्थ खर्च करितां आले तर मग आपल्या आनंदास पारावारच उरत नाही. घराबाहेर पडण्याची मनाई झाल्यामुळे ज्याची जगभर संचार करण्याची हौस मनातल्या मनांत दबून गेली आहे अशा मुलास पतंगाच्या द्वारे अस्मानाचा ठाव पहाण्याची मोकळीक नसती तर आपले जिणे असह्य वाटले असते. त्याचें चित्त त्या कागदी वारूच्या पृष्ठावर बसून गरुडपक्ष्याप्रमाणें उच्च आकाशात भरारी मारिते, व आपली हापापलेली दृष्टि आसमंतात् शेकडो कोसाच्या प्रदेशावर फिरवून त्यात सरपटणाऱ्या अनेक नद्यांत तिजकडून स्नान करविते, तिला अनेक आमरायांच्या शीतळ छायेत बसविते व अनेक देवालयात प्रविष्ट करिते. तिकडे विद्यार्थी भूगोलातील स्थलांची कोरडी घोकपट्टी करीत असता पतंगावर आरूढ झालेलें बालचित्त भूपृष्ठावरील स्थळांचा साक्षात्कार अनुभवीत असते. मृत देहापासून मुक्त होऊन वरवर चाललेल्या परंतु त्याशी सूक्ष्म तनूने बद्ध असलेल्या आत्म्यास जसा आनंद होत असेल तसाच पतंगरूपी अश्वावर आरूढ झालेल्या बालचित्तास होत असतो. भूमीवर ज्या बालकास मानहानीचे अनेक प्रसंग अनुभवावे लागतात त्याचाच पतंगरूपी योद्धा आपल्या लाकडी अस्थींच्या व कागदी चर्माच्या साह्याने आकाशभर संचार करून असंख्य पक्ष्यांच्या समूहास दूर पिटाळून लावितो. खरोखर भूमि व आकाश एकाच क्षणी आपल्या दृष्टीच्या व पराक्रमाच्या आटोक्यात आणणारा जगदैकवीर एकटा पतंगच होय.

श्याम आईच्या फुशीने शाळेस रोज एक वेळ झुकांडी देतो ही गोष्ट कर्णोपकर्णी बळवंतरावांच्या कानावर गेली. तेव्हा त्यांनी त्याबद्दल मुंदराबाईची खूपच कानउघाडणी केली. ती करिताना त्यांनीं वारंवार दगडूचा दाखला दिला. "गरिबांची मुले उत्कर्षाच्या इच्छेने मनापासून अभ्यास करितात. उलट श्रीमंतांची ऐतखाऊ मुले वडिलार्जित जिनगीच्या भरवशावर शाळेकडे दुर्लक्ष्य करितात व अखेरीस हातीं झोळी घेतात. दगडू मोठेपणीं चांगल्या योग्यतेस चढणार अशी चिन्हें आतांपासून दिसत आहेत. श्यामला त्याचा शागीर्द होण्याचा प्रसंग न येवो म्हणजे झालें."

या तीव्र भाषणाचा परिणाम अपेक्षित परिणामाहून अगदीं निराळा झाला. सुंदराबाई श्यामच्या अभ्यासाची काळजी घेण्याऐवजीं दगडूचा मनातून द्वेष करू लागली. ती श्यामचें दप्तर दगडूच्या हातीं शाळेत पाठवू लागली, व इतर प्रकारांनीही त्यास हिणवू लागली. श्यामचे दगडूवरील प्रेम मात्र कमी होण्याऐवजीं वाढतच चाललें. तो त्यास आपल्या भावाप्रमाणे मानी. आईनें दगडूच्या हातीं दिलेलें दप्तर ती दृष्टीआड होताच तो परत आपल्या हातीं घेई. आपणास मिळालेल्या खाऊत तो त्यास नेमाने वाटा देई. सुंदराबाई त्यास एखादे वेळीं रागें भरल्यास तो त्याची समजावणी करी व त्याच्या डोळ्याचें पाणी पुशी. अशा वेळीं सुंदराबाईनें त्यास म्हणावें, "बाळ, असें येता जाता कुणब्यास शिवणें चांगलें नव्हे. त्यातून दगडू आहे गरिबाचा लेक. आपण श्रीमंतानीं त्याच्या असें अंगसरपटीला येणें बरें का ?" हे ऐकून श्यामनें हट्टानें एका हातांत दगडूचा व दुसऱ्या हातात सुंदराबाईचा हात धरून उभें रहावें. तेव्हा त्या धर्मनिष्ठ पण पुत्रवत्सल मातेनें पोटातून निघू पहाणाऱ्या कौतुकाच्या ऊर्मि आतल्या आत दाबून रागाचा बहाणा करावा, पण तो श्यामला खरा वाटण्यापूर्वीच त्यास जवळ ओढून त्याचें प्रेमानें चुंबन घ्यावें.

श्याम एकट्या दगडूशींच प्रेमळपणानें वागे असे नाहीं. वर्गातील इतर मुलांशींही तो बंधुभावानें वागे. यामुळे लवकरच तो त्या सर्वांचा आवडता होऊन बसला. त्यास आईकडून खाऊकरिता जे पैसे मधून मधून मिळत असत त्याची त्याने त्याजमध्यें वाटणी करावी, व कधीं कधी त्यास खिशातील बदाम, पिस्ते, बेदाणा, खडीसाखर वगैरे ऐनजिनसी मालातही वाटेकरी करावें. मास्तराच्या गैरहजरीत मुलें जो दंगा करीत त्यात हा खुल्या दिलानें सामील होई, व तो इतरापेक्षा अंगापिंडानें सुदृढ असल्यामुळे त्या दंग्याचें नेतृत्वही त्याजकडेच येई. दांडगाईबद्दल मास्तराकडून जे बक्षीस मिळे ते घेण्यात तो कधीही अगचोरपणा करीत नसे, उलट इतराच्या खोड्याचें आळ व शिक्षा तो आपणावर ओढून घेई. शाळा सुटल्यानंतर मुलें जे खेळ खेळत त्याचा पुढाकारही अर्थातच त्याजकडे येई. खेळातसुद्धा त्याचा दिलदारपणा दिसून येई. अंगांत ताकद व चपळपणा असल्यामुळे त्यास यश मिळविण्याकरितां

असत्य मार्गाचें कधींही अवलंबन करावे लागत नसे. उलट कधी कधी यश आटोक्यात असताही दुसऱ्या पक्षाचा हिरमोड होऊ नये म्हणून तो बळेच चुका करून अपेश पत्करीत असे. खेळताना एखादा मुलगा पडून त्यास खोक लागली तर श्याम त्याची जखम धुवून व तिजवर पाण्याची पट्टी बांधून त्यास त्याच्या घरीं पोहोचवी. अशा वेळी मुलाच्या आईकडून मिळणाऱ्या आशीर्वादानीं त्याला धन्य वाटे.

याप्रमाणे त्याच्या भावनांची योग्य दिशेने वाढ होत होती खरी. पण तिजबरोबर त्याच्या शिक्षणाचे पाऊल पुढे पडत नव्हते. पहिलीं दोन तीन वर्षें तो वडिलांच्या नावावर प्रत्येकी दोन दोन इयत्ता या वेगानें चढत गेला. पण पुढे त्याला तो वशिला उपयोगी पडेनासा झाला. श्यामनें सुंदराबाईपासून आपला कृष्ण वर्ण व प्रेमळपणा हीं ज्याप्रमाणे उचललीं होतीं त्याप्रमाणे बुद्धिमांद्यही उचलले होते. त्याच्या स्मरणशक्तीचा जेथें भावनांशीं संबंध येई तेथें मात्र ती दृढ असे. पण धडे पाठ करण्याचे कामी तिचा मुळीच उपयोग होत नसे. सुंदराबाईनें व दगडूनें त्याच्याशीं लहानपणापासून जे प्रेमळपणाचे वर्तन केले होते ते त्याच्या स्मरणांत बारीकसारीक तपशिलांनिशीं वज्रलेप होऊन राहिले होते. पण कवितांच्या ओळी व व्याकरणातील व्याख्या कितीदा घोकल्या तरी त्याच्या तोंडीं बसेनात. मास्तर दुर्बोध ओळींचा व व्याख्यांचा स्वतःसही दुर्बोध असलेला अर्थ मुलांच्या डोक्यात उतरविण्याकरितां त्यांतील शब्द ज्या जोरानें व पौनःपुन्यानें उच्चारीत त्यांनीं काहीं विद्यार्थ्यांस अर्थज्ञान झाल्याचा पुसट पुसट संशय येत असला तरी श्यामच्या डोक्यावर काही परिणाम होत नसे. भूगोलात त्याच्या फारच हास्यास्पद चुका होत. तो नाशिक शहर मध्यप्रांताच्या वरच्या बाजूस शोधूं लागे, व कानपुरास नागपुराच्या पंक्तीस आणून बसवी. एखाद्या धरणीकंपानें व्हावी अशी उलथापालथ त्याच्या मंद डोक्यात आपोआप होत असे. नायगऱ्याचा धबधबा भूगोलांत जरी अमेरिकेंत धडधडत असला तरी त्याचे डोकें त्याजकडून सहारा वाळवंट भिजवून सोडी; व उलट पक्षीं नील नदीच्या उगमाशी असलेले सरोवर तो इटालींतील ज्वालामुखी पर्वताच्या माथ्यावर ठेवी. बुद्धिमान् पुरुषाची कल्पकता मनोरंजक वाङ्मयात जे चमत्कार घडवून

आणिते ते श्यामचें बुद्धिमांद्य इतिहासांत घडवून आणी. पहिल्या बाजीरावाच्या पुत्र नानासाहेब पेशवा याच्या पदरी ते १८५७ सालच्या बडाचें अपेश बांधी. व दुसऱ्या बाजीरावाच्या पुत्रास पानिपत येथील अपेशाच्या धक्क्यानें प्राण सोडण्यास लावी. गणितांत तर त्याचें डोकें मुळीच चालत नसे. एक तर त्याचें डोकें मुळांतच जड होतें. शिवाय मास्तर उदाहरणें समजावून देत तेव्हां त्याचें लक्ष्य तिकडे न लागतां घराकडे गुतून जात असे. या विमनस्कतेमुळे त्याचें गणित जें एकदां कच्चें राहिलें तें कायमचेंच राहिलें. उतरती व चढती भाजणी, लघुतम साधारण भाज्य. दृढभाजक. सरळ व्याज अशासारखें साधें उदाहरण त्याला एखादे वेळीं सुटे. पण व्यवहारी व दशांश अपूर्णांक, चक्रवाढ व्याज अशासारखें जरा घोटाळ्याचें उदाहरण आलें कीं तो गांगरून जाई. दशांशांतील टिंब कोणत्या ठिकाणीं ठेवावयाचें याचा त्यास मुळींच उमज पडत नसे. काम, गति वगैरेसंबंधाचीं उदाहरणें समोर आलीं म्हणजे तर त्याची मति मुळींच चालत नसे. तीं सोडवितानाही तो आपल्या बुद्धीपेक्षा भावनांवरच अधिक भिस्त ठेवी. काम करणाऱ्या स्त्रीपुरुषास तो त्याच्या जाचांतून लवकर मोकळें करी. गुरास कुरणावर वाटेल तितके दिवस चरू देत असे व समुद्रांत बुडणारें जहाज शक्य तितका वेळ पाण्यावर तरंगत ठेवी. त्याचें उत्तर बिनचूक यावें म्हणून त्याच्यासमोर बसलेला त्याचा सोबती पुष्कळदां आपली पाटी त्यास दिसेल अशा बेतानें धरीत असे. पण श्याम आपल्या बापास शोभण्यासारखा प्रामाणिक व स्वाभिमानी होता. दुसऱ्याची नक्कल करून यश मिळविणें त्यास कमीपणाचें वाटे.

वर्गाच्या शिक्षकास खानगी रीतीनें शिकविण्यास ठेविलें म्हणजे मुलास त्याचा सामुरवास होत नाहीं असें ऐकल्यावरून सुंदराबाईनें श्यामच्या शिक्षकास त्याला घरीं शिकवावयास ठेविलें. आपली स्त्री मुलाच्या शिकण्यास इतकी जपते हें पाहून बळवंतरावास समाधान वाटलें. पण ती निव्वळ फसवणूक होती. मास्तर शिकविण्यास आले म्हणजे आज काय मुलाचें डोकें दुखतें, उद्यां काय पोट दुखतें असें बहाणे सांगून ती त्यास अजीबात रजा तरी देत असे, किंवा मुलाला शिकण्यास उशिरानें बसवून लवकर उठवीत असे, व बाकीचा वेळ मास्तरास गोडधोड किंवा पानतंबाखू खाण्यास देऊन काढीत असे. मास्तराचें काम टळून शिवाय त्यास पगारा-

च्या जोडीस नित्य नवे मिष्ट पक्वान्न खाण्यास मिळे, तेव्हां त्याने तरी तक्रार कां करावी ? मात्र या शिकवणीने गुरूचा जसा फायदा झाला तसा शिष्याचा झाला नाही. तिने गुरूचे शरीर सतेज झाले, पण शिष्याची बुद्धि पूर्ववत् निस्तेजच राहिली. तिने गुरूस अग्निमांद्य जडण्याची भीति वाटूं लागली, पण शिष्याचे बुद्धिमांद्य नाहीसे होण्याची आशा दिसेनाशी झाली. मास्तर आतां श्यामला शाळेत फारच प्रेमाने वागवूं लागले. ते त्याला छडी मारीतनासे झाले. एखादे वेळीं पक्षपात दिसू नये म्हणून मारलीच तर अगदीं हलक्या हाताने मारीत, व तिचा त्याच्या अंगास स्पर्श होतो न होतो तोंच ती दूर करीत. त्याचे उत्तर चुकेल या भीतीने ते त्यास फारसे प्रश्न करीतनासे झाले. ते आपल्या गैरहजरींत वर्ग त्याच्या ताब्यात देऊं लागले. मास्तराच्या मर्जीचा व शिकवणीचा असा कार्यकारणभाव दिसून येतांच त्यास आणखीही शिकवण्या मिळाल्या.

आपल्या मर्जींतल्या विद्यार्थ्यांस परीक्षेत पास होणें सुलभ जावें म्हणून मास्तरांनीं एक संकेतशास्त्रच बनविलें होतें. परीक्षकाने घातलेलें उदाहरण सम किंवा व्यस्त असेल त्याप्रमाणें ते त्यास इशारा देण्याकरितां स्वतःचा उजवा अगर डावा कान खाजवीत. उत्तरांतील अंक सुचविण्यास सोपें जावे म्हणून त्यांनीं आपल्या शरीराच्या भिन्नभिन्न अवयवावर भिन्नभिन्न अंकाचा आरोप केला होता. खुणाचा उपयोग ते गणितांतच करीत असें नाहीं, तर इतिहासभूगोलासारख्या विषयातही करीत. इतिहासातील सनाचा इशारा ते गणितांतील अंकात्मक उत्तराच्याप्रमाणेंच करीत. परीक्षकानें एखाद्या युद्धाचा सन विचारला कीं लागलीच मास्तराचे बाहु व इतर अवयव फुरफुरूं लागत, व त्याच्या कंडूशमनार्थ त्यास आपला हात त्याजवरून फिरवावा लागे. त्यांनीं त्या अवयवाची वाटणी भूगोलांतील यच्चयावत् देशांत करून दिली होती, व खोकण, खाकरणें, जांभई देणें, कपाळास आठ्या घालणें इत्यादि क्रियांवर पर्वत, समुद्र, नदी इत्यादि भिन्नभिन्न प्रकाराची योजना केली होती. आपले शिष्य व्याकरणविषयांत पारंगत दिसावे म्हणूनही ते आपल्या अवयवाचा उपयोग करीत असत. याप्रमाणे शिष्याच्या यशःप्राप्तीस शिष्याच्या बौद्धिक श्रमापेक्षां मास्तराचे शारीरिक श्रमच कारणीभूत होत असत. शिष्याच्या मनात विषय बिंब-

विण्यास या कवाइतीपेक्षा अधिक वेळ त्यास लागला नसता. पण तसे केले असते तर अप्रामाणिक मार्गांनी यश मिळविण्यात जो आनंद असतो त्याला गुरूस व शिष्यास मुकावे लागले असते. श्यामचे डोके जड असल्या-मुळे ही कवाईतही त्याच्या लक्ष्यात राहण्यासारखी नव्हती, व ती त्याच्या लक्ष्यात रहाती तरी तिचा उपयोग करण्याइतका अप्रामाणिकपणाही त्याच्या अंगी नव्हता. अर्थात् त्याला पहिल्या दोनतीन वर्षांनंतर एका एका वर्गात दोन दोन वर्षे घालविणे भाग पडले.

या दिरंगाईबद्दल सुंदराबाईस फारसे वाईट वाटत नसे. मुलगा पास झाला असता तर तन्निमित्त जो सत्यनारायण करिता आला असता तो न झाल्यामुळे तिचा किंचित् विरस होई. पण यापलीकडे तिच्या विचारा-ची धाव जात नसे. श्याम तरतरीत बुद्धीचा नाही असे दिसून आल्या-वर बळवंतराव त्यास परदेशी पाठविण्याचा बेत रहित करितील या विचाराने ती त्याच्या अपेशातही आनंदच मानी. पुष्कळ परीक्षा पास होणे हे द्रव्यसंपादनाचे एक साधन आहे येवढीच तिची समजूत होती; व घरात पिढ्यानुपिढ्या पुरण्यासारखी लक्ष्मी नांदत असता बळवंतरावांनी तरी स्वतःस व मुलास त्रास का करून घ्यावा याचे कारण तिला कळत नसे. इकडे बळवंतरावाची मुलाच्या शिक्षणाबद्दल जो जो निराशा होऊ लागली तो तो त्यांचे त्याजवरील प्रेम उडू लागले. तो विलायतेतील एखादी मोठी परीक्षा पास होऊन बडा सरकारी अधिकारी होईल, निदान बॅरिस्टर होऊन मुंबईसारख्या मोठ्या शहरी प्रमुख वकील म्हणून नावालौकिकास येईल, तसेही झाले नाही तर एखादे सुधारणापक्षाचे वृत्तपत्र काढून यापले सामाजिक सुधारणेचे व्रत तरी पुढे चालवील अशी त्यास बरीच वर्षे आशा होती. परंतु पुढे ती आशा डळमळू लागून थोड्या अवकाशात समूळ ढासळली. आपला मुलगा ऐतखाऊ निघून वडिलो-पार्जित जिनगीवर मजा मारीत रहाणार या गोष्टीची त्यास मनस्वी लाज वाटू लागली. त्यास फुकटेपणाची फार चीड असे. "असा मुलगा होण्या-पेक्षा झाला नसता तर काय वावगे झाले असते! निपुत्रिकास मरणोत्तर नरकवास प्राप्त होतो असे शास्त्र सांगते. पण असा कुलक्षणी मुलगा याच जगात स्वतः नरकयातना भोगून मातापितरासही त्याचा अनुभव

आणून देतो. अशा मुलाचा बाप निपुत्रिकच नाही तर काय? निपुत्रिकापेक्षाही तो भाग्यहीन. निपुत्रिकास आशा तरी नसते. पण कुलक्षणी मुलगा बापास भावि भाग्याची आशा दाखवून परिणामी तिची निराशा करितो; प्रथम कल्पनाशिखरावर बसवून शेवटी त्याचा कडेलोट करितो; कुलदीपक होण्याचे खोटे आमिष दाखवून कुलाची गारागोळी करितो." हे विचार असह्य झाले म्हणजे बळवतराव ते मृदगाबाईपाशी व श्यामपाशीही ओकून टाकीत. "ब्रह्मदेवाच्या चुकीने मोलकरणीचा मुलगा तुमच्या पोटी व तुमचा तिच्या पोटी आला आहे. मातृमुखी मुलगा दैवशाली असतो म्हणतात. आपला श्याम केवळ तोंडवळ्यातच नाही तर बुद्धीत सुद्धा तुमच्या वळणावर गेला आहे, त्याअर्थी तो फारच दैववान् म्हटला पाहिजे. आणि खरेच. खायला प्यायला भरपूर, खेळायला वाटेल तितकी फुरसद आणि लोळायला मऊ बिछाना असल्यावर त्याला दैववान तरी का म्हणू नये?" अशा तऱ्हेचे कुत्सित किंवा 'माझ्या जिनगीच्या भरवशावर जर तुम्ही त्याला खुशालचंद बनवीत असाल तर मी साफ सांगतो की, तो जर यापुढे असाच ठोंब्या राहिला तर त्या जिंदगीतली एक कपर्दिकाही त्याला मिळणार नाही. पाहिजे तर त्याने खुशाल भिक्षा मागून पोट भरावे. माझी जिनगी देण्याला पात्र अशा अनेक संस्था आपल्या देशात आहेत." असे धमकीचे उद्गार त्याच्या तोंडातून वारंवार बाहेर पडू लागले. श्यामचे अभ्यासाकडे दुर्लक्ष्य होण्यास जी कारणे होती त्यात या बोलण्याची भर पडली. कधी कधी बळवतराव त्याला शिकवण्यास स्वतः बसत. पण त्याचा हरएक विषयातला कच्चेपणा दिसून येताच ते रागाने बेफाम होऊन त्याच्या अंगावर खेकसू लागत. अशा वागणुकीची मुळीच सवय नसलेला बिचारा श्याम थरथर कापू लागे. त्याच्या डोक्यात जो काहीं थोडा ज्ञानसंचय झाला होता तोही शुष्क होऊन जाई, व बापाच्या साध्या प्रश्नांसही त्यास उत्तरे सुचत नसत. हळूहळू शब्दाचा मार जाऊन त्याचे जागी देहदंड येऊन बसला. पहिल्यापहिल्याने बळवतरावांच्या रागाचे समाधान थापडासारख्या साध्या शिक्षेवर होत असे. पण पुढें पुढें आपला मुलगा हाताने स्पर्श करण्यासही अपात्र असे वाटूनच कीं काय, ते त्यास प्रथम छडीने व नंतर घोड्याच्या चाबकानें मारू लागले.

हरहर ! एकुलत्या एक मुलाची योग्यता केवळ विद्याभावामुळे पशूच्याइतकी हीन व्हावी काय ! पण बापाची दृष्टि बहुधा याप्रमाणे स्वार्थीच असावयाची. पुत्राकडे माता स्नेहाचे भाजन या दृष्टीने पहाते. पण पिता कुलदीपक म्हणून पहात असतो. मुलाच्या बुद्धीची ज्योत मंद दिसल्यास माता त्याजवर स्नेहाचा अधिकाधिक वर्षाव करिते. उलट पिता त्यास गळवया पणतीप्रमाणे दूर भिरकावून देण्यासही तयार होतो. श्याम माराने वळवळून जाऊन ओरडू लागला म्हणजे त्याची पुत्रवत्सल माता धावत येऊन पितापुत्रामध्ये पडे, व त्याच्या वाट्याचा मार आपल्या अंगावर घेई. माराने त्याच्या अंगास जे वळ पडत ते घालविण्याकरिता ती घटकाघटका त्याच्या अंगास तेल लावून चोळीत व शेकीत बसे. अशा प्रसंगी आपल्या गोजिरवाण्या मुलावर हात टाकणाऱ्या मागहृदयी बापाचा तिला मनापासून त्वेष येत असे. पण तो बाहेर दाखविल्यास श्यामला आणखीही त्रास व्हावयाचा हे लक्ष्यांत घेऊन ती तो आतल्या आत गिळून टाकी.

श्याम दहा वर्षांचा असतानाच सुंदराबाईने त्याजकरिता आपल्या एका आप्ताची मुलगी वधू म्हणून मनात योजून ठेवली होती. त्याच्या वयास सोळा वर्षे पुरी होतात न होतात तोच तिने नवऱ्यापाशी मुलाच्या लग्नाचा प्रश्न काढिला. पण त्याची विश्वविद्यालयाची प्रवेशपरीक्षा होई-पर्यंत त्याच्या लग्नाचा विचारच करावयाचा नाही असे बळवंतरावांनी निक्षून सांगितले तेव्हा तिला गप्प बसणे भाग पडले. उत्तरोत्तर श्यामचा अभ्यासातला कच्चेपणा जो जो तिच्या नजरेस येऊ लागला तो तो तिची त्या बाबतीत निराशा होत चालली. शेवटी तिने ती गोष्ट काढण्याचे अजीबात सोडून दिले.

आज श्यामचा अठरावा वाढदिवस. तो साजरा करण्यात सुंदरा-बाई गढून गेली होती. तिच्या प्रसन्न मुद्रेचे कारण ऐकताच बळवंतराव कपाळास आठ्या घालून म्हणाले, "त्या टोणग्याचा कसला करिता वाढदिवस ? त्याच्यात कानाशिवाय दुसऱ्या कशाची वाढ दिसेल तर ना तो साजरा करावयाचा ! अशी मुले एक तर होऊ नयेत किंवा झाल्यास राहू तरी नयेत. आज त्याच्या वार्षिक परीक्षेच्या निकालाचा दिवस आहे. परीक्षेस बसण्याची ही त्याची तिसरी खेप. परीक्षेत जर तो

पास झाला तर तुम्ही खुशाल त्याचा वाढदिवस साजरा करा, माझी त्याला ना नाहीं. पण जर का तो नापास झाला तर--पण मी काय करीन तें इतक्यातच बोलून दाखवीत नाहीं. निकाल कळल्यावर तेंही आपोआप कळेल." ही कठिण वाक्ये ऐकताच सुंदराबाईचा सारा उल्हास मावळून गेला. तिच्या मनात आनंदाचे जागीं भीतीनें ठाणें दिलें. परीक्षेच्या निकालाच्या दिवसाकडे तिचें मुळींच लक्ष्य नव्हतें. परंतु तो दिवस आजचाच असून त्यावर बळवंतराव टपून बसले आहेत हें दिसल्यापासून तिचें मन अनेक शंकाकुशंकांनीं व्यापून गेलें. श्याम नापास झाल्यास बळवंतराव त्यास कुशब्दांनीं ताडन करणार कीं गुरासारखे झोडपणार, उपाशी ठेवणार कीं शिळ्यापाक्या अन्नावर ठेवणार, कोंडून ठेवणार कीं वेगळा करणार याचा तिला कांहींच अंदाज करवेना. पुढील अरिष्ट टाळण्याकरितां तिनें आजपर्यंत उपेक्षिलेल्या साऱ्या देवास नवस केले; पण आपल्या पतिदेवाच्या कोपापुढें त्याचा कांहीं उपयोग होईल कीं काय अशी तिची तिलाच शंका वाटत होती. आज ती श्यामला आपणापासून एक क्षणही वेगळा होऊं देईना. त्याचें तोंड आज तिला रोजच्यापेक्षाही बापुडवाणें दिसूं लागलें. आज संध्याकाळचें जेवण त्याच्या तोंडात धडपणें पडतें कीं काय अशी शंका येऊन तिनें त्याजपाशीं प्रेमानें बसून व त्यास आग्रह करून त्याजकडून दोन घास अधिक खावविले. श्याम पुष्कळदा आईच्या मांडीवर लहानपणच्याप्रमाणेच लोळत असे, व त्याबद्दल त्याची थट्टाही होत असे. आज तो प्रेमानें तिच्या मांडीवर डोकें टेकून पडला असताना तिनें कितीदा तरी त्याचें तोंड कुरवाळिलें असेल. तिला बळवंतरावांनीं दिलेली धमकी त्याला ठाऊक नव्हती. आज आईनें चालविलेले आपले लाड वाढदिवसानिमित्तच आहेत असे वाटून तो आनंदात होता. परीक्षेचा निकाल प्रतिकूल झाल्यास आपल्या बाळाचें हें टवटवीत मुख सुकून जाईल या विचारानें तिला भडभडून येत होतें. "निकाल कसा होईल असें तुला वाटतें?" असा तिनें प्रश्न करिताच त्याचा सारा आनंद क्षणात मावळून गेला, व त्याच्या तोंडावर धास्तीचीं चिन्हे दिसू लागलीं. तो म्हणाला, "आई, मी रात्रंदिवस झटून किती अभ्यास करितों हें तूं पहातेसच. पण जिथे मुळांतच कच्चेपणा राहिला तेथे माझ्या अभ्यासा-

चा काय उपयोग होणार ? खरोखर मी बाबाच्या पोटी न येता एखाद्या गरिबाच्या पोटी आलो असतो तर वाटेल तितके काबाडकष्ट करून कुटुंब पोसण्याची माझ्या अंगात धमक होती. पण जी गोष्ट माझ्या हातची नाहीं तिला मी तरी काय करूं ? परीक्षा झाल्यापासून तिच्या निकालाबद्दल मला सारखी काळजी लागून राहिली आहे. त्यातच कोठे ती विसरलो होतो. तो पुन्हा ती दत्त म्हणून पुढें उभी राहिली. आज सोक्षमोक्ष काय तो होणार आहे. तो झाला म्हणजे त्या काळजीतून तरी सुटेन." सुंदराबाई त्याच्या तोंडावरून हात फिरवून म्हणतात. "खरेंच. माझे बाळ या महिन्यात फारच वाळले. पहिल्यानं ती मेली अभ्यासाची दगदग, आणि आता ही निकालाची काळजी. मिळून सुख कशीच नाहीं. या मेल्या परीक्षा सार्‍या पैशाकरिताच ना ? तो जर भरपूर आहे तर माणसानं आपल्या सोन्यासारख्या मुलाला छळावें तरी कां विनाकारण म्हणते मी ! नाहीं साधत एखाद्याला, म्हणून त्यानं काहीं मोठं पाप केलें असें तर होत नाहीं ना ? पण मेल्यांना इतकं सुचेल तेव्हा ना ?" सुंदराबाईचा हा सारा युक्तिवाद अर्थातच नवऱ्याच्या पश्चात् चालत होता. त्याच्यादेखत एक ब्रही काढण्याची तिची हिंमत नव्हती.

निकाल काय होतो तो पहाण्याच्या कामावर दगडूची योजना झाली. तो परत येताना दूर अंतरावरून दिसावा म्हणून उभयतां मायलेक घराच्या तिसऱ्या मजल्याच्या सज्जात त्याच्या वाटेकडे डोळे लावून बसली. आपली काळजी बाहेर दिसल्यास दुसऱ्याची काळजी दुणावेल या भीतीने प्रत्येक-जण ती मनातल्या मनातच दाबून बाह्यात्कारी बेफिकीरपणा दाखवी. पण दगडू आल्याचा भास होताच "आला वाटतें !" असे त्याच्या तोंडून उद्गार निघाल्याशिवाय रहात नसत. सध्याकाळ होत चालली तशी त्याची चिंता असह्य होऊं लागली, व निकाल कांही असो, तो लौकर कळलेला बरा असे त्यास वाटूं लागले. पण तो विचार दगडू दिसूं लागल्याबरोबर नाहींसा झाला. दगडू मंद गतीने पावलें टाकीत येत होता. ते पहातांच उभयतांच्या काळजांत चर्र झाले. तो घरी येऊन पोहोचेपर्यंत सुंदराबाई व श्याम हीं दोघें तळमजल्यावर आलीं होतीं. दगडू बोलेना ते पाहून सुंदराबाई रागाने म्हणतात, "अरे, असा मुखस्तंभासारखा काय उभा

राहिलास ! काय झाले ते बोलशील की नाहीं ?" दगडू रडत रडत म्हणतो, "काय बोलू, आईसाहेब ! श्यामराव पास.. " सुंदराबाई उतावळेपणानें वाक्य पुरे करितात, "पास झाले ना ?" दगडू म्हणतो, "नाहीं हो. देवाला तसे करणे नाहीं." सुंदराबाईंचं तोंड काळवंडून गेलं. किंचित् थांबून ती म्हणते, "आणि तू रे !" दगडू म्हणतो, "माझेंही कपाळ फुटलें. मी दळभद्या पास झालो. आईसाहेब, यापुढं मी शाळेची पायरी चढणार नाहीं." आपल्या उदार स्नेह्याचा हा निश्चय ऐकून श्यामराव म्हणतो, "दगडू, असं काय भलतं बोलावें ? मी नापास झालों यात तुझा काय गुन्हा ? तू आपलं जन्माचं अकल्याण का करून घेतोस ?" दगडू म्हणतो, "नाहीं, नाहीं; श्यामराव, आपण पहिल्यानं नापास झालात तेव्हांच मी शाळा सोडून द्यावयास पाहिजे होती. पण मी तेव्हां अजाण होतो. तो गुन्हा आपण आणि आईसाहेबांनीं मला माफ केला पाहिजे. मला कुणबटाला शिकून काय करावयाचं आहे ? कोठेंही मजुरी करीन तर आपल्या आशीर्वादानं पोटापुरतं मिळवीन."

नापास होण्याच्या दुःखाची उत्कटता वैधव्यदुःखाच्याइतकी नसली तरी स्वरूप त्याच्यासारखेंच असतं यात संशय नाहीं. नापास झालेल्यास कांहीं दिवस तरी आपला चेहरा अंधारात लपवून ठेवावासा वाटतो. आपल्या बरोबरीचीं मुलें वरच्या वर्गांत जाऊन नवीन पुस्तकें शिकत आहेत हें पाहून त्यास वाटणारा हेवा सुवासिनीस हळदीकुंकवास जाताना पाहून विधवेला वाटणाऱ्या हेव्याच्या मासल्याचा असतो. काही विद्यार्थ्यांनीं तर इतरास आपले अपेशी तोंड दाखविण्याची लाज वाटून प्राक्कालीन विधवाप्रमाणे प्राणांचाही त्याग केला आहे. श्यामचें हें पहिलेच अपेश होतें असें नाहीं. पण एकाच परीक्षेस नापास होण्याची ही त्याची तिसरी खेप असल्यामुळें तिनें त्यास शाळेस रामराम ठोकावा लागणार होता. एकाच वर्गांत अनेक वर्षें राहून विद्यार्थ्यांच्या अनेक पिढ्यास आपल्या संगतीचा लाभ देण्याचा सनातन हक्क विद्याखात्याच्या अर्वाच्य अधिकाऱ्यांनीं विद्यार्थ्यांपासून नुक्ताच हिरावून घेतला होता ! असो.

उभयतां मायलेक बळवंतरावांच्या आगमनाची चिंतातुर मुद्रांनीं वाट पहात बसलीं. संध्याकाळीं ते आले तेव्हां बायकोचें व मुलाचें निस्तेज तोंड



या घरावर तुझा आतां काडीइतका हक्क राहिला नाहीं. तें तुला या घटकेस सोडून गेले पाहिजे. [पृष्ठ ३१.

पाहून त्यांनी खरा प्रकार ताडला, आणि ते श्यामला म्हणाले, "अखेरीस नापासच झालास ना ! मला वाटलेच होते तसे. अशा आईकडून मिळालेल्या बुद्धीपासून व शिक्षणापासून दुसऱ्या कशाची अपेक्षा करावयाची ! ठीक आहे. आजपासून तुझा माझा संबंध तुटला. ब्राह्मणाचा मुलगा म्हणवून घ्यायचे असल्यास ब्राह्मणाची जबाबदारीही ओळखली पाहिजे. ती न ओळखल्यास ब्राह्मणाचे हक्कही मिळावयाचे नाहीत. केवळ माझा मुलगा म्हणून मी तुझे वाटेल ते लाड चालू देणार नाही. माझ्या स्वतःच्या व कुटुंबाच्या चरितार्थाची सोय करून उरलेली संपत्ति मी कोणत्या तरी सार्वजनिक संस्थेस देऊन टाकणार. त्या घरावर तुझा आता काडीइतका हक्क राहिला नाही. ते तुला या घटकेस सोडून गेले पाहिजे. यापुढे तुझा मार्ग निराळा व माझा निराळा. काबाडकष्ट करून भाकरी मिळविण्याचे कामी तुझे धष्टपुष्ट शरीर तुझ्या चांगले उपयोगी पडेल. आता मी तुला मेलो आहे व तू मला मेला आहेस. यापुढे मी तुझे तोंड पहाणार नाही व तू माझे पाहू नकोस." ही हद्दपारीची शिक्षा सुनावून बळवंतराव तसेच घराबाहेर पडले.

नवऱ्याचे निर्वाणीचे भाषण चालले असता सुदराबाई श्यामला आपणाजवळ अधिकाधिक ओढून घेत होती. बळवंतराव निघून जाताच तिने त्याला पोटाशी घट्ट धरिले, व त्याजवर अश्रुवर्षाव करण्यास सुरवात केली. बराच वेळ उभयता स्तब्ध बसली होती. अखेरीस श्याम म्हणाला, "आई, मला याच घटकेस घराबाहेर पडले पाहिजे." हे वाक्य ऐकून सुदराबाईस पुन्हा जोराचा हुंदका आला, व अत्यत निष्ठुर हृदयाचेही पाणी पाणी व्हावे अशा दीनवाण्या स्वराने ती म्हणाली, "बाळ, आणि मला एकटीला सोडून तू जाणार का ! तू निघून गेल्यावर मला कोण राहिले ! मी तरी येते तुझ्याबरोबर." श्याम स्वतःस तिच्या मिठीतून कष्टाने सोडवून म्हणाला, "आई, मी जरी निर्बुद्ध असलो तरी आचरणात बाबाचा मुलगा आहे. मला आपले कर्तव्य केले पाहिजे. श्याम नावाचा आपला कोणी नात्यातला मुलगा होता हे तू सुद्धा विसरून जा." हे वाक्य उच्चारताना त्याचे अतःकरण पिळवटून निघत असावे असे त्याच्या पिळवटलेल्या मुद्रेवरून व झरझर वहाणाऱ्या अश्रुप्रवाहावरून दिसत होते. सुदराबाई कळवळून

म्हणाली, " बाळा, असें अवघड बोलणे तुला कसेरे सुचतें ! तू निघून गेल्यावर मी क्षणभर तरी राहीन का ? " आपणास अधिकच बिलगलेल्या मातेचे हात निष्ठुर मनानें दूर करून श्याम घराबाहेर पडला, व त्यानें त्या घरावरून एकदा घाईघाईनें दृष्टि फिरविली. तथापि त्या घाईच्या दृष्टिक्षेपात त्याच्या कल्पनेनें त्याजसमोर किती तरी मनोहर चित्रे उभी केली ! विजेच्या धक्क्यानें अचेतनालाही जशी चेतना येते, त्याप्रमाणें मोठ्या संकटाच्या धक्क्यानें मंदधी मनुष्याची स्मरणशक्तिही खडबडून जागी होते व योगी जसा एका आयुष्याच्या साऱ्या घडामोडी एका क्षणात अनुभवावयास लावितो त्याप्रमाणे ती त्या मनुष्यास त्याच्या गत चरित्रातील साऱ्या गोष्टींची एका निमिषात स्मृति करून देते. त्या घराशीं श्यामच्या प्रेमाच्या, सुखाच्या व पावित्र्याच्या सर्व कल्पना निगडित झाल्या होत्या. तें त्याच्या मातृदेवतेचें मंदिर होतें. तेथ त्याचें मातृप्रेम अंकुरित होऊन वृद्धिंगत झालें होतें. मातेच्या प्रेमाचा निदर्शक नाही असा त्यातील एक कोपराही नव्हता. पदरी चाकरमाणस असताही तिनें त्यास लहानपणी ज्या माजघरात कडे-खांद्यावर घेऊन खेळविलें होतें तें माजघर, तिनें त्यास ज्या न्हाणीघरात नित्य स्नान घालून त्याचें अंग स्वतःच्या ओच्यानें पुसलें होतें तें न्हाणीघर, पदरी ब्राह्मण असताही तिनें स्वतः हातानें परोपरीचे पदार्थ करून त्यास ज्या स्वैंपाकघरात खाऊ घातलें होतें तें स्वैंपाकघर, त्यास मास्तर शिकवीत असतां एकलकोंडें वाटू नये म्हणून ज्या शिकण्याच्या खोलीत ती त्याची सोबत करीत तास तास ताटकळत बसत असे ती खोली, त्याची शाळेतून परत येण्याची वेळ झाली असता ती ज्या ओटीवर बसून त्याची मार्गप्रतीक्षा करीत असे ती ओटी, तो ज्या अंगणात पतंग उडवीत किंवा इतर खेळ खेळत असता ती त्यास मदत करीत असे तें अंगण, ज्या गच्चीवर ती त्याच्यासह तारकांकडे एकतानतेनें पहात बसे ती गच्ची, त्याचे वडील ज्या आपल्या बसण्याच्या खोलीत त्यास निष्ठुरपणे मार देत असता ती आडवी होऊन तो मार आपल्या अंगावर घेत असे ती खोली ही सर्व त्याला स्पष्टपणें दिसत होती. त्यांची व आपली ही शेवटचीच भेट हें त्यास कळून चुकलें. त्याचे क्षणिक निरीक्षण संपते तोंच तें घर त्यास जिच्यामुळे प्रिय झालें होतें ती सुंदराबाईच लगबगीनें येऊन काकुळतीनें

त्यास म्हणाली, " बाळ, ते बाहेरून परत आले म्हणजे मी त्यांच्यापाशीं तुझ्याबद्दल रदबदली करून पहाते. तोपर्यंत तरी तू जाऊ नकोस. तुला या घरीं बसावयाचे नसेल, तर दगडूच्या घरांत आपण बसू या." असे म्हणून ती त्यास हात धरून समोरच्या झोपडीवजा घरात नेऊ लागली. ज्या माउलीनें श्यामला जन्म दिला होता, त्याचे सारे कष्ट आनदानें सोसले होते. गेल्या अठरा वर्षांत त्याच्या निदिध्यासावाचून किंवा सुवेवाचून एक क्षणही घालविला नव्हता. त्याच्या मनाला दुःख वाटेल असें एकही कृत्य केलें नव्हतें, त्याजवरच आपल्या साऱ्या इच्छा, आशा, कल्पना एकवटून ठेविल्या होत्या तिची अखेरची इच्छा त्यास अमान्य करवेना. उभयता मायलेकरें दगडूच्या घरी जाऊन तेथ एक-मेकास बिलगून बसून राहिलीं. त्यांच्या एकांताचें पावित्र्य आपल्या सांनिध्यानें दूषित करणें योग्य न वाटून दगडू व त्याची आई बाहेर निघून गेलीं, आणि श्याम व त्याची आई हीं दोघच काय ती तेथ राहिली. तीं बराच वेळ अश्रूंनीं डबडबलेल्या डोळ्यांनीं एकमेकाकडे पहात व पर-स्परास प्रेमानें कुरवाळीत बसलीं होतीं. वारंवार येणाऱ्या हुंदक्यामुळे अशक्य झालेलें संभाषण तीं प्रथम परस्परनिरीक्षणानें करीत होतीं. पुढे अश्रुप्रवाहामुळे तेंही नीट होईना. तेव्हां तीं केवळ परस्परास स्पर्श करूनच एकमेकांचे हृद्गत ओळखूं लागलीं. मुके व अंधळे ज्याप्रमाणें केवळ स्पर्शानें पुस्तकें वाचतात त्याप्रमाणें तीं परस्परांचे अतःपट केवळ स्पर्शानें वाचीत होतीं. त्यांच्या धडधडणाऱ्या हृदयांकडूनही त्यांस मधून मधून परस्पराच्या हृदयात चाललेल्या खळबळीचे बिनतारी संदेश मिळत होते. ही भेट शेवटचीच आहे असें उभयतास मनातून वाटत होतें, व पुढें कठाव-याच्या दीर्घ विरहकालांत परस्पराच्या भावनात्मक जीविता्स पुरेल इतका प्रेमरूप अन्नाचा पुरवठा या अल्प अवधींत एकमेकास स्पर्शद्वारा करून देण्याचा त्यानीं संकल्पच केल्यासारखा दिसत होता. अखेरीस बळवत-रावांच्या खोलीची एक खिडकी जोरानें उघडून ते घरी आल्याची सूचना मिळाली, त्याबरोबर घाईघाईनें सुंदराबाई उठली व म्हणाली, " बाळ, मी जाते, आणि तुला घरीं नेण्याची परवानगी घेऊन लवकरच परत येते. तोपर्यंत येथेच बसून रहा. ही मी आलेच." असे म्हणून ती झोपडीचे दार

उघडते तोंच त्या दारावाटे बाहेरून थंडगार वाऱ्याचा सोसाटा येऊन अंगास झोंबू लागला. त्याबरोबर तिचे अंग थरारले, व ती कळवळून म्हणाली, "माझे बाळ या थंडींत कुडकुडत कसें बसणार ? बाळ, ही माझी चौघडी घे अंगावर." असें बोलून तिने आपली पांघरण्याची चौघडी त्याच्या अंगाभोंवतीं गुंडाळली, व त्याजवर एक शेवटची नजर टाकून ती निघून गेली. त्या नजरेंत त्याजबद्दल वाटणारे उत्कट प्रेम व त्याच्या भावी स्थितीबद्दल वाटणारे पराकाष्ठेचें कारुण्य ही दोन्ही एकवटलेली होतीं. त्या नजरेचें श्यामला पुढें कधींही विस्मरण पडलें नाहीं.

आपल्या आईच्या वकिलीस यश येईल अशी श्यामला मुळींच आशा नव्हती. बापाचा करडा स्वभाव व आईचा गरीब स्वभाव त्यास चांगला माहीत होता. ती गेल्यावर लवकरच त्यास बळवतरावाच्या खोलीतून त्यांनीं उच्च स्वरात उच्चारलेलीं रागाचीं भाषणें व सुंदराबाईनें केविलवाण्या स्वरात केलेल्या विनवण्या ऐकूं येऊं लागल्या. हळूहळू विनवण्याचा स्वर मंद होऊं लागला, व त्यांची जागा रुदनानें घेतली. सुंदराबाईच्या प्रत्येक हुंदक्याबरोबर तिचे पंचप्राण गोळा होऊन वर येत आहेत कीं काय असें त्यास वाटूं लागलें. त्याचा एकदम निश्चय झाल्यासारखा दिसला. जवळच दगडूचें धोतर, दुपेटा, बंडी, अंगरखा व टोपी पडलीं होतीं, तीं त्यानें आपल्या अंगावर चढवून आपले जुने कपडे गुंडाळा करून त्याच्या जागीं ठेविले, आणि सुंदराबाईची चौघडी जवळ पडलेल्या एका फडक्यात गुंडाळली. त्यानंतर त्यानें खिशातून कागद पेन्सिल काढून त्या कागदावर दगडूस उद्देशून "मी तुझे कपडे व तुझ्या अंगरख्याच्या खिशात असलेली रक्कम कांहीं दिवसाकरितां घेऊन जात आहे. लवकरच ती रक्कम आणि ते कपडे अगर त्यांची किंमत परत करीन. माझे जुने कपडे माझ्या जुन्या घरीं पोंचते करावे." असा मजकूर लिहून तो कागद दगडूस ताबडतोब दिसावा अशा बेतानें ठेवून दिला, व चौघडीच्या बोचक्यासह झोपडीच्या बाहेर पडून स्टेशनचा रस्ता धरिला.

कांहीं वेळानें सुंदराबाई दगडूच्या व त्याच्या आईच्या मदतीनें त्या जागीं आली तेव्हां ती वीस वर्षांनीं म्हातारी झाल्यासारखी दिसत होती. तिचे पाय लटलटा कांपत होते. तिनें आत येतांच घाईघाईनें आपली

दृष्टि सभोवार फिरविली, व तेथे कोणी नाही हे दिसतांच ती एक निराशेची लहानशी किंकाळी फोडून धाडकन् खाली पडली. पण पुन्हां निराशेच्या काळ्याकुट्ट अंधकारात आशेचा एक क्षीण किरण दिसल्यामुळें ती मोठ्या कष्टानें उठून बसली, व तिने श्यामचे कपडे होते तेथपर्यंत फरपटत जाऊन ते उलगडून पाहिले. ते देहशून्य कपडे तिला प्राणहीन देहाप्रमाणे वाटले. नंतर तिने त्या लहान झोपडींतील इतर चिरगुटें, भांडीं वगैरे जिन्नस उलथे पालथे करून पाहिले. श्याम कोठेही दडून बसला नाहीं अशी खात्री होताच ती श्यामचे कपडे उराशी धरून शून्य दृष्टीने समोर पहात व असह्य शारीरिक पीडा होत असता आसन्नमरण मूक पशु ज्या मंद व दीर्घ स्वरात विव्हळताना दिसतात त्या स्वरांत रुदन करीत बसली. दगडूने व त्याच्या आईने तिला काहीं वेळाने घरीं पोचविले तेव्हा ती जवळजवळ मूर्च्छितावस्थेंत होती.

## प्रकरण तिसरें

# स्थलांतर

श्याम स्टेशनावर जाऊन पोचला तेव्हां पुढील गाडी निघण्यास दहा मिनिटांचाच काय तो अवकाश होता. तिकिटास नुक्तीच सुरवात झाली होती. पण न जाणो आपणास स्टेशनावरील एखादा इसम ओळखील या भीतीनें स्वतः तिकीट काढण्यास त्याचा धीर होईना. कोठें जावयाचें हेंही त्याचें ठरलें नव्हतें. म्हणून तो तिकीट ऑफिसाच्या जवळच एका काळोखाच्या जागेत भिंतीवर डोकें टेकून उभा राहिला. उतारूनें गांवाचें नांव उच्चारावें व तिकीटमास्तरानें भाड्याची रक्कम सांगून ती मिळताच तिकीट द्यावें असा क्रम चालू होता. याप्रमाणें अनेक उतारूनीं तिकिटें घेतलीं. इतक्यांत साधाभोळा व संभावित दिसणाऱ्या एका वृद्ध कुणब्यानें 'चिमणपुर' हें नांव उच्चारिलें. त्याबरोबर कसलीशी आठवण होऊन श्यामनें वर पाहिलें व धीर करून "म्हातारे-बाबा, माझ्याकरितांही त्याच गावचें एक तिकीट काढता का?" असें त्यास म्हटलें. म्हाताऱ्यानें तिकीट काढून श्यामच्या स्वाधीन केलें, व त्यानें दिलेले भाड्याचे पैसे ठेवीत तो म्हणाला, "बरी सोबत झाली. एकाच डब्यांत बसू. चिमणपुराला कामधंदा पहायला जायचें असेल?" श्याम मान हलवून वृद्धाजवळच गाडीची वाट पहात धक्क्याच्या एका बाजूस काळोखात उभा राहिला. हा वेळपर्यंत उत्कट भावनांच्या चक्रांत सांपडल्यामुळें त्यास पुढील बेत ठरविण्यास सवड सापडली नव्हती. वृद्धाशीं खुलासेवार गोष्टी होण्यापूर्वी त्यास आपण यापुढें कोणती भूमिका घ्यावयाची हें मुक्रर करणें भाग होतें. सबब गाडी येईपर्यंतच्या अवधींत तो आपल्या भावि चरित्राची ठळक रूपरेषा ठरविण्यांत मग्न होऊन राहिला.

त्याचा एक जन्म संपून दुसऱ्या जन्मास आरंभ व्हावयाचा होता. पूर्व जन्मांतील कर्मानुसारें पुढील जन्म मिळतो हा नियम अमलांत आणि-ल्यास त्यास यापुढें शूद्र म्हणूनच राहणें भाग होतें. ब्राह्मणाचे अंगीं सामा-

न्यत्वे असणारी बुद्धिमत्ता त्याच्या अंगीं नव्हती. अध्ययनास व अध्यापनास तो अगदीं अपात्र होता. खुद्द त्याच्या जनकाने त्याचे शूद्र म्हणून अनेकदां वर्णन केले होते, आणि शेवटी तर त्याचा व आपला नात्याचा संबंधही तोडून टाकिला होता. कर्मधर्मसयोगानें हल्ली त्याच्या अंगावर असलेले कपडेही शूद्राचेच होते. उच्च ज्ञातीत अधम ठरण्यापेक्षां नीच मानिलेल्या ज्ञातीत श्रेष्ठ ठरणे श्रेयस्कर आहे असें त्याच्या मनाने घेतलें, व यापुढे शूद्र म्हणूनच रहाण्याचा त्याने संकल्प केला.

लवकरच गाडी फो फो करणाऱ्या नागिणीप्रमाणे सुस्कारे टाकीत येऊन उभी राहिली, व उतारू लोक डब्यात जाऊन बसले. स्थिरस्थावर होताच गाडीने शिटी फुकून पुढील मार्गक्रमणास सुरवात केली. ती धक्क्यापासून कांही अंतरावर जाताच श्यामला आपले गाव दिसू लागले. आकाशात चंद्र उगवला नसल्यामुळे अजून चोहोकडे अंधकाराचेंच साम्राज्य होते. तरीही अज्ञानयुगात मधून मधून दृग्गोचर होणाऱ्या सत्य-सिद्धांतांप्रमाणें कांही चुनेगची व उंच हवेल्या नजरेस अस्पष्टपणें दिसत होत्याच. त्यातच श्यामने आपले म्हणून आजपर्यंत म्हटलेले घर होते. ते अंधारात गुरफटून गेले होते. पण त्यातील एका तरी व्यक्तीचे अंतःकरण त्यापेक्षाही गाढ अंधकारात बुडून गेलें असले पाहिजे अशी त्याची खात्री होती. आपण आईपासून वायुवेगाने दूर जात असतां ती एकटी अश्रु ढाळीत निश्चलपणे बसली असेल! तिच्या पुत्रप्रेमाचे याहून अधिक बक्षीस देण्याचें आपल्या हाती नसावे ना! उद्या प्रातःकाळीं सर्व जगास सूर्योदय होईल. पण तिच्या हृदयांतील गाढ अंधकार आमरण कायमच रहाणार ना! असे विचार मनांत घोळू लागल्याबरोबर त्याच्या पोटांतून भडभडून आले, व डोळ्यातून उष्ण अश्रु झरावयास लागून गालावरून वाहू लागले. परंतु ते पुसावयास सुंदराबाई थोडीच येणार होती! आपल्या आवडत्या घराचे अस्पष्ट का होईना, पुन्हा एकदां दर्शन घेण्याकरितां त्याने ते अश्रु स्वतःच घाईघाईनें पुसले, व फिरून त्या दिशेने पहातो तो त्यास आपले घर दृष्टीच्या टप्प्यापलीकडे गेल्याचें दिसून आले. ज्याप्रमाणे चातुर्वर्ण्यसंस्था हजारों वर्षे रूढिमार्गानें अविच्छिन्नपणे चालत आली आहे त्याप्रमाणें आपल्या उदरांतील भिन्नभिन्न वर्गांच्या शेकडो उतारूंसह गाडी लोह-

मार्गानें द्रुतगतीनें मैलामागें मैल टाकीत धावत चालली होती. तिच्यांतील पहिल्या व दुसऱ्या वर्गाचे उतारू मऊ गाद्यांवर निद्रेच्या स्वाधीन होऊन पडले होते. तिसऱ्या वर्गाचे उतारू मात्र डब्यांतील गर्दीमुळे ताटकळत व अवघडत बसून राहिले होते. वरील वर्गाच्या डब्यांत जाऊन हातपाय लांब करण्याची किंवा उभे रहाण्याचीही त्यांस मुभा नव्हती. त्या व त्यांच्या स्वतःच्या डब्यामधी ऽ मर्यादा जातीजातींमधील मर्यादासारख्याच अनुल्लंघनीय होत्या. बिचाऱ्या श्यामचा प्रवास यापुढे गाडीच्याच केवळ नव्हे, तर समाजाच्याही तिसऱ्या वर्गातूनच व्हावयाचा होता. परंतु त्याबद्दल त्यास विशेष खत वाटत नव्हती. "ब्राह्मणांचे हक्क पाहिजे असल्यास त्यांची जबाबदारीही ओळखिली पाहिजे." अशा अर्थाचे जे उद्गार बळवतरावांनी काढिले होते ते त्याच्या मनांत सारखे घोळत होते, व त्याच्या सरळ मनास त्यांत कांही वावगेंही दिसत नव्हते. आपण जी जात आपण होऊन पत्करिली आहे तिची कर्तव्ये तरी आपल्या हातून कितपत पार पडतात याची त्यास साधार शंका वाटत होती.

गाडी दर स्टेशनावर कांही वेळ हाशहुश करीत उभी राही, व कांहीं जुन्या उतारूचा त्याग करून व काही नव्या उतारूस अन्नादाखल उदरांत जागा देऊन पुन्हा नव्या दमाने धांवूं लागे. ज्याप्रमाणे जीवितयात्रा संपली म्हणजे मानवी प्राणी आपल्या संचित पापपुण्यासह संसारांतून मुकाट्यानें निष्क्रमण करितात त्याप्रमाणे मुक्कामाचीं स्टेशनें येतांच उतारू आपल्या बोचक्यासह गाडींतून उतरत असत, व प्रत्यहीं जन्मास येणारे जीव ज्या-प्रमाणें मृतांची जागा भरून काढितात त्याप्रमाणे नवेनवे उतारू गाडींत चढून जुन्या उतारूंच्या जागीं बसत असत. गाडीचें व संसाराचें हें सादृश्य लक्ष्यांत येऊन श्यामला कांहींसें दुःखमिश्र समाधान वाटलें. जर हा संसार आगगाडीसारखा असून आपला प्रियजनांशीं कधी तरी विरह होण्याचे ठरलेले आहे तर मग तो विरह कांहीसा अगोदर झाला तर त्यांत काय बिघडलें ! आपल्या व आईच्या आत्म्यांचा कायमचा वियोग जर अवश्यभावी आहे तर देहांचा चिरविरह झाल्याचें दुःख मानण्याचे काय प्रयोजन उरले ! या विचाराच्या मागोमाग आपल्या आईचा आत्मा आपल्या लाडक्याचा शोध करीत अनंतकालापर्यंत सर्व विश्वभर भ्रांत

चित्तानें भ्रमण करीत आहे असे एक कल्पनाचित्र त्यासमोर उभें राहिलें, व ते कांही केल्या दूर होईना. उलट गाडीच्या सभोवतालीं दिसणाऱ्या असंख्य ठिणग्या व काजवे हे जीवात्मे असून त्यांजमधून सुदराबाई गाडीच्या रूपानें आपल्या शोधार्थ रात्रदिवस फिरत आहे असे विशिष्ट रूप त्या कल्पनाचित्रानें लवकरच धारण केलें. त्याचे काहींसे खेदानें व कांहींसे समाधानपूर्वक चिंतन करीत तो उपमानभूत गाडीच्या उदरांतील एका कोपऱ्यांत बराच वेळ मुकाट्यानें बसून राहिला.

श्यामची उद्विग्न स्थिति निकटच्या आप्तांपासून लहान वयात दूर यावे लागल्यामुळेच झाली आहे व त्या स्थितींत त्यास प्रश्न करून त्रास देणें बरे नव्हे असें वाटून तो वृद्ध कुणबी आपलें त्याजकडे लक्ष्य नाही असें दाखवीत स्वस्थ बसला होता. बाहेर थंडीचा कडाका पडला होता. श्यामच्या अंगावर उबदार असें कांहींच नव्हतें. ती उणीव भरून काढण्याकरिता त्या वृद्धानें आपल्याजवळची एक जुनी घोंगडी काढून श्यामच्या पुढें केली. श्यामनें आतापर्यंत रेखाटलेलें भावी स्थितीचें चित्र कल्पनासृष्टींतलें होतें. तें चित्र घोंगडीचें खरेखुरें रूप घेऊन त्यासमोर येताच त्याच्या चित्तास चांगलाच धक्का बसला. नेहमीं अंगावर असणारी शालजोडी व त्या क्षणीं समोर आलेली घोंगडी यांजमधील तफावत लक्ष्यांत येऊन त्यास त्या कुणब्याच्या फाजील आदरातिथ्याचा क्षणभर रागही आला. पण आपल्या स्थित्यंतराशीं या बिचाऱ्याचा कांहीं संबंध नसून तें आदरातिथ्य तो मनोभावानें करीत आहे व त्या घोंगडीची किंमत आईच्या चौघडीच्याइतकीच आहे हें लागलीच त्याच्या ध्यानांत येऊन त्यानें त्या घोंगडीचा कृतज्ञतापूर्वक स्वीकार केला.

दुसरे दिवशीं प्रातःकाळीं सूर्योदय होऊन चोहोंकडे प्रकाश पसरला. तथापि श्यामच्या हृदयात अंधकारानें दिलेलें ठाणें अजून कायमच होतें. लोकसेवेस वाहिलेल्या रविरथाप्रमाणें अग्निरथही रात्रीच्याइतक्याच वेगानें धांवत होता. तें पाहून आपल्या निष्क्रियतेची लाज वाटूनच की काय, श्याम आपल्या जागेवरून खडबडून उठला. त्यानें वृद्धाजवळच्या भांड्यांतील पाण्यानें चूळ भरली, व वृद्धास घोंगडी परत देऊन त्याचे आपल्या नेत्रांनीं आभार मानिले. वृद्धानें आपलें गांठोडें उघडून

त्यांतून भाकरी व चटणी काढली, व श्यामच्या पुढें केली. घोंगडी अंगाबाहेरून घ्यावयाची असल्यामुळे तिचा स्वीकार करिताना श्यामनें कांहीं आढेवेढे घेतले नव्हते. पण कुणब्याच्या घरी कुणबिणीच्या हाताने व विटाळलेल्या पाण्याने तयार झालेल्या त्या भाकरीस जिभेनें स्पर्श करण्यास त्याचे मन घेईना. त्याने भूक नसल्याची सबब पुढे केली. ती ऐकून वृद्ध गृहस्थ हिरमुरल्या मुद्रेने आपली न्याहारी पुन्हा गाठोड्यात बांधण्याच्या तयारीला लागला. ते पाहून श्याम म्हणाला, "बाबा, मला भूक नसली म्हणून तुम्हाला खाण्याला काय हरकत आहे?" वृद्धानें उत्तर दिले, "तुझ्यासारख्या कोवळ्या पोरानें उपाशी रहावें आणि माझ्यासारख्या वाळलेल्या खोडाने आपलें पोट भरावें म्हणतोस? नाहीं नाहीं, तें होणार नाही. दोघेही बरोबर खाऊ अगर दोघेही उपाशी राहू." ते प्रेमाचे उद्गार ऐकून श्यामने आपला विचार बदलला, आणि तो म्हणाला, "बाबा, काढा ती भाकरी बाहेर. तुमच्याबरोबर मीही दोन घास खाईन." म्हाताऱ्याचा चेहरा लागलीच खुलला. त्यानें पुन्हा चटणभाकरी बाहेर काढिली; व उभयतांनी ती लवकरच खाऊन टाकिली. ती खातांना श्यामला सुंदराबाईनें स्वहस्तानें वाढलेल्या सुग्रास अन्नाची आठवण होत होती. त्या अन्नाची रुचि जरी या भाकरींत नसली तरी प्रेमाने तिलाही चांगलाच स्वाद आला होता. सहभोजनानें आपलेपणा किती वाढतो याचा श्यामला आज प्रत्यक्ष अनुभव आला.

या व पुढील प्रकरणांत ब्राह्मणेतराच्या तोंडी जी भाषा घातली आहे ती वास्तविक पहाता तिच्या अस्सल अब्राह्मण स्वरूपांतच देणे जरूर होते. पण वाचकाच्या सोईकरिता सरसकट भाषेची एकरूपता ठेवणे इष्ट वाटल्यावरून त्या अस्सल भाषेस शुद्ध ब्राह्मणी थाटाचें स्वरूप दिलें आहे. कल्पक वाचकांस त्या ब्राह्मणी भाषेचे अब्राह्मण भाषेत परत रूपांतर करणे कठिण जाणार नाही.

सकाळीं दहा वाजण्याच्या सुमारास चिमणपुर स्टेशन आले. वृद्धापाशीं फारसें सामान नव्हतेंच. विंचवाच्याप्रमाणे गरिबाचेंही बिऱ्हाड पाठीवरच असावयाचें. तो आपलें गाठोडें उचलू लागला. पण श्यामने "बाबा, आपणांला तसदी पडल्यावर आम्ही पोरें कशाला!" असे म्हणत आपल्या बोचक्या-

बरोबर ते गाठोडेंही हातीं घेतले, व लवकरच उभयतां स्टेशनाबाहेर पडले. तो वृद्ध पुढे व श्याम मागून याप्रमाणे काही वेळ चालून गेल्यावर गावाची वस्ती लागली, व आणखी काही वेळाने वृद्धाचे घर आले. श्यामने वृद्धाचें सामान घरात नेऊन ठेवले, व तो वृद्धाचा निरोप घेणार इतक्यात वृद्ध त्यास म्हणाला, "पोरा, येथं तुझं कोणी ओळखीचे नाहीं हे मला ठाऊक आहे. आता धंदा मिळेपर्यंत आमच्याच घरी रहा. पुढे सुद्धा येथेच रहाण्याला तुला काही हरकत नाही. आम्ही जरी श्रीमंत नसलो तरी देवाच्या दयेने आजच्या घटकेस पोटाला कमी नाही. जसा आमचा हैबती अगर चंदू तसाच तू. संकोच करण्याचे काहीं कारण नाही." असे म्हणून त्याच्या कमरेस व गुडघ्यास बिलगलेल्या आणि त्याच्याभोवती आनंदाने गोळा झालेल्या लहान मोठ्या मुलाबाळास उद्देशून तो म्हणाला, "ऐकलेत रे! हा तुम्हाला एक नवा भाऊ आणला आहे. तो तुमच्यापैकीच आहे असे समजायचे बरं?" हे ऐकून ती सारी मुले आपल्या नवख्या पाहुण्याच्या तोंडाकडे टकमका पाहू लागली. त्या मुलांचीं वये पंचवीस व पांच वर्षांच्या दरम्यान तीनतीन चारचार वर्षांच्या अंतरानं असून त्यांची शरीरेही उंचीने शिडीच्या पायऱ्याप्रमाणे एकाखाली एक अशी होती, व त्याजकडे तो कुटुंबवत्सल पिता, ती स्वर्गास चढण्याची सोपानपरंपरा वाटूनच की काय, अभिमानाने पहात होता. श्यामचा प्रेमळ व हसरा चेहरा पाहून हा आपला भाऊ शोभण्यासारखा आहे अशी त्यांची खात्री झाल्यासारखी दिसली; व त्यांनीं एका दिलाने समाधानपूर्वक माना हलवून बापाच्या म्हणण्यास संमति दर्शविली. इतक्यात त्यांची आईही स्वयंपाकघरातून लगबगीनें बाहेर आली. श्यामकडे पाहून तिला समाधान वाटल्यासारखे दिसले. तिने आपल्या कडेवरील तान्हे मूल आपल्या नवऱ्याच्या स्वाधीन केले. तें मल्हारीबाबांनीं (हे त्या वृद्धाचे नाव होते.) श्यामपुढे धरिताच तोंडाने 'ना ना' करीत त्याजकडे जाण्यासाठी झाप टाकू लागले. ते पाहून बाबा म्हणाले, "कायहो पाहुणे, आमच्या लहानग्याची आणि तुमची फार दिवसापासून जानपछान दिसते आहे. याला तुमचे नावही माहीत आहे."

श्याम:—माझे नाव नाना मराठे आहे खरेच. याला कसें कळलें कुणास ठाऊक!

हे ऐकून सारी मंडळी आश्चर्याने थक्क झाली. याप्रमाणे श्यामचें या नवीन जन्मांतील नामकरण एका अर्भकाकडून यदृच्छेनेच झाले. यापुढें त्यास चिमणपुरचे लोक नाना मराठे या नांवानेच ओळखू लागले.

मल्हारीबाबास परत आलेले पाहून गोठ्यांतील जनावरांसही आनंद झाल्यासारखे दिसले. त्यांना गुराख्याने रानांत चरावयास नेण्याकरिता नुक्तेच मोकळे सोडिले होते. परंतु त्यांनी आपल्या मालकास पहातांच गुराख्याबरोबर जाण्याऐवजीं मल्हारीबाबांकडे एकदम धूम ठोकिली, आणि हंबरडे फोडून, कान टवकारून, मालकाचे हातपाय चाटून व त्याच्या अंगास आपले अंग घांसून त्या मुक्या प्राण्यांनी आपला आनंद प्रकट केला. मल्हारीबाबांनींही प्रेमानें प्रत्येकाच्या मानेवरून व अंगावरून हात फिरवून आणि पाठ थोपटून त्यांचे समाधान केले. खेडवळ माणसे पदरच्या गुराढोरांना आप्तांप्रमाणेच लेखीत असतात. साधी रहाणी, सरळ स्वभाव, मर्यादित ज्ञान, अबोलपणा इत्यादि बाबतीत त्यामध्ये एक प्रकारचे साम्य असते. शिवाय खेड्यातील घर तो गोठा व गोठा ते घर असल्यामुळे त्यांचा परस्परांशी सहवासही निकट व सतत होत असतो. याप्रमाणे त्यांजमध्ये कोणत्याही बाबतीत फारसे अंतर नसल्यामुळे उभयतांची मैत्री सहज घडून येते.

श्यामने मल्हारीबाबाच्याच घरातील एक खोली दरमहा एक रुपया भाड्याने रहावयास घेतली. भाडे घेण्यास बाबा मुळीच कबूल होईनात. पण आपण हेका न सोडिल्यास श्याम रहाण्याची सोय दुसरीकडे करील अशी खात्री होताच त्यांनी त्या गोष्टीला आपली संमति दिली. त्यांस श्यामबद्दल इतके प्रेम वाटू लागले होते, की तो दूर रहाण्यापेक्षां आपणास अप्रिय असलेली भाड्याची शर्त कबूल करणेही पुरवले असे त्यांस वाटले.

दगडूच्या पैशांपैकीं अजून कांहीं शिल्लक होते. त्यांतून श्यामने जोंधळे, मीठ, मिरची, घोंगड्या इत्यादि आवश्यक वस्तूंची खरेदी केली. प्रेमळ मातेच्या हातच्या सुग्रास अन्नावर पोसलेल्या व अंगावर उंची पांघरुणें घेऊन मऊ गाद्यांवर लोळणाऱ्या श्यामला स्वतःचा उपासमारीपासून बचाव करण्याकरिता भाकरी व तिखट यांवर व शीतनिवारणार्थ कांबळ्यांवर मदार ठेवणे भाग पडूं लागलें. झोपण्यापूर्वी अंगावरील कांबळ्यास आंतून

सुंदराबाईची चौघडी जोडण्यास मात्र तो कधींही विसरत नसे. ही मायेची शाल पांघरून तो निजला म्हणजे आपण आईच्या कुशींत व बाहुपाशांत पडलों आहोत अशी तो मनाची समजूत करून घेई; व त्यामुळें त्यास स्वस्थ झोप लागे.

निवाऱ्याची व अन्नवस्त्राची सोय लागल्यावर पोटाचा धंदा पहाणें जरूर होतें; व त्याच्या शोधास तो जारीनें लागला. कुणब्याची सारीं कामें आपणास करितां यावीं अशी त्याची मनापासून इच्छा होती. एखाद्या कुटुंबात गडी म्हणून बांधलेल्या पगारावर पारतंत्र्यांत रहाणें मात्र त्याला पसंत नव्हतें; म्हणून तेवढें काम सोडून हेलकरी, हमाल, रोजदार इत्यादि भिन्नभिन्न पेशात तो काबाडकष्ट करून मजूरी मिळवूं लागला. त्याचें शरीर मूळचेंच सुदृढ व निकोप असून व्यायामामुळें व पौष्टिक अन्नामुळें ते गोटीदार बनले होतें. त्याच्या जोरावर आपणास हमालाचा धंदा चांगला साधेल असें त्यास वाटत होतें. त्यास दगडूचें कर्ज शक्य तितक्या लवकर फेडावयाचें होतें, व हमालाच्या धंद्यात होणाऱ्या किफायतीवर आपण तें लवकरच फेडूं अशी त्यास उमेद वाटत होती. म्हणून त्यानें थोड्याच दिवसात मल्हारीबाबाच्या ओळखीनें स्टेशनावरील हमालात प्रवेश करून घेतला. पण त्यास तें काम प्रथम जितकें सोपें असेलसें वाटलें होतें तितकें नाहीं असें लवकरच दिसून आलें.धान्याचीं पोतीं व कापसाच्या गांठी वाहून त्याची कंबर दुखूं लागे,व त्याच्या हातापायांस गोळे येऊं लागत. मालाच्या घर्षणामुळें त्याचे नाजूक हात सोलल्यासारखे होत, त्यास फोड येत आणि लोखंडी पट्ट्यांनीं व खिळ्यांनी त्यास ओरखडे पडत. त्यास थोडेसें दुखूं खुपूं लागल्याबरोबर घाबरी होणारी त्याची आईही या वेळीं त्याचें अंग चेपण्यास व त्याच्या हातांपायास तेल चोळण्यास जवळ नव्हती. कधी कधी तर रक्तबंबाळ झालेल्या हातांनीं स्वयंपाक करण्यास असमर्थ होऊन त्यास कांबळीवर उपाशीच पडावें लागे. अशा वेळीं पोटांत भूक व अंगास ठणका लागून तो तळमळत असतांही त्यानें अंगावर आईची चौघडी घेतली कीं तो सारें शीण विसरून जाई; व एका क्षणांत वर्तमानकालांतून भूतकालांत उडी मारून आपण आपल्या वडिलांच्या घरांत आईच्या मांडीवर डोकें टेकून तिच्याशी हितगुज करीत आहोंत या गोड कल्पनेत मग्न होऊन जाई.

'अरबी भाषेतील सुरस व चमत्कारिक गोष्टी'त असल्याबरोबर इच्छित स्थलीं पोंचविणाऱ्या एका सत्रजीचे वर्णन आहे. तिच्याच मासल्याची सुंदराबाईची चौघडी होती. ती पांघरल्याबरोबर श्यामच्या झोपडीचें टोलेजंग इमारतीत व त्याच्या कांबळीचे हातभर उंच अशा गादींत रूपांतर होत असे. कल्पनाशक्तीची किंमत लोखंडाचें तात्काळ सोनें करणाऱ्या परिसाहूनही अधिक आहे. पशु व मनुष्य यांमध्ये अंतर पडण्यास विवेकशक्तीपेक्षां कल्पनाशक्तिच कारणीभूत झाली आहे. तिच्या जोरावर विरही स्थलकालाचे अंतर नाहींसे करून प्रियजनाशीं प्रेमालाप करितो, व बाह्यात्कारी अनन्वित छळ अनुभवणारा देशभक्त व धर्मनिष्ठ स्वर्गसुख भोगितो. मनुष्यास भूतकाल व भविष्यकाळ असतो तसा पशूस नसतो. कंटाळवाणा वर्तमानकाळच आयुष्यभर त्याचा सोबती असतो. उलट पक्षीं मनुष्यास निश्चित भूतकालांत वाटेल तेव्हा आणि अनिश्चित भावी कालात वाटेल तेव्हां व वाटेल तसा संचार करण्याची पूर्ण स्वतंत्रता असते. श्यामची विवेकशक्ति जरी दुर्बल असली तरी कल्पनाशक्ति दांडगी होती; व त्यानें आपल्या झोपडीचे दार आंतून बंद करून घेतले म्हणजे आंतील अंधारांत तो चौघडीच्या आधाराने आपले सारे गत जीवन वसवीत असे. अतिश्रमानें आलेल्या गाढ झोपेत त्यास मधून मधून जीं स्वप्नें पडत तींही गत कालांतीलच असत. याप्रमाणे त्याचा दिवस वर्तमानकालांत व चिमणपुरांत तर त्याची रात्र भूतकालांत व हरिणपुरांत जात असे.

हमालीचा धंदा आपणास झेपणार नाही असे आरंभीचे काहीं दिवस जरी श्यामला वाटत होते तरी त्याच्या इच्छाशक्तीनें अखेरीस त्या धंद्यावर विजय मिळविलाच. प्रत्यही पडणाऱ्या कामाच्या बोज्यानें एखादे वेळीं त्याचा धीर खचूं लागल्यास तो दगडूचे कर्ज आपल्या नजरेसमोर उभे करी, आणि त्याबरोबर त्याच्या अंगांत नवीन उत्साह संचरू लागे. आपल्या सुखाकडे पाहून दगडूस अडचणींत टाकणे त्यास मुळींच इष्ट वाटत नव्हतें; व म्हणून त्यानें आपले सर्व सामर्थ्य नेटाने आपल्या धंद्याकडे लाविलें. सवईने अंगवळणीं न पडण्यासारखे जगांत एकही काम नसेल. लवकरच श्याम आपल्या कामांत तरबेज झाला. इतर हमालांच्या मानाने श्यामचे बरेच शिक्षण झाले होतें. यामुळे प्रसंगीं त्यांजकडून न होणारीं कामेंही तो शक्तीस युक्तीची जोड

देऊन पार पाडीत असे. त्याचे अंगी अंगचोरपणा मुळीच नव्हता. हक्कास पात्र होण्यापूर्वी जबाबदारी पार पाडतां आली पाहिजे हे तत्त्व तो बळवंतरावांपासून पूर्वाश्रमाच्या अखेरीस शिकला होता; व त्याबरोबर अनुभवाच्या लागलेल्या अनेक तीव्र भावनामुळे ते तत्त्व त्याच्या चित्तावर स्पष्टपणे ठसलें होते. मिळणाऱ्या पैशाच्या मोबदल्याचे पुरे माप दिल्याशिवाय त्यास समाधान वाटत नसे. प्रत्येक काम तो जलद, कसोशीनें व काळजीपूर्वक करी. आदळआपट करून सामानाचे नुकसान तो कधीही करीत नसे. फळांच्या पार्सलाकडे त्याने कधीही सतृष्ण दृष्टीनें पाहिले नाही. यामुळे मालाचे धनी व स्टेशनावरील अधिकारी असे दोघेही त्याच्या कामावर खूष असत व त्यास इतर हमालापेक्षा बहुमानाने वागवीत. ते त्यास एकेरी नावाने हाक न मारता अनेकवचनीच संबोधीत असत. त्याला लिहितां वाचता येते असे कळल्यापासून तर त्याची फारच चहा होऊ लागली. ज्याला त्याला आपल्या कामास नाना असावासा वाटू लागला. त्याच्या मनांत आले असते तर त्याला पैशाची बरीच पैदास करून घेतां आली असती. पण ठराविक वेतनापलीकडे एका पैसही तो शिवत नसे. यामुळे त्यास मिळकत जरी कमी होई तरी त्या मिळकतीच्या अगणितपट मोलाची पत त्यास प्राप्त झाली. तो कोणतेही काम करण्याचे वचन विचारपूर्वकच देत असे; पण एकदा तोंडातून शब्द गेल्यावर तो ते कितीही श्रम पडले तरी अक्षरशः पाळीत असे. यामुळे त्याच्या शब्दाची किंमत वाढून त्यास दर्शनी हुंडीइतका मान मिळू लागला. करारी व प्रामाणिक मनुष्य कोणत्याही स्थितीत असला तरी त्याचें भोवतालच्या मंडळीवर वजन पडल्याशिवाय रहात नाही. श्यामचे वजन याप्रमाणे प्रमाणाबाहेर वाढलेले पाहून त्याच्या व्यवसायबंधूस त्याचा हेवा वाटू लागला. पण त्यास मिळत असलेल्या मानास तो सर्वथा पात्रच आहे अशी जाणीवही त्यांच्या मनात त्याबरोबरच जागृत असे, यामुळे त्या हेव्यास द्वेषाचे स्वरूप आले नाहीं. त्यास खाली ओढण्याची हाव वाटण्याऐवजी त्याची बरोबरी करण्याची स्पर्धाच त्यांस वाटू लागली; व त्यांच्या दानतीचे प्रमाण सपाट्याने वाढू लागले. एखादा आडमुठा हमाल विशेष दीर्घद्वेषी दिसून आल्यास त्याचा द्वेष घालविण्याच्या हजारों

युक्त्या श्यामपाशीं असत. श्यामचा चेहरा काळासांवळा जरी होता तरी अत्यंत मोहक असे. त्याजवर अलीकडे खिन्नतेची छाया पसरल्यामुळे पहाणाराच्या मनांत तो तात्रडतोब सहानुभूति उत्पन्न करी. अशा चेहऱ्यावर श्यामने उसने हास्य आणून कोणालाही "दादा, माझ्यावर तुमचा विनाकारण राग कां बरें ?" असा विनयाने प्रश्न करितांच त्याचा राग पार मावळत असे. एखाद्याने येवढ्यालाही दाद न देतां श्यामला शिव्यांची लाखोली वहाण्यास सुरवात केली तर श्याम ती शांतपणे व निमूटपणे सहन करी. याचा परिणाम असा होई, कीं शिव्या देणाऱ्यास आपली चूक आपोआप कळून येऊन तो श्यामची माफी मागे. हृदयवशीकरणाचे श्यामचे मार्ग कधींकधीं याहूनही नाजूक असत. तो शत्रूच्या गोटातच फितूर करी. तो आपल्या सरळ, निष्कपट व प्रेमळ वर्तनाने हमालपुऱ्यातील साऱ्या लहान मुलाचा आवडता होऊन बसला होता. तो फावल्या वेळीं त्या बाजूस फिरावयास गेला असतां वाटेने भेटतील तितक्या साऱ्या मुलांना कोणास खेळणे तर कोणास खाऊ व कोणास तर खाऊपेक्षाही गोड पापा दिल्या-शिवाय रहात नसे. एखादी आई आपल्या मुलास घेऊन खेळवितांना दिसली म्हणजे त्याला आपल्या बालपणाची आठवण होऊन तो त्या मनोहर दृश्याकडे घटका घटका पहात बसे. जगातील सर्व माता त्याला सुंदराबाईइतक्याच वंद्य वाटत. हा त्याचा भाव मातांच्या निर्मल अंतःकरणांत साहजिकच प्रतिबिंबित होऊन त्यानाही त्याजबद्दल एक प्रकारचें मातृवात्सल्य वाटे. याप्रमाणे घरांतील इतर साऱ्या माणसांचा त्याजबद्दल पक्षपात उत्पन्न झाल्यामुळे घरधन्याचा त्याजविषयीं द्वेष बाळगून निभाव लागण्यासारखा नसे.

श्याम इतरावर उपकार करण्यास एका पायावर तयार असे. पण मानी पुरुषावर केलेला उपकार त्याच्या मनांत शल्याप्रमाणे सलत रहातो हें जाणून उपकार करितानाही तो स्वतःच उपकृत झाल्यासारखे दाखवी. यामुळे उपकृत मनुष्यास त्या उपकाराचे दुप्पट ओझे वाटत असे व त्याची फेड करण्याची उत्कंठा लागून राही. प्रत्युपकार करून घेतला नाहीं तर असमाधानास जागा करून दिल्यासारखें होतें हें श्यामला माहीत असल्यामुळे तो उपकृत मनुष्याच्या हातून एखादे प्रसंगीं अल्पस्वल्प सेवा

करून घेऊन तिजबद्दल कृतज्ञता दाखवी. या उपकारप्रत्युपकारानीं त्याचें परिचितांशीं अत्यंत सलोख्याचें संघट्टन होऊं लागलें.

• दोनच महिन्याच्या अवधींत श्यामपाशीं बिऱ्हाडाचा व खाण्यापिण्याचा खर्च जाऊन दगडूचें कर्ज फेडण्याइतकी बचत जमली. याच संधीस स्टेशनावरील एक अधिकारी कांहीं दिवसांकरितां मुंबईस जाणार होता. त्याच्या मुलाच्या दुखण्यांत श्यामनें बरेच कष्ट सोसले असल्यामुळें त्याचा त्याजवर अत्यंत लोभ जडला होता, व तो प्रत्युपकाराची संधिच पहात होता. श्यामनें त्याचेजवळ एक पाकीट देऊन तें मुंबईस जातांच पोस्ट ऑफिसांत नोंदून रवाना करण्यास सांगितलें, तेव्हां त्यास फार आनंद झाला. पाकिटावर दगडूचें नांव व पत्ता असून आंत त्याच्या रकमेच्या किंमतीच्या नोटा व त्यासोबत खालील मजकुराचें पत्र होतें:—

" प्रिय दगडू यास—

तुझ्यामागें तुझ्या खिशांतून मीं जी रक्कम नेली ती एकदां धड असलेल्या पण हल्लीं वापरून फाटलेल्या तुझ्या कपड्यांच्या किंमतीसह यासोबत परत करीत आहे. पैसे पाकिटांतून परत करतां येतात, तसें प्रेम परत करितां येत नाहीं. तूं मजवर जें निःसीम प्रेम केलेंस त्याची फेड कशी करूं ! आईचें मजवरील प्रेम तर या जन्मांत फिटण्यासारखें नाही. तुम्ही मजवर असें प्रेम करीत असतां मी तुमच्या दुःखास कारण झालों ! पण नशिबाच्या उलट कोण जाणार ? आतां आईचें सांत्वन तुलाच केलें पाहिजे. मी शरीरानें सुखरूप आहे असें तिला सांग. तुम्हांपासून दूर राहून मनास पूर्ण सुख होणें शक्य नाहीं; तथापि मी येतांना आईची जी चौघडी बरोबर घेतली होती तिची मजवर पाखर असल्यामुळें दुःखांतही मला एक प्रकारचें सुख होतें. बाहेरून आल्यावर पूर्वीं मी आईचा जसा आश्रय घेत असें तसा हल्लीं त्या चौघडीचा घेतों. माझ्या डोळ्यांतील आंसवें पुसण्यास आईच्या पदराचा जसा उपयोग होई तसा हल्लीं त्या चौघडीच्या पदराचा होतो. मला आईची नेहमीं आठवण होते. एखादी आई मुलाला कुरवाळतांना दिसली म्हणजे माझ्या आईची प्रेमळ मूर्ति मजपुढें उभी रहाते.

तिला माझा प्रेमपूर्वक नमस्कार सांग. तिला प्रत्यक्ष नमस्कार घडण्याचा योग येईल तो सुदिन! तोपर्यंत प्रत्येक पौर्णिमेस संध्याकाळपासून रात्रीचे दहा वाजत तोपर्यंत चंद्राकडे पहात बसण्यास तिला सांग; म्हणजे आमच्या दृष्टीची तरी भेट होत जाईल. लहानपणी मला जवळ घेऊन आई बोटाने चंद्र दाखवीत असे ते मी विसरलो नाही. आईच्या खालोखाल मला तुझी आठवण होते. तू शूद्र कुळात जन्मलेला असलास तरी मला सख्ख्या भावासारखा वाटतोस. तुझे फाटलेले कपडे मी स्मरणार्थ जपून ठेविले आहेत. त्यांनी आपल्या पोटात तुला जागा दिली तशी मलाही दिली; त्याअर्थी ते मला उभयतांच्या मातापितराप्रमाणे पूज्य वाटतेत. त्यांच्या जीर्ण अवस्थेत मी त्यांचे प्रेमाने रक्षण करीत आहे. तुझ्या सहवासाच्या खालोखाल सुख मला त्यांच्या सहवासापासून होते. असो. पत्रावरील छापावरून आणि रवाना करणाराच्या नावावरून माझा पत्ता काढण्याची यातायात करू नका. तिला मुळीच यश येणार नाही. माझा ठिकाण शोधून काढण्याचे कामी तुम्हाला विनाकारण श्रम पडल्यास मला फारच वाईट वाटेल. भेटीचा योगायोग असल्यास अनायासे भेट होईल. तसा योगायोग नसल्यास ईश्वरेच्छा म्हणून मुकाट्याने बसले पाहिजे. ही पत्रद्वारा होणारी भेट सुद्धा संपत आलेली पाहून मन व्याकुळ होते. या पत्रास तुम्हांकडून उत्तर येण्यासारखे असते तर त्याकडे पाहूनच मी बाकीचे आयुष्य कंठिले असते. पण तू तेथे लिहिलेल्या अक्षरावरून डोळे व हात फिरविणेही माझ्या नशिबी नाही. हे पत्र बाबांस दाखवू नकोस. त्यांच्या दृष्टीने मी मेल्यासारखाच आहे. माझ्याशी संबंध न ठेवण्याची त्यांची प्रतिज्ञा त्यांच्या नजरेस माझ्या हातचे अक्षर पडून अंशतःही भग्न व्हावी अशी माझी इच्छा नाही."

थोड्याच दिवसांत हे पाकीट योग्य वेळी पोस्टात नोंदून रवाना झाल्याचे श्यामला कळले व पोस्टाची पावतीही त्याच्या हाती पडली, तेव्हां त्याचा जीव खाली पडल्यासारखा झाला. ते पाकीट दगडूच्या हाती पडल्यावर

त्यास व मुदराबाईस किती आनंद होईल याचे चिंतन करीत त्याने किती तरी दिवस आनंदात घालविले.

दगडूचे कर्ज फिटल्यावर श्यामला आपल्या भोवतालच्या स्थितीचें सूक्ष्म निरीक्षण करण्यास फुरसत मिळाली. ज्या हमालपुऱ्यात फुरसदीअंतीं जाण्याचा त्याचा परिपाठ असे त्यांत रहाणारे लोक बहुधा स्टेशनावर आणि कापसाच्या गाठी बांधण्याच्या व सरकी काढण्याच्या कारखान्यात कामावर असत. ते बहुधा अगदी निरक्षर व व्यसनासक्त असत. त्यांची पैदास इतर मजुरांच्या मानाने बरीच मोठी असे. पण तिचा बहुतेक भाग ते मद्यपानासारख्या व्यसनांत फस्त करून टाकीत. दारूप्रमाणे विड्या ओढण्याचें व्यसनही त्यांजमध्ये फैलावले होते. व्यसन जडण्यास रिकामटेकडेपणाच बहुधा कारण होत असतो, हे जाणून श्यामने हमालांची मने गुतवून टाकण्याकरितां एक भजनाचा अड्डा सुरू केला. तेथे श्याम रोज रात्रीं दोनदोन चारचार घटका प्रार्थनासंगीतांतील पदें म्हणत व त्यांची इतरांना साथ देत बसत असे. श्यामचा स्वर त्याच्या मुखाप्रमाणेच अत्यंत मधुर असे. तो गाऊं लागला म्हणजे अडाणी हमाल नागाप्रमाणे डोलूं लागत व त्याच्या स्वरास आपल्या भसाड्या आवाजाची साथ देण्याचा प्रयत्न करीत. त्यांच्या आवाजांनी श्यामच्या स्वरास फारच उठाव मिळून तो पार्थिव द्रव्यांत मध्येच दिसून येणाऱ्या सोन्याच्या थराप्रमाणे किंवा काळ्या ढगांतून चमकणाऱ्या विद्युल्लतेप्रमाणे अत्यंत चित्ताकर्षक वाटे. थोड्याच दिवसांत एक बराच मोठा भजनी मेळा तयार झाला, व त्याचें भजन ऐकण्याकरिता गर्दीही बरीच जमूं लागली. या मेळ्याच्या उपयोगाकरितां श्यामने मुंबईहून प्रार्थनासंगीताची पुस्तकें मागविली. त्यांच्याशीं त्याचा हरिणपुरांतच पूर्ण परिचय झाला होता. त्यांतून तो रोज नवीं नवीं पदें निवडून गात असे. त्या पुस्तकांत प्राचीन व अर्वाचीन कवींच्या अत्यंत प्रेमळ गीतांचा संग्रह होता. तीं श्यामच्या कंठांतून निघूं लागलीं कीं श्रोत्यांची चित्तें भक्तिरसानें उचंबळून येत, व त्यांच्या डोळ्यांतून प्रेमाश्रु वहावयास लागत. 'तूं माझी माउली मी तुझें लेकरूं। नको पान्हा चोरूं विठाबाई', 'बाळ जाणेना मातेसी। तिचें मन बाळापाशीं' अशा ज्या अभंगांत ईश्वरास आईची व भक्तास तिच्या

अर्भकाची उपमा दिलेली आहे ते म्हणतांना सुंदराबाईची आठवण होऊन श्यामचा कंठ दाटून येई, व त्याच्या डोळ्यांतून अश्रुबिंदु वाहू लागत. पौर्णिमेच्या भजनांत तर बहुधा अशाच पदाचा भरणा असे. कारण इकडे भजन चालू असता तिकडे सुंदराबाई आपल्या दृष्टीशीं दृष्टि भिडविण्याकरिता चंद्राकडे टक लावून पहात आहे याबद्दल श्यामची खात्री असे. अशा प्रसंगीं चंद्राच्या शीतळ किरणात आईच्या दृष्टीचे प्रेमळ किरण मिळाल्यामुळे चंद्र आपणावर खरोखरच अमृताचा वर्षाव करीत आहे असे श्यामला वाटे. चंद्र ज्याप्रमाणे तीव्र रविकरांचे सौम्य किरणांत रूपांतर करितो त्याप्रमाणे श्यामच्या प्रेमळ मातेच्या शीतल दृष्टीचें शीतल-तर दृष्टींत रूपांतर घडवून ती त्याच्या दृष्टीस पाडीत असे. श्यामच्या अश्रूंस पौर्णिमेसच इतकी भरती का येते याची कल्पना त्याच्या अत्यंत चाणाक्ष श्रोत्यासही होण्यासारखी नव्हती. चंद्रदर्शनाने वेड्याच्या वेडास किंवा प्रणयिजनाच्या प्रणयास ऊत येतो त्याप्रमाणे भक्ताच्या भक्तीसही आल्यास नवल नाहीं असेंच ते आपल्या मनाचे समाधान करीत. आपल्या व आपल्या आईच्या मध्यस्थावरील—चंद्रावरील—श्यामचे प्रेम दर पौर्णिमेस त्याच्या शुक्लपक्षांतील कलाप्रमाणेंच वाढू लागलें.

श्यामला प्रार्थनासंगीताच्या पुस्तकांतून रोज नवीन नवीन मधुर व प्रेमळ पदें काढितांना पाहून त्याच्या श्रोत्यांना त्या पुस्तकाबद्दल फारच कुतूहल वाटूं लागलें. या अमृताच्या ठेव्याची किल्ली हस्तगत करून घेण्याची इच्छाही अनेकांना झाली. केवळ एका महिन्याच्या अभ्यासानें त्या पुस्तकांतील पदे आपणाला वाचितां येतील असें श्यामकडून कळतांच त्यांनीं लिहिण्यावाचण्याकडे रोज दोन दोन तास देण्याचें ठरविलें. दुसऱ्याच दिवशीं रात्रीचा वर्ग स्थापन झाला. त्यांत आरंभीच पन्नासपाउणशे विद्यार्थी जमा झाले; व रोज दोनदोन चारचार विद्यार्थ्यांची त्यांत भर पडत गेली. त्यांचा शिक्षक श्याम त्या सर्वांच्या मानानें अगदीं अल्प-वयस्क दिसे. ज्याप्रमाणें आगगाडीच्या डब्यास ओढून नेणारें एंजिन त्या सर्वांपेक्षां लहान दिसते त्याप्रमाणे श्यामचा देह त्याच्या शिष्यांच्या धिप्पाड देहांपुढे अगदींच किरकोळ दिसे. त्यांपैकीं कित्येकजण इतके उंच होते कीं त्यांना शासन करण्याकरितां त्यांच्या श्रीमुखांत भडकावण्याचे

श्यामला कारण पडलें असते तर त्यास उडीच मारावी लागली असती. परंतु तो प्रयोग त्यास कधींच करावा लागला नाहीं. ते सारे विद्यार्थी स्वेच्छेनेच शिकावयास गोळा झाले होते. त्यास उचलबांगडी करून जुलमानें शाळेंत आणून बसविले नव्हते, तर त्यांच्या मनानींच उचल खाऊन त्यास तेथ खेचून आणिलें होतें. शिवाय अनेक वर्षांच्या सवयीनें परिश्रम व मनाची एकाग्रता करणें हे त्यांच्या अंगवळणीं पडून गेलें होतें. त्यांची समजतही बाळपणातल्यापेक्षा बरीच वाढली होती. यामुळे त्यांची लहानपणची तीव्र बुद्धि बोथट झाली असताही तिचा ज्ञानांत सनास्थानें प्रवेश होऊं लागला. श्यामचें शिकवणेंही सुलभ व ज्ञान-ग्रहणास अनुकूल असेंच होतें. निर्बुद्ध म्हणून गाजलेला विद्यार्थी प्रौढपणीं गुरु झाल्यास तीक्ष्ण बुद्धीच्या शिक्षकापेक्षाही अधिक कीर्ति संपादन करितो हा नेहमींचा अनुभव आहे. याचें एक कारण असें असतें, कीं जड बुद्धीच्या विद्यार्थ्यास कोणता विषय कठिण व कोणता सुलभ हे जसें कळतें तसें तरळ बुद्धीच्या विद्यार्थ्यास कळत नाहीं. दुसरें असें कीं, मंद बुद्धीच्या विद्यार्थास जें ज्ञान पायरीपायरीनेंच करून घ्यावें लागतें त्याचें आकलन पल्लेदार बुद्धीचा विद्यार्थी एका झटक्या-सरसें करूं शकतो. शीघ्रग्रहण करण्याची ही प्रवृत्ति क्रमाक्रमानें ज्ञानदान करण्यास अत्यंत प्रतिकूळ असते. उलट मंदधी मनुष्य ज्या क्रमानें विद्या शिकला त्याच क्रमानें विद्यादान करणें त्यास अवघड जात नाहीं. हे बुद्धी-संबधानें झालें. मंद व तल्लख बुद्धीच्या गुरूच्या स्वभावामध्येंही ज्ञानदानास अनुकूल व प्रतिकूल अशा प्रकारचा फरक असतो. बुद्धिहीन गुरूस लहान-पणीं बुद्धिमंद विद्यार्थ्यांच्या अडचणींचा पूर्ण अनुभव आलेला असल्यामुळे तो त्या अडचणीकडे क्षमाशील दृष्टीनेंच पहातो. उलट हुशार शिक्षकास मठ्ठ विद्यार्थ्यांच्या प्रमादांची मीमांसा करितां न आल्यामुळे तो त्या प्रमादावर करडी नजर ठेवितो. श्याम बुद्धिमांद्यापासून उद्भवणाऱ्या सर्व दोषाकडे सहानुभूतिपूर्वक पहात असे. कोणत्याही विषयासंबधानें एका स्पष्टीकरणानें शिष्याची समजूत पडली नाहीं तर तो विषय तो अनेकदां व विविध मार्गांनीं स्पष्ट करून दाखवी. त्याचे बहुतेक सारे शिष्य त्याचे व्यवसायबंधु असल्यामुळें तो त्यांस आदरानें वागवीत असे. त्याच्या सौम्य

वर्तनावर व गोड स्वभावावर त्याचे विद्यार्थी इतके खूष असत, कीं ते वर्ग सुरू होण्याच्या अगोदर किती तरी वेळ येऊन त्याची वाट पहात बसत. वर्गाचे काम सपल्यावर सर्व मिळून कांहीं वेळ भजन करीत, व नंतर आधल्या दिवसापेक्षां अधिक सस्कृत बुद्धीने व अतःकरणाने घरोघर परत जात. याप्रमाणे श्यामनें आपल्या अडाणी व्यवसायबधूना प्रथम गाण्याची गोडी लावून नतर त्याच्या द्वारे त्यांचा सरस्वतीच्या प्रातांत प्रवेश करविला. सरस्वतीदेवीचे ध्यान ज्याने प्रथम कल्पिलें त्याचा तिच्या हातीं वीणा देण्यांत विद्या व गायन यांचे साहचर्य प्रस्थापित करण्याचाच हेतु होता कीं काय हे माहीत नाहीं. पण पशुकोटींतून मनुष्यकोटींत आणून पोहोच-विणारे गायन मनुष्यकोटींतून देवकोटींत नेऊन बसविणाऱ्या विद्येची पहिली पायरी आहे असे म्हणण्यास मुळींच हरकत नाहीं.

वर्गांतील विद्यार्थ्यांस लिहिणेवाचणे व हिशेबटिशेब येऊ लागल्या बरोबर श्याम त्यांजकडून इसापनीति, बाळमित्र, पचतत्र इत्यादि सोपी पुस्तकें वाचवून घेऊ लागला. त्यातील गोष्टी ऐकण्यास बरीच गर्दी होऊं लागली. केवळ दोन तीन महिन्याच्या अवधींत निरक्षर हमालांत केवढे आश्चर्यकारक रूपांतर घडून आले हे पहाताच इतरासही अक्षरओळख करून घेण्याची तीव्र इच्छा झाली; व एका वर्गाचे लौकरच अनेक वर्ग करण्यात आले. नवीन वर्गावर शिक्षक म्हणून श्यामच्या पट्टशिष्यांची योजना करण्यांत आली. व्यसनाप्रमाणे विद्याही सासर्गिक आहे. तैलबिंदु पाण्यात टाकिला असता जितक्या शीघ्रगतीने भोवतालीं पसरतो तितक्या-च शीघ्रगतीने तैलबुद्धिही आपल्या विद्येचा प्रसार भोवतालच्या जडधीमध्यें करू शकते. शिवाय श्याम प्रत्येक विद्यार्थ्यापासून त्यास शिक्षण देण्यापूर्वी दुसऱ्या एका तरी इसमास आपणाप्रमाणेच साक्षर करण्याची शपथ घेव-वीत असे. यामुळे गांवांत विद्येचा प्रसार भूमितिश्रेढीने होऊ लागला. श्यामच्या वर्गांत केवळ प्रौढ वयाचेच विद्यार्थी शिकावयास येत असें नाहीं, तर दिवसा सरकारी शाळेंत जाणारी मुलेही रात्रीच्या वर्गांत सामील होऊंन त्यात मिळणाऱ्या शिक्षणानें आपल्या ज्ञानांत भर टाकीत. सरकारी शाळांतून मिळणारे शिक्षण मुलास पाजण्यांत येणाऱ्या वरच्या दुधाप्रमाणें असतें. मूल ते आनंदाने पीतही नाहीं, व त्याच्या अंगीं ते नीट लागतही

नाहीं. उलट स्वयंसेवकांनीं स्वयप्रेरित विद्यार्थ्यास दिलेलें शिक्षण अंगावरील दुधाप्रमाणे असते. विद्यार्थी त्याचे हौसेने सेवन करितात, व त्याने त्याच्या मनास पोषणही मिळते. हळूहळू मुलाबरोबर मुलीही श्यामच्या वर्गास येऊ लागल्या, व अनेक कुटुंबवत्सल पिते आपल्या मुलामुलींसह तेथें अध्ययन करिताना दिसूं लागले. ज्ञानलालसेंत कौटुंबिक प्रेमाची भर पडल्यामुळे संपादन केलेलें ज्ञान वज्रलेप होई. संसारातील इतर प्रसंगीं कुटुंबीयास परस्पराची मदत झाल्यामुळे त्या प्रसंगाची आठवण राहून त्यांचे परस्परावरील प्रेम वृद्धिंगत होई, त्याप्रमाणे शिक्षणसंपादनातही त्यांचे परस्परास साहाय्य होऊन त्यांचे ज्ञान व परस्परप्रेम दृढ होत असे. आपल्या शिक्षणाचा दुसऱ्यास लाभ देण्याची शपथ मुलाप्रमाणे मुलींसही घ्यावी लागत असल्यामुळे त्या घरीं आपल्या मातांस ज्ञानदान करून जन्मदानाचें ऋण फेडूं लागल्या. जो श्याम ब्राह्मण जातींत शिक्षणानें मागसलेला होता तो मराठ्यांच्या शिक्षणाचा याप्रमाणे एक अद्वितीय पुरस्कर्ता होऊन बसला.

शिक्षणाची जसजशी प्रगति होऊं लागली तसतसे व्यसनाचें पाऊल सपाट्याने मागें हटूं लागलें, व प्रत्येक कुटुंबात अधिकाधिक सुखसमाधान नांदूं लागलें. कांहीं व्यसनी इसम अजून श्यामच्या वर्गापासून अलिप्त राहिले होते. त्यांचे व्यसन सोडविण्याचे कामीं त्यास बरीच दगदग व मानहानि सोसावी लागली. हें व्यसन बहुधा दारूचें असे. श्यामने हमाल-पुऱ्यातील प्रमुख इसमाची मनें वळवून त्याजकडून व इतरांकडून मद्य-पान न करण्याच्या शपथा घेवविल्या. शपथ मोडल्यास अपराध्याने दंडादाखल एक भारी रकम द्यावी असें ठरलें. या दंडाच्या रकमा पुष्कळदा अप-राध्याकडून वसूल होत नसत. त्या श्याम आपल्या पदरच्या भरीत असे. अतिरिक्त मद्यसेवनाने बेहोष झालेल्या व रस्त्यात लोळणाऱ्या इसमास चाबापुता करून त्याच्या घरीं बंदोबस्ताने पोंचवावे लागे. अशा प्रसंगीं श्यामला शिव्या व मारही सोसावा लागे. श्यामसारख्या सज्जन पुरुषास आपल्यामुळे किती त्रास सोसावा लागला हे त्या इसमास दुसऱ्या दिवशीं कळे तेव्हा तो लाजेने मरून चूर होई; व त्याची इतःपर आपल्या हातून

अप्रतिष्ठा होऊं नये अशाबद्दल तो फार जपे. त्यांत त्यास पहिल्याच खेपेस आले नाहीं तरी दोन तीन खेपांत हटकून यश येई.

एकदा रात्रीचे बारा वाजतां दारूने तर्र झालेल्या एका हमालास आपल्या दोन सोबत्यांबरोबर गुत्त्यापुढून त्याच्या घरीं रवाना करून श्याम खिन्नपणें उभा होता, इतक्यांत त्यास गुत्त्यांतून एक इसम झुकांड्या घेत व तोडानें बडबडत बाहेर पडतांना दिसला. आपल्या क्षीण नेत्रांची उघड-झांप करणाऱ्या तारकांहून अधिक तेजस्वी ज्योति आकाशांत नसल्यामुळें श्यामला त्या इसमाचें तोंड पहाण्याचें साधन नव्हतें. पण त्याच्या धिप्पाड देहावरून व त्याच्या दणगट आवाजावरून त्यास त्या इसमाची ताबड-तोब ओळख पटली, व तो जागच्या जागीं स्तंभितच झाला. तो इसम दुसरा तिसरा कोणी नसून मल्हारीबाबांचा वडील मुलगा हैबती होता. त्याचीं भावंडे श्यामच्या रात्रीच्या वर्गांत शिकावयास येत त्यांजबरोबर तोही बाहेर पडे, पण शिक्षणामृत पिण्याकरितां वर्गांत न जातां मद्याचें विष पिण्याकरितां गुत्त्यात जाई; मात्र ते इतक्या गुप्तपणें, कीं त्याचा सुगावा त्याच्या भावंडासही लागला नव्हता. मग श्यामला लागला नाहीं यांत नवल कसचें? अरेरे! इकडे मुलगा स्वतःच्या अधोगतीचें साधन करीत असता तिकडे बिचारे आईबाप त्याच्या आधारें आपली दुर्गति चुकणार या आनंदांत निर्धास्तपणें झोपी गेले असतील! इकडे पति व पिता व्यसनांत उधळपट्टी करीत असतां तिकडे पत्नी व अपत्यें त्याच्या भरवशावर खुशाल निद्रेच्या अधीन झालीं असतील! त्या सत्त्वशील कुटुंबाचा हैबतीच भावी आधारस्तंभ होता. तोच आंतून पोखरून गेल्यावर वरील डोलारा खालीं गडगडत येण्याला तो कितीसा उशीर लागणार! ज्यांनीं फुलें वेचिलीं त्यांनाच गोवऱ्या वेचण्याचा प्रसंग यावयाचा! त्या सुखी व भरलेल्या घराच्या भावी स्थितीचें ते भेसूर चित्र कल्पनेपुढें उभें रहातांच श्यामच्या डोळ्यांस पाणी आलें. इतक्यांत हैबतीचा एका बाजूस झोंक जाऊन तो श्यामच्या पायांशींच पडला. श्याम घाईघाईनें पुढें होऊन त्यास सांवरूं लागला तों हैबती त्याच्या अंगावर खेंकसून अडखळत बोलूं लागलाः— "चल, हो दूर. माझ्या अंगाला हात लावूं नकोस. मी काय दारू प्यायलों आहे!" श्याम प्रेमानें "हैबतराव, मी तुमचा नाना आहें. आपण बरोबरच



श्याम घाईघाईनें पुढें होऊन त्यास सांवरूं लागला. [पृष्ठ ५४.

घरीं जाऊं." असें म्हणतो तोंच त्याच्या हाताला हिसडा देऊन हैबती ओरडून म्हणाला, "माझ्यासमोर आपल्या शहाणपणाचा दिमाख दाखवू नकोस. माझ्या वाटेला जाशील तर मारच खाशील. माझ्यासारखा खराब माणूस कोणी नाहीं." अशी त्याची बडबड चालली होती, तिकडे दुर्लक्ष्य करीत व तो लाथाबुक्या देत होता त्या मुकाट्यानें सोशीत श्यामनें त्यास एका पाण्याच्या नळाखालीं नेलें आणि त्याच्या डोक्यावर सपाटून गार पाणी शिंपडलें. काहीं वेळानें हैबती शुद्धीवर आला व खाली मान घालून आपल्या घराची वाट चालू लागला. जाताना तो श्यामकडे एक द्वेषपूर्ण दृष्टि फेकून गुरगुरत म्हणाला, "नान्या, ही गोष्ट घरांत सांगितलीस तर खबरदार! माझ्याशीं गांठ आहे. शेटरानीच बडवून काढीन. सोडणार नाही." श्यामनें यावर कांहींच प्रत्युत्तर दिले नाही. तो मुकाट्यानें आपल्या खोलींत गेला, व दार आतून बंद करून व चौघडींत तोंड खुपसून रडत रडत म्हणाला, "आई, आई! या कठोर जगात एकलकोंडे जिणे कठणेच माझ्या नशिबी आहे का! वर्षाच्या अखेरीस तुझ्या संगतीचा एक क्षण मिळेल तर वर्षातल्या साऱ्या यातना मी मोठ्या आनंदानें सहन करीन."

या वेळेपासून श्याम हैबतींचे पाळतींवर राहिला. त्या दिवसाप्रमाणें लाजिरवाणा प्रसंग पुन्हां आपणावर येऊ नये म्हणून हैबती गुत्त्याकडे फारसा फिरकेनासा झाला. मात्र तो आंतून वैराग्नीनं धुमसत आहे हे त्याच्या अबोल्यावरून व इतर लक्षणावरून उघड दिसू लागले.

दारूबाजीसारख्या व्यसनातून सुटका झाल्यामुळे मजूर लोकांपाशीं आतां थोडाबहुत द्रव्यसंचय होऊ लागला. तो छानछोकींत खर्च न होतां सार्थकीं लागावा म्हणून श्यामनें मजुरांची एक समाईक भांडवलाची सहकारी पेढी काढिली, व तिचे काम त्याच्याच हाताखाली शिकून तयार झालेल्या इसमाच्या देखरेखीखाली सुयत्नपणे चालू केलें. द्रव्याइतकीच किंमत वेळेचीही असते. द्रव्याप्रमाणे वेळही कारणीं लागावा म्हणून त्यानें मराठ्यांच्या सार्वजनिक खर्चानें एक वाचनालय स्थापन करून त्यांत कांहीं प्रमुख वृत्तपत्रे व मासिके घेण्याची सोय केली. जगाच्या पर्यटनानें जो अनुभव व उदार शिक्षण मिळतें तें नियतकालिकांच्या

वाचकास घरबसल्या मिळत असते. एकाच पक्षाची नियतकालिके वाचनांत आल्याने वाचकाचें मन संकुचित होतें, तसे होऊ नये म्हणून त्यानें सरकारी, नेमस्त, जहाल, ब्राह्मण, अब्राह्मण इ० सर्व पक्षाची आणविण्याची तजवीज केली. त्यांतील निवडक व सुंदर लेख तो रात्रीच्या वर्गांतून वाची किंवा वाचून घेई. सारांश, एका सामान्य बुद्धीच्या व सामान्य शिक्षणाच्या इसमास इच्छा असल्यास किती समाजहित साधितां येतें हें चिमणपुरच्या समाजाच्या प्रत्ययास श्यामने चारपांच महिन्यांच्या अवधींतच आणून दिलें.

एक दिवस श्याम वाचनालयात 'गरुड' नावाच्या राष्ट्रीय पक्षाच्या वर्तमानपत्राचा ताजा अंक वाचीत बसला असतां एकाएकीं त्याच्या हातांतून अंक गळून पडला, व तोंड पांढरें फटफटीत पडून डोळ्यांत अश्रु उभे राहिले. आपणाकडे कोणाचें लक्ष्य आहे की काय हें पहाण्याकरितां त्यानें एकवार सभोंवार घाईघाईनें नजर टाकिली, आणि कोणी पहात नाहींसें पाहून तो तातडीनें उठला व आपल्या घराकडे चालता झाला. त्याच्या मनाची अशी चलबिचल करण्यासारखें त्या अंकांत काय असावें बरें?

प्रकरण चवथें

# शोध

दगडूच्या झोपडींतून घरी येताच सुंदराबाईस सणकून ताप भरला. तापाने भाजणाऱ्या अंगाने व पुत्रविरहाने पोळणाऱ्या अंतःकरणाने ती बिछान्यावर निपचित पडून राहिली. तिचा देह जरी याप्रमाणे घरीं निश्चेष्ट स्थितींत पडला होता, तरी तिचे मन चुकलेल्या पिलास शोधणाऱ्या पक्षिणीप्रमाणे जगभर थैमान घालीत होतें. मध्येच कोणाची चाहूल ऐकूं आल्यास तिने डोळे उघडावे व निराशा होताच ते पुन्हा मिटून घ्यावे. दगडू व त्याची आई आळीपाळीने तिच्या अंथरुणाजवळ पहारा करीत बसलीं होती. सकाळीं सुंदराबाई तापात बडबडू लागली, पण त्या बड-बडण्यात असंबद्धतेचा भाग मुळींच नव्हता. ती श्यामला परोपरीने आर्जवून घरी परत येण्याबद्दल विनवीत होती. दगडू घाबरला, आणि त्याने धावत जाऊन बळवंतरावास बोलावून आणिल. पावलाचा आवाज ऐकताच सुंदराबाईने डोळे उघडले, पण नवऱ्यास पाहताच अंगावर शहारे आल्यासारखं करून ते घट्ट मिटून घेतले. बळवंतरावानी तांबड-तोब डाक्तरास बोलावून आणिले. त्यानी नळी लावून तापाचे मान काढिले, नाडीचे ठोके मोजिले, डोळे तपासले व भ्रमात निघणाऱ्या अस्पष्ट शब्दावरून रोग्याच्या मनःस्थितीचा अंदाज बांधिला. तपासणी चालू असता डाक्तराची चर्या क्षणोक्षणी अधिकाधिक गंभीर होत गेली. बळवंतरावाची मुद्रा मात्र अव्वलपासून अखेरपर्यंत निश्चल होती. शेवटीं ताप मनःक्षोभामुळे उत्पन्न झाला असून दीर्घ काल टिकण्याचा संभव आहे, असे बळवंतरावास सांगून आणि रोग्यास जपण्याबद्दल व औषध वक्तशीरपणें देण्याबद्दल बजावून औषध पाठवून देण्याकरितां डाक्तर परत निघून गेले. लौकरच औषध आलें, आणि मृत्यु व मानवी उपाय याज-मधील एका चुरशीच्या सामन्यास सुरवात झाली. डाक्तर आपल्या कामात पूर्ण वाकबगार होते, व बळवंतरावात भावनाचा ओलावा नसल

तरी पराकाष्ठेची कर्तव्यनिष्ठुरता असल्यामुळें डाक्तरांची औषधें त्यांजकडून नियमितपणे देण्यात येऊ लागली. किंबहुना भावनाशून्यतेमुळेंच ते रुग्णपरिचर्येस विशेष योग्य होते असे म्हटले तरी चालेल. त्यांनीं रोग्याची शुश्रूषा नोकरांवर न सोपविता स्वतःकडे घेतली. ते पत्नीच्या अंथरुणापाशीं कर्तव्यनिष्ठुर सैनिकाप्रमाणे प्रहर प्रहर पहारा करीत बसत व घड्याळाच्याइतक्या रेखीव वक्तशीरपणानें तिला औषध देत. रात्रीं औषध देण्याची वेळ होई तेव्हा ते कितीही गाढ झोपेत असले तरी घड्याळाच्या ठोक्याबरोबर उठत व सुंदराबाई कितीही विव्हळत असली तरी डोळ्याचें पाते किंवा हाताचा स्नायुही हलू न देता तिला औषध पाजण्याची क्रिया पार पाडीत. याप्रमाणे आठवडा गेला, पंधरवडा गेला; तरी बळवंतरावांच्या अलोचन जागरणांस व अविश्रांत परिश्रमास यश येण्याचें चिन्ह दिसेना. सुंदराबाईच्या तापास यत्किंचितही खळ किंवा उतार पडेना. तापाच्या उष्णतेनें तिचें रक्त सुकून शरीर कृश होत चाललें, तोंडावर फिक्कटपणा आला व डोळे खोल गेले. डाक्तरांच्या सल्ल्यावरून बळवंतराव रोज मुंबईहून बर्फ आणवून त्याची पिशवी वारंवार पत्नीच्या डोक्यास लावीत असत. बर्फाच्या पिशवीचा तिच्या डोक्यास पहिल्याच खेपेस स्पर्श झाला तेव्हा तिनें "बाळा, हा तुझाच का रे हात?" असे शब्द अस्पष्टपणें उच्चारून डोळे किलकिले करून पाहिलें, पण नवऱ्याचा उग्र चेहरा दृष्टीस पडताच ते मिटून घेतले. खरोखर त्या आजारात तिला तिच्या आवडत्या मुलाच्या स्पर्शाचीच जरूर होती. जसा रोग तसाच त्याजवर इलाज व्हावयास पाहिजे होता. विरहजन्य व्याधींत बर्फाच्या पिशवीच्या किंवा त्या पिशवीइतकेच गारठलेल्या पतिहृदयाच्या सान्निध्याचा काय उपयोग होता?

बळवंतरावांच्या मानाने दगडू जसा वयाने कोवळा तसा दिलानेही कच्चा होता. तथापि त्यानेंही आपल्या मगदुराप्रमाणे सुंदराबाईची सेवा चालविली होती. बळवंतराव तिची सेवा कर्तव्यनिष्ठेनें करीत व तो प्रेमानें करी, इतकाच काय तो दोघामध्ये फरक होता. जरूर पडेल तेव्हां डाक्तरांस बोलावून आणणें, औषधांची व बर्फाची पार्सलें सोडवून आणणें हीं कामें बहुधा त्याजवरच सोपविण्यांत येत, व तीं तो अत्यंत तत्परतेनें करीत

असे. त्याने लौकरच बळवतरावांचा व डाक्तराचा पूर्ण विश्वास संपादन केला. डाक्तर रोज रोग्याच्या तपासणीकरितां येत तेव्हा दगडू त्यांच्या जवळच उभा राहून ते रोग्याच्या प्रकृतीचे जितक्या बारकाईने निरीक्षण करीत तितक्याच बारकाईने त्याच्या चेहऱ्याचे करी, व तो चेहरा पूर्वी-इतकाच गभीर पाहून सुदराबाईच्या प्रकृतीतही कांही फरक पडला नाहीं असे अनुमान काढी. डाक्तरास जसे उष्णतामापक यत्र तसाच दगडूस डाक्तरांचा चेहरा होता. डाक्तर परत आपल्या घरी जात तेव्हा त्याने त्यास वाटेत गाठून रोग्याच्या प्रकृतीबद्दल विचारावे. डाक्तरानी त्याच्या आतुरते-कडे लक्ष्य देऊन त्यास प्रकृतीचे खरे मान सागावे. प्रथम प्रथम तो त्यास "आज कालच्यापेक्षा तब्येत वरी आहे ना ?" असा आशादर्शक सूचक प्रश्न करी. पण त्या प्रश्नास रोजरोज एकच नकारार्थी उत्तर मिळत गेले तसतशी त्याची आशा मावळू लागली, व त्याच्या प्रश्नास "कालच्यापेक्षा आज कांहीच फरक नाही ना ?" असे निराशाव्यजक स्वरूप आले. एक दिवस सुदराबाईस मनस्वी घाम सुटला; ते पाहून दगडूच्या आनंदास पारावार राहिला नाही. बळवतरावांनी त्यास डाक्तराकडे दवडले तेव्हां तो त्यांजकडे धावतच गेला व "आपल्या हातास यश येण्याचे आज चिन्ह दिसू लागले आहे." असे त्यास म्हणाला. ते चिन्ह कळताच डाक्तरांनी तोंड गोरेमोरे केले, आणि घाईघाईने कपडे चढवून व जरूर ती औषध घेऊन ते दगडूबरोबर निघाले. वाटेने त्यानी त्यास म्हटले, "दगडू, तुझ्या एकनिष्ठपणाच्या कसोटीची खरी वेळ आज आहे. तुझ्या मालकिणीस तारणेमारणे सर्वस्वी परमेश्वराधीन आहे। पण आज आपणास आपल्या प्रयत्नांची शिकस्त केली पाहिजे. आज घरातील सगळ्या माणसा-नीं सारखे खपून तिची मृत्यूच्या दाढेतून सुटका करण्यास झटले पाहिजे." हे शब्द ऐकून दगडू थिजूनच गेला. तथापि समोर येऊन ठाकलेल्या कर्तव्यास तोंड देण्याकरिता त्यास आपले मन घट्ट करावे लागले. डाक्तरां-नीं बळवतरावाच्या घरी जातांच प्रथम सुदराबाईस घाईघाईने तपासून बळवतरावांच्या कानांत कांहींसे सांगितले. लागलीच बळवतरावानीं शागीर्दा-स पाण्याचा बब पेटविण्यास फर्माविलें; व डाक्तरानी सुदराबाईस अगांत उष्णता आणण्याचे औषध दिले. पाणी तापतांच डाक्तरांच्या सांगण्या-

वरून शागीर्दानें त्याच्या बाटल्या भरभरून खुद्द डाक्तर, बळवंतराव, दगडू व त्याची आई यांस द्याव्या व त्यांनी बाटल्या लावून सुंदराबाईचें अंग चांगलें शेकावें असा क्रम सुरू झाला. बाटल्यांतील पाणी अमळ निवते न निवते तोंच त्या परत शागीर्दाकडे जाऊन त्यांची जागा नवीन बाटल्यांनीं घ्यावी. हा क्रम तब्बल दीड तास चालू होता. मृत्यु व मानवी प्रयत्न यामधील या खेंचाखेंचींत विजयश्री कधीं एका पक्षाकडे तर कधीं दुसऱ्या पक्षाकडे झुकताना दिसे. मृत्यूची सरशी होत आहेशी दिसताच मानवी प्रयत्न दुप्पट जोरानें सुरू होत. अखेरीस त्या प्रयत्नांनी प्रतिपक्षावर मात केल्याचीं चिन्हें उघड दिसू लागलीं. रोग्याचें अंग आरंभीं काल्यासारखें गार पडलें होतें त्यांत त्याची जीवनज्योति तेवत ठेवण्याइतकी उष्णता आली, व त्याची महानिद्रेच्या घट्ट पकडींतून मुक्तता होऊन साध्या निद्रेच्या स्निग्ध बाहुपाशांत स्थापना झाली.

यानंतर सुंदराबाईच्या प्रकृतीस सपाट्यानें आराम पडूं लागला. दोन दिवसांतच ती या कुशीची त्या कुशीवर वळूं लागली. एका आठवड्यांत तिला अंथरुणावर बसतां येऊं लागलें; व आणखी एका आठवड्यांत घरांतल्या घरांत हिंडण्याफिरण्याइतका तकवा आला. शाश्वत शांति देणाऱ्या मृत्यूच्या आपण किती जवळ गेलों होतों हें कळतांच तिला या दुःखमय जगांत परत आल्याचें मनापासून वाईट वाटलें. पण आपल्या नापत्ता झालेल्या लाडक्याची पुन्हा गांठ पडणें याच जगांत शक्य आहे असा विचार येतांच तिचें किंचित् समाधान झालें, व ती भावि सुखाच्या आशेवर मरणाहूनही असह्य असें आपलें निष्प्रेम जीवित कंठण्यास आनंदानें तयार झाली. तिनें प्रथम श्यामचे कपडे, पुस्तकें, खेळण्याचें साहित्य वगैरे सर्व जिन्नस गोळा केले, व ते श्यामच्या पेटींत बंदोबस्तानें ठेविले. फावल्या वेळीं ते जिन्नस चाळवून व साफसूफ करून ती मनाची करमणूक करून घेई. श्यामनें जातेवेळीं आपल्या कपड्यांचें जें गाठोडें मागें ठेविलें होतें त्याची मातब्बरी तर तिला विशेषच वाटे. मृताच्या अस्थींइतकीच ती त्यास जपत असे. अस्थींचें गंगेसारख्या पवित्र नदींत विसर्जन करावें लागतें. पण श्यामचे कपडे भिजवून पवित्र करण्याला त्याच्या मातृदेवतेच्या डोळ्यांतील गंगायमुना नेहमीं तयार असत. बन्याचें

थंडीवाऱ्यापासून रक्षण करण्याकरितां जन्माला आलेल्या या कपड्यांचे आपण जिवापलीकडे जतन करीत असता तो धनी मात्र उन्हातान्हात वणवण करीत हिंडत असेल हा विचार तिच्या अंतःकरणाला पीळ पाडी; व तिला क्षणभर त्याचा राग येऊन ती त्यास दूषही करी. पण लागलीच तिला वात्सल्याचे भरतें येऊन ती त्यांना पोटाशीं धरी. अशा वेळीं 'आपण ज्याप्रमाणे श्यामला उदरात वागविले त्याप्रमाणे यानींही वागविलें आहे; श्याम आपणास सोडून गेला यांत आपला जसा अपराध नाहीं तसा याचाही नाहीं; आपल्या विरहदुःखात हेही भागीदार आहेत; आपण यांचे सांत्वन करावयाचे, ते सोडून याजवर रागावणें म्हणजे निव्वळ निष्ठुरपणा आहे.' असे विचार तिच्या मनांत येत. आपणाकडून झालेल्या अन्याया-बद्दल ती त्या कपड्यांची पडलेल्या गुड्या लावून व फाटलेले भाग शिवून भरपाई करी.

श्याम जाण्यापूर्वी सुंदराबाई दगडूचा द्वेष करीत असे. पण आतां तोच दगडू तिच्या विश्वासाचे स्थान होऊन बसला. त्याचें श्यामवर तिच्यासारखेंच निःसीम प्रेम होतें या गोष्टीनें पूर्वी तिच्या मत्सराग्नीत तेल पडत असे; पण आता उभयतांच्या प्रेमाचे समान अधिकरण नाहीसें झाल्यावर त्या गोष्टीचा परिणाम खवळलेल्या समुद्रात तेल ओतल्याप्रमाणे होऊ लागला. श्यामने वडिलांचें घर सोडिल्यावर दगडूच्या झोपडीचा आश्रय केला होता, व जातेवेळी त्याचे कपडे हक्काने अंगावर चढवून त्याची रक्कम उसनी घेतली होती. शिवाय तिच्या पूर्वीच्या द्वेषाचें कारणही आता नाहीसे झाले होते. कारण बळवंतरावांचा श्यामवर राग होण्यास आपली शिक्षणातील प्रगति अंशतः कारणीभूत झाली या विचाराने दगडूस वैताग येऊन त्याच्या भरात त्याने शाळेस रामराम ठोकला होता. त्यानंतरचे त्याचे दिवस सुंदराबाईच्या शुश्रूषेतच गेले होते. पोटच्या मुलाने करावी अशी अंतःकरणपूर्वक त्याने तिची सेवा केली होती. आजारांत रात्रीं बेरात्री केव्हांही तिने डोळे उघडिले तरी दगडूची प्रेमळ मूर्ति तिजकडे टक लावून बसलेली तिला अनेकदां दिसली होती. तिच्या डोळ्यांवर झांपड आली असता दगडू तिची झोपमोड होऊ नये म्हणून श्वासही बेताने सोडीत जागल करी याचे निर्विकल्प ज्ञान तिला झाले होतें.

तिचा प्राणरूपी कांटा भयंकर व्याधीमुळे मरणरूपि पारड्याकडे अधिका-धिक झुकत चालला असतां आपलें अल्प शक्तिसर्वस्व खर्चून त्यास जीवित-रूपि पारड्याकडे परत खेचून आणू पहाणाऱ्या त्या एकनिष्ठ सेवकावर ती सतुष्ट झाली होती. एकदा तिने पिण्यास जवळच्या तांब्यातील पाणी मागितलें असतां दगडूने शागीर्दास बोलावण्याकरिता दाराकडे धाव घेतली, ते पाहून ती " दगडू, तुझें पाणी मला चालेल हो ! " असें म्हणून त्याच्या हातचें पाणी आनंदानें प्याली होती, व या लहानशा बक्षिसाने त्याच्या डोळ्यात उभे राहिलेले कृतज्ञतेचे अश्रु पाहून तिनें पुढें अनेकदा तहान लागली नसताही त्याच प्रयोगाची पुनरावृत्ति केली होती. डाक्तराचें औषध तर तिनें पुढें दुसऱ्या कोणाच्याही हातचें घेतलें नाही. बळवत-रावास आपल्या पत्नीच्या वर्तनातला हा इष्ट फरक आपल्याच वेळो-वेळींच्या जातिभेदविषयक उपदेशाचा किंचित् उशिरा झालेला परिणाम आहे असें वाटून मनातल्या मनात धन्यता वाटे. असो. सुंदराबाई आजारा तून उठल्यावर तिला आपलें दुःख ओकून हृदय हलकें करण्याला दगडू हेंच एक ठिकाण उरलें. तिने सांगितलेल्या श्यामच्या अनेक बाललीला च्या हकीकती कितीही लांबलचक व पुनरावृत्तिपूर्ण असल्या तरी दगडू त्या सहानुभूतिपूर्वक ऐकत बसे; आणि मधूनमधून श्यामच्या कोमल व उदार हृदयाच्या, परोपकारी स्वभावाच्या आणि अतुल मातृभक्तीच्या गोष्टी तिला ऐकवीत असे. या कथाविनिमयानें उभयताची परस्परावरील ममता झपाट्यानें वृद्धिंगत होत गेली. श्यामनें जाताना दगडूच्या नावानें लिहिलेलें पत्र तर तिनें त्याजकडून कितीदा तरी वाचून घेतलें. पण तिच्या अधाशी हृदयाची तृप्ति होईना. आपल्या लाडक्याच्या अखेर-च्या पत्राचा आस्वाद आपणास दुसऱ्याच्या मध्यस्थीनें घ्यावा लागत आहे याची तिला फार खंती वाटूं लागली. एक दिवस तिने " दगडू, तुझी फार हुशार विद्यार्थी म्हणून ख्याति आहे, नाही बरें ? " असें त्यास म्हटलें. आपली हुशारी श्यामला कशी बाधली याचें स्मरण होऊन दगडू ओशाळा होऊन म्हणाला, " नका बाईसाहेब, जिवलगाचा सत्यानाश करणाऱ्या त्या हुशारीचें नांव काढू नका." सुंदराबाई म्हणाली, " नाही बाळा, मीं तें पूर्वीच्या अर्थानें नाही म्हटलें. माझ्या मनातून जरा लेखन-

वाचन शिकावयाचे आहे. शिकवशील का मला ?" भामिनीने काकुळती-ने केलेल्या विनतीचा हेतु जाणून दगडूचे हृदय विरघळून गेलें. तो म्हणाला, "बाईसाहेब, मी आजपर्यंत स्वतःच्या शिकण्याला व्यर्थ समजत होतो. पण मी जे काहीं र ट फ शिकलो आहे ते आपणाला सागतां आले तर मी त्याचे सार्थक झाले असे समजेन. त्या कामी मला कितीही दिवस खपावे लागले तरी हरकत नाही."

सुंदराबाई:—"छेः, छेः! दगडू, तुला इतका काही त्रास पडणार नाही. मला फक्त लिहावाचायला शिकायचे आहे. लिहिणे नाहीं साधले तरी हरकत नाही, पण वाचणे मात्र जरूर पाहिजे."

दगडू किंचित् निराशेच्या स्वराने म्हणाला, "मग आपणाला गणित, इतिहास, भूगोल यांपैकी काहीच नाहीं शिकायचे ?"

सुंदराबाई म्हणाली, "मला काय करायचे आहे इतके भारभर शिकून ! श्याम गेल्यापासून जे दिवस लोटले ते मोजण्याइतके गणित मला येत आहे; श्यामच्या लीला हाच माझा इतिहास. तो मला पाठ आहे, आणि श्याम कोठे आहे हे जर मला माहीत नाही तर भूगोल शिकून काय करावयाचे ?" व्यवहारात उपयोगी पडेल तेच खरे शिक्षण, व आपल्या लाडक्या मुलाशीं ज्या व्यवहाराचा संबंध येईल तोच खरा व्यवहार असे इतर पुत्रवत्सल माताप्रमाणे सुंदराबाईही मानीत होती.

त्याच दिवशी सुंदराबाईने श्यामची पेटी उघडून तिच्यातून पाटी व दगडी पेन्सिल काढिली आणि दगडूपाशी बाराखड्या शिकण्यास सुरवात केली. ती विशेष तरळ बुद्धीची नव्हती खरी; पण श्यामचे पत्र वाचण्याची इच्छा हा अध्ययनहेतु, श्यामची पाटी-पेन्सिल हे अध्ययनसाहित्य व श्यामचा बाळमित्र हा अध्यापक, इतक्या कारणाचा समुच्चय जमल्यावर तिला अक्षर-ओळख जरा शीघ्र गतीने होऊ लागली यांत नवल कसचे ? दिवसभर खपून हस्तगत करून घेतलेल्या अक्षरांची श्यामच्या पत्रांत ओळख पटते कीं काय हे तिने प्रत्येक दिवशीं संध्याकाळीं कुतूहलाने पहावे; व दिवसें-दिवस त्या पत्राचा अधिकाधिक भाग आपल्या काबूत येत चालला आहे हे पाहून अत्यंत समाधान मानावे. अखेरीस ज्या दिवशी तिने दगडूच्या मदतीनें त्या पत्रांतील एकूण एक अक्षर—अडखळतच का होईना—वाचून

संपविलें त्या दिवशी तिला स्वर्ग हाती आल्यासारखा आनंद झाला. पत्र लहानच होतें; पण तें संपविण्यास तिला तब्बल अर्धा तास लागला. एक अक्षर लावून दुसरें अक्षर लावण्याचा ती प्रयत्न करिते तोंच ती तें पाहिलें अक्षर विसरून जाई; व पुन्हां तें लावावें लागे. जें पत्र वाचावयास तिला इतका वेळ लागला तें पत्र एका दमासरसें खरडून टाकणाऱ्या श्यामच्या विद्वत्तेबद्दल तिला अत्यंत आदर व त्या विद्वत्तेचें चीज न करणाऱ्या बळवंतरावाच्या खुनशीपणाबद्दल अत्यंत राग वाटू लागला. त्या पत्रांतील अक्षरांच्या पंक्ति तिला मोत्याच्या सराप्रमाणें वाटू लागल्या. अशा सोन्यासारख्या मुलाच्या हातचीं अक्षरें मोत्यासारखीं असल्यास त्यांत नवल कसचें ? सुंदराबाईंचीं त्या पत्रावर पारायणें सुरू झालीं. त्यांतील अक्षरावर नजर फिरवितांना तिला मधुर स्वरांच्या पेटीच्या पडद्यावर बोटें फिरवून निघणाऱ्या मंजुळ स्वरांचा भास होई, व कधीं कधीं तर अक्षरांच्या ओळींतील शब्द आपल्या डोळ्यांस दिसत नसून आपल्या लाडक्याच्या दंतपंक्तींतून निघणारे गोड शब्द आपल्या कानावर पडत आहेत असाही तिला भास होई. तिला अक्षरओळख झाल्यापासून एका नवीनच ज्ञानेंद्रियाची प्राप्ति झाल्यासारखें वाटू लागलें, व अधळ्यापेक्षां डोळसाचें किंवा बहिऱ्यापेक्षां धड कानाच्या मनुष्याचें ज्ञान जसें अधिक परिपूर्ण असतें तसें निरक्षरापेक्षां साक्षर मनुष्याचेंही असतें याचा तिला प्रत्यय येऊं लागला. जर देवाच्या कृपाकटाक्षानें मागेंपुढें श्यामचा पत्ता लागला तर कागदाच्या एका तुकड्याच्या जोरावर आपण त्याला आपलें मनोगत कळवूं शकूं व त्याचें मनोगत जाणूं शकूं अशी तिला आशा वाटू लागली. साक्षरता ही कानांप्रमाणें ज्ञानेंद्रिय आहे तशी वाचेप्रमाणें कर्मेंद्रियही आहे. पृथ्वीवरील वाटेल त्या स्थळीं जाऊन वाटेल त्याची भेट घेण्याचें योग्यास जें सामर्थ्य योगबलानें येतें तेंच सामान्य साक्षर मनुष्यास कागदाच्या साह्यानें येतें. कागदासारखा परोपकारी पदार्थ जगांत दुसरा सांपडावयाचा नाहीं. तो स्वतः मालिन्य पत्करून दुसऱ्याच्या डोक्यांत प्रकाश पाडितो व त्याचें चरित्र उज्ज्वल करितो; स्वतः लेखणीचे तीक्ष्ण घाव सोसून व छापखान्यांतील खिळे टोंचून घेऊन दुसऱ्याची देहदंडापासून मुक्तता करितो; स्वतः लखोट्यांतील बंदिवास पत्करून दुसऱ्याची

कैदखान्यातून सुटका करितो. स्वतः यत्राचे दडपण सोसून इतरांची गुलामगिरीच्या दडपणाखालून सोडवणूक करितो, स्वतः अंगावर मुद्रा धारण करून दुसऱ्याचे तप्तमुद्रेपासून रक्षण करितो. तो चिंतातुरांची अंतः-करणे हलकी व लेखकांचे खिसे जड करितो. तो कातरांची मने कठिण व क्रूरांची हृदये मृदु करितो. तो गरिबाच्या भाकरीस माधुर्य देतो व पाप्यां-च्या पक्वान्नात विष कालवितो. तो इतिहासाचे रूप घेऊन भिन्न भिन्न कालांचे व वृत्तपत्राचे रूप घेऊन भिन्न भिन्न देशांचे एकीकरण करितो. आज जर पृथ्वीवरील कागद नाहीसा झाला तर लवकरच गेल्या हजारो वर्षांतील सुधारणा व संस्कृति नामशेष होऊन पृथ्वीस जंगलाची व मनुष्यास पशूची स्थिति पुन्हा प्राप्त होईल.

श्यामचा पत्ता लागला तर सुंदराबाई त्यास पत्रे लिहिणार! पण त्याचा पत्ता लागावा कसा? दुखण्यातून उठताच तिने दगडूमार्फत त्याचा शोध चालविला होता. प्रथम तिने श्यामची जन्मपत्रिका तयार करणाऱ्या ज्योतिष्याचा शोध केला. तो स्वतःच कालवश झाल्याचे कळल्यावर तिने दगडूकडून गावातील व गावाजवळील विहिरीत व तळ्यात पटाईत पोहणारास उतरवून त्याचा कोपरान् कोपरा शोधून पाहिला. पण काहीच मागमूस लागला नाही. वास्तविक पहाता श्यामने जिवाचे काही बरेवाईट करून घेतले असेल या तर्कास त्याच्या पत्रात काहीच पुष्टीकरण मिळण्या-सारखे नव्हते. बरे, जरी त्याने जलाशयात उडी टाकून आत्महत्या केली असती तरी इतक्या दिवसानंतर त्याचा तेथे शोध लागणे मुळीच शक्य नव्हते. पण प्रेम वेडे असते हेच खरे. 'श्यामने आत्महत्येचा कोणासही संशय येऊ नये म्हणून मुद्दामच देशांतराचा मजकूर लिहिला नसेल कशावरून! शोधच केला तर शरीराच्या नसल्या तरी कपड्यांच्या खाणाखुणा सापडण्या-चा संभव आहे.' असे पुसट समज त्या प्रेमास आले असल्यास त्यास ते क्षम्यच होते. असो. यानंतर गावातील प्रमुख अड्ड्यावर बारकाई-ने चौकशी करण्यास सुरवात झाली. तिलाही तादृश यश येण्याचे चिन्ह दिसेना. रोज संध्याकाळी दगडू सार्वजनिक वाचनालयात जाऊन तेथील वृत्तपत्रे वाचीत व चर्चा ऐकत बसे; पण त्याचाही काही उपयोग झाला नाही. सुंदराबाई स्वतः घरी येणारी वर्तमानपत्रे र ट फ करीत वाचू लागली;

पण तिने त्यातून श्यामची बातमी काढणे हे एखाद्या नवशिक्या पोहणाराने समुद्रांत हरवलेला खसखशीचा दाणा शोधून काढण्यासारखेंच होत. तिची वाढती वाचनलालसा पाहून बळवंतरावास मात्र आपल्या शिक्षणविषयक उपदेशास फळ येण्याची आशा वाटू लागली. त्याजकडे सुधारक व प्रागतिक पक्षाची अनेक नियतकालिके येत, त्यातील निवडक लेख ते आपल्या पत्नीस वाचावयास देत. तिला बापडीला ते वाचण्यावाचून गत्यतर नव्हते. त्याचा तिच्या मनावर परिणाम मात्र पालथ्या घागरीवर होणाऱ्या पाण्याच्या परिणामाहून अधिक होत नसे. पण बळवतराव पराकाष्ठेचे आशावादी असल्यामुळे अशा क्षुल्लक गोष्टीस दाद देत नसत.

एक दिवस दगडू हातीं एक पाकीट घेऊन धावतच सुंदराबाईकडे आला. ते श्यामकडून आले आहे असे कळताच तिला हर्षवायु होण्याची वेळ आली. तिने श्यामचे पत्र तान्हेलेल्या डोळ्यांनी कितीदा तरी वाचून पाहिले तरी त्याची तृप्ति होईना. मधून मधून तिचे डोळे भरून येत; परतु ते तांतडीने पुसून ती पुढील शब्द वाचू लागे. चौघडीचा मजकूर वाचून तर तिचे हृदय वितळूनच गेले. दर पौर्णिमेस चद्राकडे पहात बसून श्यामची अप्रत्यक्ष भेट घेण्याचा तिने तावडतोब निश्चय केला. पाकिटातून आलेली रक्कम मागे टाकण्यास श्यामला इतके दिवस लागले हे कळताच तिचा पुत्रवत्सल जीव तळमळू लागला. तथापि त्याचे अजून या जगांत वास्तव्य—मग ते कोणत्याही अवस्थेत असो—आहे याबद्दल तिने देवाचे शतशः उपकार मानिले. पाकिटावरील छापावरून तें 'गिरगांव-मुंबई' येथून रवाना झाल्याचे दिसत होते. रवाना करणाराचे नांव 'बाबूराव जोशी' हे दिले होते; पण ते फारच संदिग्ध होते. तें नाव वास्तविक ज्या गृहस्थापाशी श्यामने पाकीट दिले होते त्याचे होतें. पण ते नांव श्यामने दगडूची दिशाभूल करण्याकरिता खोटेंच दिले आहे असे त्यास व सुंदराबाईस वाटले. पत्रांतील मजकुरावरूनही श्यामचा पत्ता लागण्याची फारशी आशा नव्हती. तथापि तिने प्रयत्न करून पहाण्याचे ठरविले. तिने दगडूची पुरेशा वाटखर्चीसह मुंबईस आपल्या एका आप्ताकडे रवानगी केली, व तो लवकरच श्यामला घेऊन—निदान त्याचा पत्ता तरी लावून परत येईल या आशेने ती त्याची चातकीप्रमाणें

मार्गप्रतीक्षा करू लागली. मुंबईची गाडी हरिणपुरास दिवसांतून दोन वेळा येत असे. त्या दोन्ही वेळांवर ती पूर्वी श्यामच्या परीक्षेच्या निकाला-च्या शोधार्थ गेलेल्या दगडूची वाट पहात मुलासह तिसऱ्या मजल्याच्या ज्या सज्जात बसली होती त्याच सज्जात दूरवर दृष्टि लावून बसत असे. ते ठिकाण या खेपेस अधिक फलदायि होईल काय ? कुणी सांगावे ?

दगडू बोरीबंदर स्टेशनाच्या धक्क्यावर उतरतांच तेथील गर्दीने भांबा-वून गेला. पण तो जात्या धीट व हुषार असल्यामुळे त्याने लवकरच एक माहितगार हमाल ठरवून त्याच्या डोक्यावर आपले सामान दिले आणि त्याच्या मदतीने आपले मुक्कामाचे बिऱ्हाड गाठले. मुक्कामी जाताच त्याने त्याच हमालाला कांही बक्षिसी देण्याचे कबूल करून गिरगाव पोस्ट-ऑफिस दाखविण्याला आपल्याबरोबर घेतले. पोस्टात चौकशी करिता दगडूच्या नावे पाकीट पाठविणारा इसम पोस्टांतील एकाही इसमाच्या माहितीचा नव्हता असे कळले. झाले, प्रथमग्रासे मक्षिकापात झाला ! तरी दगडूने हिंमत सोडिली नाही. पाकीट ज्याअर्थी श्यामरावानेच रवाना केले आहे त्याअर्थी तो मुंबईसच कोठे तरी असला पाहिजे असा विचार करून त्याने मुंबईच्या निरनिराळ्या भागात त्याचा शोध करण्या-चा निश्चय केला. पहाटे उठल्याबरोबर प्रातर्विधि उरकून लागलीच मुंबईतील चाळी पहाण्याचे काम सुरू करावे ते अकरा वाजेपर्यंत चालू ठेवावें; नंतर खाणावळींत घाईघाईने जेवण उरकून पुन्हा चौकशीस सुरवात करावी ती संध्याकाळपर्यंत चालवावी; त्यानंतर समुद्रकिनाऱ्या-वर जाऊन तेथे सहल करणाऱ्या अगर विश्रांति घेणाऱ्या अनंतविध माणसाकडे बारकाईने पहात फिरावे; नंतर संध्याकाळचे जेवण उरकून नाटकगृहे, सिनेमागृहे यांपुढे प्रहर प्रहर आशाळभूत दृष्टीने चोहीकडे न्याहाळीत उभे रहावे, व अखेर निराश झाल्यावर परत बिऱ्हाडी येऊन चाळीच्या सज्जात उपरणे अंथरून निजून रहावे; असा त्याचा परिपाठ सुरू झाला. स्वतःच्या बिऱ्हाडातील एकाही इसमास त्याचा कधी उपसर्ग पोहोचला नाही; पण खास मुंबईतील दुसरे एकही बिऱ्हाड त्यानें श्यामचा शोध केल्यावांचून शिल्लक ठेविले नाही. चाळीचे जिने चढतां चढतां त्याच्या पायांस गोळे येत; बिऱ्हाडकरूंशी बोलतां बोलतां

त्याच्या घशास कोरड पडे; पण त्यामुळे त्याच्या पायांस व चौकशीस खळ पडला नाही. सध्याकाळीं त्याचा जीव बेसुमार गळून जाई; तरी त्याने कधीं विश्रांतिगृहाचा आश्रय केला नाहीं अगर बॅकबेवर आपले पाय चेपून घेतले नाहींत. त्यास आपलपोट्यांची बेपर्वाई, रिकामटेकड्यांची चांभारचौकशी, थट्टेखोरांची मस्करी, फटकळाच्या शिव्या व फसव्यांच्या भुलथापा इत्यादि प्रकारांचे अनेक मासले पहावयास मिळाले. पण त्याने आपले चित्त आपल्या ध्येयापासून च्युत होऊं दिले नाहीं. प्रत्येक विघ्नाबरोबर त्याचा उत्साह दुणावत असे. त्याने गिरण्या, कारखाने, कार्यालये, छापखाने, गोद्या, कचेऱ्या, दुकाने इत्यादि सर्व ठिकाणे पालथीं घातलीं; पण त्याचा आवडता बालमित्र त्याला एकातही दिसून आला नाही. खास मुंबईच्या भोंवतालच्या भागातील परेळ, दादर, माटुंगा, माहीम, कुर्ला, ठाणे, कल्याण इत्यादि गावांहून मनुष्यसमूहांच्या ज्या लहानमोठ्या लाटा स्थानिक आगगाड्यांच्या रूपाने सकाळपासून अंतराअंतराने मुंबईवर आदळत असतात व सध्याकाळीं स्वस्थानीं परतत असतात, त्यांत तरी आपले प्रियमित्ररूप मौक्तिक दिसून येईल या आशेने त्याने आळीपाळीने ग्रॅंटरोड, चर्नीरोड, चर्चगेट, कुलाबा या स्टेशनांबाहेर सकाळ सध्याकाळ उतारूंच्या चेहऱ्याकडे चातकाप्रमाणें पहात उभे रहावें. खुद्द मुंबईतल्या मुंबईत अप्रमुख भागांतील मनुष्यवस्तीच्या ज्या लहानलहान पण असंख्य लाटा कचेऱ्यांच्या वेळीं ट्रॅमगाड्यांच्या रूपाने एकीमागून एक कोटाकडे लोटत व सध्याकाळीं तितक्याच शीघ्र गतीने परत फिरत त्यांतील कणांचेही त्याच हेतूने निरीक्षण करीत तो गिरगांव, पायधुणी, क्राफर्ड मार्केट इत्यादि प्रमुख भागातील ट्रॅम गाड्या थांबण्याच्या अड्ड्यांवर चारचार घटका उभा राही. याप्रमाणे दोन महिने भगीरथ प्रयत्न केल्यावर श्यामरावाचे वास्तव्य या अफाट व अथांग जनसमुद्राच्या उदरांत नसून कोठें तरी दुसरीकडे आहे याविषयी त्यास संशय राहिला नाही. ज्या दिवशीं त्याची याबद्दल पूर्ण खात्री झाली त्याच दिवशीं त्याने हरिणपुरास परत येण्याकरितां मुंबई सोडिली. त्या शहराचे महत्त्व सौंदर्य, ऐश्वर्य, वैचित्र्य, ज्ञान, कला, संस्कृति, उद्योग, व्यापार इत्यादि अनेक दृष्टींनीं मानण्यात येतें. पण दगडूस त्याचे महत्त्व एका

व्यक्तीमुळेच होते. ती व्यक्ति त्यात नाही हे कळताच त्यास ते स्मशान-तुल्य वाटू लागले. देवळांतून देव, गृहांतून गृहिणी व शरीरांतून प्राण निघून गेल्यावर त्यावर निखारा ठेवणेंच योग्य; आणि असंख्य विद्युद्दीपानी लखलखणारी मुंबई हरिणपुरास परतणाऱ्या दगडूस क्षणभर एका प्रचंड चितेप्रमाणे वाटली असल्यास आश्चर्य वाटावयास नको.

दगडूचा मुंबईतील मुक्काम दोनच महिन्यांचा असला तरी त्यास त्यांत मिळालेल्या अनेकविध अनुभवामुळे तो दोन वर्षांचा वाटत होता. त्या काळात त्याचा इतक्या भिन्न परिस्थितीतील व भिन्न स्वभावाच्या मनुष्यांशीं प्रसंग पडला होता कीं त्यास मनुष्यस्वभावाचें बरेच मार्मिक ज्ञान होऊन त्याच्या रीतीभातीवर संस्कृतीची जिल्हई चढली होती. मुंबईच्या जनसमुद्रात उडी घेतेवेळी तो खेडवळ होता. परंतु त्यातून बाहेर पडतेवेळी त्यास नागर स्वरूप आले होते. हा दोन महिन्याचा काळ मुदराबाईसही फार दीर्घ वाटला. त्या काळात दगडूचे जसें श्याम-च्या पुनर्दर्शनाकडे तसें तिचे दगडूच्या पुनरागमनाकडे लक्ष्य लागलें होते. त्यास जाऊन जसजसे अधिकाधिक दिवस होत गेले तसतशी तिला एका क्षणीं श्यामबद्दल आशा व दुसऱ्या क्षणी दगडूबद्दल भीति वाटूं लागली. खात्रीलायक पत्ता लागल्याशिवाय दगडू इतके दिवस मुंबईस रहाणार नाहीं असें तिला एक वेळ वाटे, पण लागलीच तिला स्वतः दगडूच त्या जगड्व्याळ शहरात नापत्ता झाला असेल अशी शंका येई. तिच्या नावावर येणारी पत्रे बळवतरावांच्या हातीं पडण्याचा संभव असल्यामुळे व दगडूचा मुंबईचा मुक्काम विशेष लांबण्याचा संभव न दिसल्यामुळे त्याने तिला पत्रे मुळींच पाठवू नयेत असें त्या उभयतामध्ये ठरलें होते. म्हणून त्याचें पत्र आले नाही यांत तिला विशेष काहींच वाटलें नाही. पण त्यास तिकडे इतके दिवस रहावें लागेल असंही तिला किंवा त्याला वाटलें नव्हते. तशी कल्पना त्या वेळीं तिला आली असती तर तिने त्याचें पत्र त्याच्या एखाद्या स्नेह्याच्या पत्त्या-वर मागविलें असते. पण त्याने आपण होऊन तरी असें एखादें पत्र कां धाडू नये ! तिने मुंबईबद्दल अनेक चमत्कारिक खऱ्याखोट्या गोष्टी ऐक-ल्या होत्या. त्या महासागरात असंख्य भोंवरे व अगणित मगर आहेत

असा तिचा बराच यथार्थ समज होता. तेथे थोडेंसे दुर्लक्ष्य झाल्यास मोटारी-खालीं किंवा ट्रॅमखाली सांपडून अपघात होण्याची खात्री असते, तेथे भर रस्त्यावर दिवसाढवळ्या खून होतात, तेथे कोणाही इसमावर एकाएकीं चोरीचा वगैरे आळ येऊन तुरुगांत जाण्याची भीति असते, तेथे प्लेगचे कायमचे वास्तव्य असल्यामुळे प्राणाची शाश्वती नसते, अशा अनेक संकटांनीं व्याप्त अशा शहरांत बिचाऱ्या गांवढळ दगडूचा काय निभाव लागला असेल ? बरें, त्याचें जर का कांहीं बरेवाईट झालें असेल तर आपल्या आप्तांचे तर पत्र यावें ? असे अनेक तर्कवितर्क तिच्या मनांत खळबळ उडवून सोडीत. अशा विचारांच्या तंद्रींत ती एक दिवस नित्य-क्रमाप्रमाणें सज्जांत स्टेशनाच्या रस्त्याकडे एकाग्र दृष्टीनें पहात बसली असतां तिला क्षितिजावर एक हलणारा ठिपका दिसला. त्याचा रोख स्टेशनच्या रस्त्यानें आपल्या घराकडेच आहे हेंही तात्बडतोब तिच्या लक्ष्यांत आलें. त्यासरसें तिचें लक्ष्य त्याकडे वेधलें. ज्याप्रमाणें अव्यक्तावस्थेंतील बिंदुप्रमाण गर्भास प्रतिदिनीं अधिकाधिक विस्तार व व्यक्तावस्था प्राप्त होत जाते तशी त्या ठिपक्यास प्रत्येक क्षणास येऊं लागली. त्यास गोटा, चेंडू, कोंबडें, मांजर, मुलगा अशीं अधिकाधिक स्पष्ट रूपें प्राप्त होत होत अखेरीस तो दगडूच आहे हें निश्चित ठरलें. त्यासरशीं सुंदराबाई आपल्या ठिकाणाहून ताडकन् उठली व सज्जाच्या अगदीं टोकाशीं जाऊन तिनें दगडूचें चित्त आकर्षिण्याचा प्रयत्न केला. दगडूनें तिजकडे पाहिलें व ललाटींच्या विधि-लेखावरील आपला राग दाखविण्याकरिताच की काय, कपाळावर जोरानें हात मारिला. सुंदराबाई त्या कृतीचा अर्थ समजली. तिचें अंतःकरण निराशेनें व्याप्त झालें. पण तें क्षणभरच. दुर्दैवानें त्यावर घणाचे वारवार प्रहार करून तें खंबीर केलें होतें. शिवाय तिला दगडूचें इत्थंभूत वृत्त कळण्याची उत्कंठा उत्पन्न झाली होती. दगडू वर येऊन पोहोंचतो तोंपर्यंत तिनें आपलें मन त्याची कहाणी ऐकण्यास घट्ट केलें होतें. तो जवळ येतांच ती त्यास "हं, आतां सारी हकीगत मुळापासून सांग." असें शांत स्वरानें म्हणाली. तिची स्थिर वृत्ति पाहून दगडूसही आश्चर्य वाटलें. त्यानें तिला हरिणपुरास गाडींत बसल्यापासून तों तेथें गाडीतून उतरेपर्यंतची सारी हकीगत एकही महत्त्वाचा मुद्दा न सोडतां सांगितली. सुंदराबाई

ती सावधान चित्ताने ऐकत होती. दगडूस श्यामच्या शोधाबद्दल पूर्ण निराशा होईपर्यंत जशी मुंबईची महती वाटत होती तशी तिलाही त्या हकीगतीची वाटत होती. पूर्वपरिचित करुणपर्यवसायि नाटक पाहतांना प्रेक्षकास त्याचा शेवट अजनही चागला होईल अशी ज्याप्रमाणे शेवट-पर्यंत अंधुक आशा वाटत असते तशी तिलाही वाटत होती. दगडूने आपली कर्मकथा सपविली तेव्हा तिने सशयमुक्ततेचा व दुःखाचा एक दीर्घ सुस्कारा सोडिला. दगडूस दोन महिन्यात आलेल्या भिन्नभिन्न मानसिक अवस्थाचा अनुभव तिला दोन घटकात आला होता; व थोड्या जागेत कोंडलेली वाफ मोकळी वाट सापडताच जशी जोराने बाहेर पडते तसें कोंडमारा झालेले मनही जरा उसत मिळताच दीर्घ सुस्काऱ्याच्या रूपानें बाहेर पडत असते. तिने किंचित् थाबून विचारले, "आतां पुढे काय?"

दगडू:—पुढे काय करावयाचे याचा मी गाडींत स्वस्थपणे विचार करून एक बेत ठरविला आहे.

सुदराबाई:—तो कोणता बाबा? मुबईप्रमाणे पुणे, सातारा, कोल्हापुर अशा वग्कड शहरात शोध करावयाचा नाहीना तुझा विचार? करावयाचा असल्यास त्याला तुझा सारा जन्मही पुरावयाचा नाही.

दगडू:—नाही. माझा विचार अगदी निराळा आहे. येथें बसल्या बसल्या शोध लावायचा. मी एकटा गेलो म्हणून एक शहर सपवायला दोन महिने लागले. पण मजबद्दल हजारों हेर जर गेले असते तर महा-राष्ट्रातली सगळी शहरे, गावे आणि खेडीं सुद्धा त्या अवधीत आटपतां आली असतीं.

सुदराबाई:—पण बाबा, आपण गरिबांनी इतके मनुष्यबळ कोठून आणायचे?

दगडू:—हेर म्हणून माणसेच पाठविलीं पाहिजेत असे नाही. एकाद्या वर्तमानपत्राचे अकही त्यांचे काम करू शकतील. आपण परवां त्या मासिकात आलेली उपवर वधूची जाहिरात पाहिलीत ना? तशी एखादी श्यामरावांबद्दल जाहिरात दिली पाहिजे.

सुदराबाई:—इश्श! आणि त्या जाहिरातीबरोबर बाळाचा फोटोही द्यायचा वाटतें! मी नाहीं त्याचें जगापुढे असे प्रदर्शन मांडणार.

दगडूः—फोटो न देतां खाणाखुणा दिल्या तरी चालतील. काळसर रंगाचा, उंच व मजबूत बांध्याचा, अठरा वर्षे वयाचा ब्राह्मण मुलगा—

सुंदराबाईः—माझ्या ठेंगण्या आणि नाजूक श्यामला उंच आणि मजबूत म्हटले तर त्याची कोणाला तरी ओळख पटेल का? रंगाबद्दल म्हणशील तर त्यासंबंधानें तिकडचा आणि माझा किती वाद होत असे हें तुला माहीतच आहे. माझ्या श्यामची गणना गोऱ्यातच होईल. निम-गोरा म्हटले तर एखादे वेळीं चालेल. पण तो काळसर आहे हें मी प्राण गेला तरी कबूल करणार नाहीं.

दगडूः—माझा त्याबद्दल आग्रह नाहीं, आईसाहेब. तशी वर्णनांत थोडी चूक झाली तरी ती नांव दिल्यानें भरून निघेल.

सुंदराबाईः—नांव देणें आणि फोटो देणें एकच.

दगडूः—असें कसें बरें म्हणता, आईसाहेब? नांव पुष्कळ माणसांचें एक असू शकेल, पण चेहरा एक असू शकणार नाहीं.

सुंदराबाईः—आणि त्यानें नांव बदललें असलें तर!

दगडूः—हो, ही अडचण आहे खरी.

सुंदराबाईः—शिवाय ती जाहिरात तिकडच्या दृष्टीस पडली तर नुसत्या नांवावरूनही आपला जाहिरातीशीं असलेला संबंध तिकडच्या लक्ष्यात यायचा; आणि तें तर तिकडे मुळींच खपायचें नाहीं. त्यांनीं त्याचें नांव स्वतः सोडलें आहे इतकेंच नाहीं, तर तें नांव घेण्याची घरातल्या सगळ्या माणसांना मनाई केली आहे.

दगडूः—त्याला थोडी युक्ति आहे. रावसाहेब नेहमीं सुधारक आणि नेमस्त पक्षाचींच वर्तमानपत्रें घेतात. जुन्या आणि जहाल मतांचीं पत्रें त्यांना दृष्टीसमोरही नकोशीं वाटतात; आणि त्यातल्या त्यात 'गरुड' पत्रा-बद्दल तर विचारावयासच नको. आपण आपली जाहिरात त्याच पत्रांत देऊं म्हणजे झालें. त्या पत्राचा खपही फार मोठा आहे.

सुंदराबाईः—हो, ही तोड बरी आहे. पण त्या पक्षाचे वाचक या पक्षाच्या पुरुषांच्या बायकांना अशा कामीं मदत करतील असें तुला वाटतें!

दगडूः—बाईसाहेब, हा प्रश्नच असा आहे कीं यावर साऱ्या पक्षांचे एकच मत असायचें. प्रेमळ आईच्या हाकेला धावून न येणारा मनुष्य म्हणजे पशुच म्हटला पाहिजे.

सुंदराबाईः—सगळ्या जगानें माझा धावा ऐकावा आणि घरच्यानीं मात्र पाठमोरें व्हावें असाच माझ्या दैवाचा योग दिसतो.

दगडूः—शिवाय आपणास खालीं सहीच द्यायची नाहीं, तेव्हा आपण कोणत्या पक्षाचे आहांत हें वाचकांना उमगून येण्याचें कारण नाही.

सुंदराबाईः—पण वर्तमानपत्राच्या मालकास तर तें कळेलच कीं नाही? तो घेईल का आपली जाहिरात?

दगडूः—माझ्या मुंबईच्या मुक्कामात त्याची मला जी माहिती मिळाली तिजवरून तो फार दयाळू असावासा वाटतो. शिवाय वर्तमानपत्रकर्ते ज्या जाहिराती देतात त्या नेहमी त्यांच्या पक्षाच्या लोकांच्याच किंवा त्यांच्या मतास धरून असतात असेंही नाही. जाहिरातीबद्दल मिळणारें नाणें खरें असलें तर तिच्यातील मजकुराच्या खरेखोटेपणाकडे ते पहात नाहींत. वैद्यांचीं औषधें, मांत्रिकाचे ताईत वगैरेंच्या ज्या शेकडों जाहिराती रोज आपल्या वाचण्यांत येतात त्यांच्यावर पत्रकर्त्यांचा विश्वास असतो की काय? वाचकही त्यांची किंमत जाणूनच असतात. ते त्याकडे ढुंकूनही पहात नाहींत.

सुंदराबाईः—मग आपल्या जाहिरातीकडे तरी कसे पाहतील? जरी चुकून पाहिले तरी त्या जाहिरातींत आपली जाहिरात लोपून नाहीं का जाणार?

दगडूः—त्या घोळक्यात आपण ती छापणारच नाही मुळीं. अग्रलेख किंवा स्फुट सूचना अशा महत्त्वाच्या मजकुराच्या मध्येच ती ठेविली म्हणजे तिच्याकडे वाचकांचें लक्ष्य गेल्यावाचून रहाणार नाही. रस्त्यानें चालतां चालतां धोंड्याची ठेंच लागली तर चालणारा त्या धोंड्याकडे रागारागानें का होईना, पाहीलच की नाही? शिवाय आपण जाहिरातीला असा चटकदार मथळा देऊ, की वाचकांना तो महत्त्वाचा लेख बाजूला सारून जाहिरातच वाचण्याची इच्छा व्हावी. चालणाराची नजर टोपी किंवा पागोटें घालणाराकडे जरी गेली नाहीं तरी मंदील घालणाराकडे गेलीच

पाहिजे. तेवढ्यानेही भागले नाही तर जाहिरातीची अक्षरे उलटींच छापू. चालणाराचे लक्ष्य इतर कोणाकडेही वेधले नाही तरी भररस्त्यात खालीं डोके वर पाय करून उभा रहाणाऱ्या विक्षिप्त मनुष्याकडे वेधलेच पाहिजे. कुचेष्टेशिवाय प्रतिष्ठा नाही हा नियम माणसाप्रमाणे जाहिरातीनाही लागू आहे, आईसाहेब.

सुंदराबाई:—दगडू, तू मुंबईसारख्या मोठ्या शहरांत राहून बराच शहाणा झाला आहेस कीं! आता तुला दगडूजीरावच म्हणायला हवे.

दगडू:—दगडाला शेंदूर लावला म्हणून त्याला अस्सल देवपण थोडेंच यायला बसले आहे! मी आपला साधा दगडूच बरा आहे, आईसाहेब.

सुंदराबाई:—बाकी इतक्या युक्त्याप्रयुक्त्या करून परिणामीं उपयोग किती होईल याची भारी शंका वाटते मला. पृथ्वीच्या पाठीवर एका नांवाची आणि सारख्या स्वरूपाची माणसे इतकी आहेत कीं नुस्त्या नांवावरून आणि चेहऱ्याच्या व अंगलटीच्या वर्णनावरून बाळाची ओळख पटेल असे वाटत नाही.

दगडू:—तीळ, डाग किंवा अशीच एखादी जन्मखूण नाहीं का देतां येणार?

सुंदराबाई:—डोक्यावर आणि जांघेत अशा खुणा आहेत. पण त्या लोकांना दिसणार कशा?

दगडू:—लोकांना दिसण्यासारख्या खुणा जरी देतां आल्या नाहीत तरी खुद्द श्यामरावांना पटण्यासारख्या तरी आपण देऊंच. ते इथून वाढदिवसालाच निघून गेले ना?

सुंदराबाई:—त्या गोष्टीचे तर मला राहून राहून वाईट वाटते. मी वाढदिवसानिमित्त त्याला स्वतः न्हाऊ घातले, त्याच्या पाटाजवळ बसून काय हवें काय नको हे विचारून जेवूं घातले, आणि त्याच दिवशीं त्याला घराबाहेर घालवून दिलें! दगडू, माझ्यासारखी निष्ठुर आई तुला कुठें तरी दिसेल कारे!

दगडूः—आईसाहेब, त्यांत आपली काय बरे कसूर ? हो, श्यामराव वडिलांच्या रागावर निघून गेले असेही आपणाला जाहिरातीत लिहिता येईल.

सुंदराबाईः—पण लोकाना हा सारा ग्रंथ सांगून काय फायदा ?

दगडूः—नाही. या खुणा केवळ लोकाकरिताच नाहीत. जाहिरात कोणीं दिली हे श्यामरावांना कळावे हाही त्यांचा उपयोग आहेच.

सुंदराबाईः— त्याला कळून तो थोडाच माझ्या हाकेला धावून येणार आहे ! तो गरीब आहे तसा अभिमानीही आहे.

दगडूः—दमयंती पुन्हा लग्न करणार हे ऐकताच नलराजा तिच्या स्वयंवराकरिता धांवून गेला असे आपणच नाही का त्या दिवशी मला सांगितलेत ?

सुंदराबाईः—म्हणजे ? त्याला येथे आणण्याकरिता आम्ही दत्तक घेणार आहोत असे जाहिरातींत लिहावे म्हणतोस ? छे ग बाई ! असे निष्ठुरपणाचे वाक्य माझ्या मनातच येणार नाही, मग जाहिरातींत कुठून येणार ?

दगडूः—तसे लिहिण्याची कांही जरूरही नाही. जाहिरात आपण दिली हे कळताच श्यामराव एक तर गुप्तपणे आपली भेट घेतील किंवा आपणास पत्र पाठवितील; निदान अशी तरी एखादी गोष्ट करतील कीं तिजवरून त्याचा पत्ता काढतां येईल; आणि पत्ता कळला म्हणजे आपणच त्यांना जाऊन भेटू.

सुंदराबाईः—पत्ता कळण्यासारखी अशी कोणती गोष्ट तो करणार ?

दगडूः— आपल्या समाधानाकरिता त्याच पत्रात एखादी सांतवनपर जाहिरात देतील. निदान आपली जाहिरात सग्रही राहून नेहमी वाचतां यावी म्हणून त्या पत्राचे वर्गणीदार तरी होतील. पत्रकर्त्याकडे आपण शोध केल्यास जाहिरात देणाराचा किंवा नवीन वर्गणीदाराचा आपणास पत्ता कळू शकेल.

ही व अशीच आणखीही चर्चा झाल्यानंतर उभयतांच्या मते खालील जाहिरात पाठविण्याचें ठरलेः—

## दुःखीकष्टी आईची हांक

वर्णाने निमगोरा, मध्यम बांध्याचा, दिसण्यात नाजूक व सदा हसतमुख असा श्याम नांवाचा अठरा वर्षांचा ब्राह्मण मुलगा आपल्या वाढदिवशी वडिलांच्या रागाने घर सोडून निघून गेला आहे. त्याची आई रात्रदिवस त्याच्या नांवाने टाहो फोडीत त्याच्या वाटेकडे डोळे लावून बसली आहे. जो कोणी परोपकारी गृहस्थ त्याचा पत्ता 'गरुड' कार्यालयाच्या पत्त्यावर तिला कळवील त्यास गायवासरांची भेट करून दिल्याचें पुण्य व एका उपकृत मातेची अंतःकरणपूर्वक कृतज्ञता यांची जोड मिळेल. याहून अधिक मूल्यवान् बक्षीस देणें त्या बिचारीच्या किंवा दुसऱ्या कोणाच्याही हाती नाहीं.

श्यामराव वाचनालयांत वाचीत बसला असतां त्याचे चित्तस्थैर्य ढळविण्याला हीच जाहिरात कारण झाली. त्या जाहिरातीत त्याच्या आईची अपार माया, त्याच्या गुणाकडेच पहाण्याची दृष्टि, अवगुणाकडे दुर्लक्ष करण्याची किंबहुना त्यांस गुणांचेच रूप देण्याची प्रवृत्ति, त्याच्या विरहाने झालेली केविलवाणी स्थिति वगैरे गोष्टी त्याच्या अंतश्चक्षूसमोर स्पष्टपणे उभ्या राहिल्या. बळवंतरावांनीं आपणास 'काळा' व 'धटिंगण' म्हटले असता सुंदराबाई त्यांच्याशीं वितंडवाद करून व त्यांची हतराजी ओढून घेऊन आपला निमगोरेपणा, मध्यम बांधा व नाजूकपणा कसा स्थापित करी याची त्याला आठवण झाली. जाहिरातींतही त्या गुणांचा आपणावर मायेनें मिथ्या आरोप केल्यामुळे आणि अज्ञानाने आपल्या हल्लींच्या जातीबद्दल व नांवाबद्दल पूर्वीची जात व नांव दिल्यामुळे आपला पत्ता तिला लागण्याचा किती कमी संभव आहे हा विचार येतांच त्याला तिची कींव आली. या निरर्थक जाहिरातीवर लौकरच तिची सारी पुंजी खर्च होऊन जाणार, व आपणाकडून तिला मदत होण्याचे दूरच राहून आपण तिच्या सर्वस्वापहारास मात्र पर्यायाने कारण होणार हे लक्षांत येतांच तो स्वतःची मनां-

तल्या मनांत निर्भर्त्सना करू लागला. त्या जाहिरातीकडे तो किती वेळ तरी मंत्रमुग्धाप्रमाणे पहात होता. नंतर त्याचा कांहीं नवी ठाम विचार झाल्यासारखे दिसले. त्याने मल्हारीबाबाचा दुसरा मुलगा चंदू यास बोलावून आणिले व त्याच्या हाताने 'गरुड' पत्राच्या मालकाच्या नांवे एक कार्ड लिहवून ते पोस्टात टाकिले. पुढच्याच आठवड्यापासून ते पत्र चंदूच्या नांवावर येऊन श्यामला मिळू लागले.

## प्रकरण पांचवें

# गोपनयत्न

श्यामरावाच्या अलीकडील शांत व थोपट आयुःक्रमांत त्याच्या श्रमींची स्मृति जागृत करून खळबळ उडविण्याला 'गरुड'पत्राचा अंक जसा कारण झाला तसा आणखीही एक प्रकार कारण झाला. तो नीट कळण्यासाठीं आपणास कांहीं वर्षें मागें गेलें पाहिजे. त्या वेळीं श्यामचें वय दहा वर्षांचें होतें. तो मधल्या वेळच्या सुट्टींत शाळेंतून घरीं आला असून सुंदराबाई त्यास फराळाचें देत होती. इतक्यांत कांहीं पाहुणेमंडळी आल्याची तिला वर्दी मिळाली. बाहेर ओटीवर येऊन पहाते तों तिला आपला मावसभाऊ गोपाळराव, त्यांची पत्नी राधाबाई व त्यांची एकुलती एक मुलगी चिमणी आपआपल्या सामानासह उभीं असलेलीं दिसलीं. गोपाळराव इनामदार हे चिमणपुरचे एक सुखवस्तु रहिवाशी असून ते तेथून पत्नीच्या एका आप्ताच्या लग्नाकरितां दूरच्या गांवीं गेले होते आणि तेथून परत येतांना वाटेंत मावसबहिणीची भेट घेण्या-करितां व एक जवळचें प्रेक्षणीय स्थल पहाण्याकरितां हरिणपुर स्टेशनावर उतरले होते. सुंदराबाईनें त्यांचें प्रेमानें स्वागत केलें; पण त्यांना तें स्थळ पहाण्याकरितां चार सहा घटकांतच निघावयाचें असून तेथून ते परस्पर पुढील स्टेशन गाठून चिमणपुरास जाणार असल्यामुळें त्यांचा येथें फारच थोडा वेळ मुक्काम होणार हें कळल्यावर तिच्या मनाचा हिरमोड झाला. पण त्यांतल्या त्यांत समाधान मानण्यालाही तिला जागा होती. गोपाळराव व बळवंतराव यांचे संबंध फारसे सलोख्याचे नव्हते. सुंदराबाईच्या माहेर-कडील सख्खीं, चुलत व मावसमामेभांवडें सारींच जुन्या मताचीं, जुन्या चळणाची व कमी सुशिक्षित असल्यामुळें बळवंतरावास त्यांजबद्दल एक प्रकारची तुच्छताबुद्धि वाटत असे, व ती त्यांच्या वर्तनांतही दिसत असे. यामुळें बळवंतरावांच्या भेटीचा प्रसंग होतां होईतों त्यांजकडून टाळण्यांत येई. बळवंतराव कचेरींत गेल्यावर त्यांच्या घरीं जाऊन ते परत येण्यापूर्वींच

मुक्काम हलविण्याचा विचार गोपाळरावांनीं आपल्या मेहुण्याचें आपल्याविषयींचें मत लक्षात आणूनच ठरविला होता. उभयतांची भेट झाल्यास इष्ट प्रकारापेक्षां अनिष्ट प्रकारच घडून येण्याचा संभव अधिक हे जाणून सुंदराबाईनेंही त्या विचारात मोडता घातला नाहीं. बळवंतराव परत येण्यास अजून तीन तासांचा अवकाश होता. तेवढ्या वेळात तिनें दोनचार दिवसांसारख्या मोठ्या मुक्कामात आरामानें करावयाच्या सर्व गोष्टी घाईघाईनें उरकून टाकल्या. तिनें आपल्या पाहुण्याकडून अभ्यंगस्नान करवून त्यास सुग्रास भोजन घातलें. तें चाललें असतां तिनें त्याच्या पानाजवळ बसून आपल्या आईबापाकडची व इतर निकटच्या आप्तांची सर्व हकीगत विचारून घेतली. जेवणानंतर त्यास मुखशुद्धीकरितां नाना प्रकारचा मेवा व तऱ्हतऱ्हेचीं फळें देऊन तांबूल दिलें. नंतर काही वेळ ती आपल्या मुलांचें कौतुक करण्यात व चिमणीचें तिच्या मातापितराकडून होणारें कौतुक ऐकण्यात मग्न झाली. तिनें चिमणीकडून बायकांचीं गाणीं व श्यामकडून प्रार्थनासंगीतांतील पदें म्हणवून घेतलीं. श्यामच्या मास्तरांनी त्याजकडून वार्षिक समारंभाकरितां एक दोन भाषणें पाठ करवून घेतलीं होतीं, तींही तिनें त्याजकडून अभिनयासह म्हणवून घेतलीं. श्यामच्या गाण्याचा व भाषणाचा गोपाळरावांवर कसा काय परिणाम होतो हें ती लक्ष्यपूर्वक पहात होती. हें सारें घडवून आणण्यात तिचा मुलांचें कौतुक करण्यापलीकडे एक उद्देश होता. गोपाळरावांची मुलगी चिमणी तिला फार आवडली होती. ती या वेळीं आठ वर्षांची असून जुन्या समजुतीप्रमाणें विवाहाला योग्य झाली होती. तिचा वर्ण गोरा, चेहरा गोंडस, बांधा मोहक व स्वर मधुर असून तिच्या बोलण्याचालण्यात एक प्रकारचा प्रेमळपणा व लाडकेपणा भरला होता. साडीनें वेष्टिलेलें तिचें चिमुकलें शरीर पानांनीं वेष्टिलेल्या कळीप्रमाणें सुंदर दिसत होतें. सुंदर शरीरापेक्षाही मनास मोह पाडणारा विभ्रम तिच्या प्रत्येक हालचालींत दिसून येत असे. तिच्या गतींत, अंगविक्षेपात, मान मुरडण्यात, फार काय पण भिवयांच्या नाचातसुद्धां एक प्रकारचें मार्दव भरलेलें दिसे. ही आपली सून झाल्यास आपल्या भाग्यास सीमा राहणार नाहीं असें सुंदराबाईस वाटत होतें. श्यामचा काळसर पण गोड व उमदा चेहरा, धीटपणा, मोकळा व गोड स्वभाव,

इतरास खूष करण्याच्या कामीं दिसून आलेली तत्परता इत्यादि गुण पाहून गोपाळराव व त्याची पत्नी त्याजवर बालबाल खूष झाली होतीं. त्यास जांवई करण्याचा विचार त्याच्याही मनांत घोळत होता. त्या विषया-वर बोलण्याची संधि मिळावी म्हणून सुंदराबाईनें मुलास बाहेर खेळायला जाण्यास सांगितलें तेव्हा त्या दंपत्यास आपल्या मनासारखेंच झालें असें वाटलें. तथापि मुलें बाहेर जाण्यापूर्वी सुंदराबाई त्यांना कांही वेळ जोडीनें जवळ जवळ उभी करण्यास विसरली नाही. मुलास बाल्यसुलभ अजाण-पणामुळें तिच्या हेतूची कल्पना नव्हती; पण त्यांची मनें परस्परांकडे स्वभावतःच ओढ घेत असल्यामुळें तीं हसतहसत एकमेकास चिकटून उभीं राहिलीं, व गोपाळरावाकडून बाहेर जाण्याचा इशारा मिळेपर्यंत तशीच उभी होतीं. तीं निघून गेल्यावर बहीणभावडामध्यें मुलाच्या लग्ना-संबंधानें बराच वेळ चर्चा झाली. गोपाळराव स्वतः इंग्रजी पांचसहा इयत्तां पर्यंतच शिकलेले असल्यामुळें त्याजकडून श्यामच्या शिक्षणासंबंधानें अड-चण उपस्थित होण्यासारखी नव्हती. कुळ, संपत्ति, मानमान्यता या-संबंधानें या स्थळांत खोड काढण्याला जागाच नव्हती. लग्नाला बळवंत-रावांची संमति कशी मिळेल हीच काय ती मुख्य अडचण होती, व ती दूर होण्यासंबंधानें उभयतां बहीणभावडास सारखीच शंका वाटत होती. अखेर योग्य संधि येतांच सुंदराबाईनें नवऱ्यापाशीं गोष्ट काढावी व त्याची अनुकूलता मिळण्याचा संभव दिसल्यास चिमणपुरास पत्र पाठवावें असें त्या उभयतांमध्यें ठरलें.

इकडे श्याम व चिमणी बाहेर पडतांच त्यानें तिला आपलें सबंध घर दाखविलें. नंतर तिला आपल्या अभ्यासाच्या खोलींत नेऊन तेथें असलेला आपला चिमुकला अजबखाना दाखविला. त्यांत रवरी व दोऱ्याचे चेंडू, पतंग, भोंवर, दगडाच्या व कांचेच्या गोट्या, चित्रविचित्र रंगाच्या गार गोट्या, पत्त्याचे जोड, कापडावरोबर व कागदी विड्यावरोबर येणारीं रंगीबेरंगी चित्रें, कळ दाबतांच ओरडणारीं किंवा उडणारीं पशुपक्ष्यांचीं चित्रें, किल्ली देतांच रुळांवरून डब्यासह धावणारें इंजन, नकली घड्याळें, अक्षरें मोठीं करून दाखविणारी जाड भिंग, सुताच्या व शिंपाच्या गुड्या इत्यादि जिनसांची भेसळ झाली होती. ती पाहून चिमणी म्हणाली,

"श्याम, आमच्या चिमणपुराला तू आलास म्हणजे मीसुद्धा तुला आपल्या बाहुल्या, खेळाचे आणि भातुकलीचे सामान दाखवीन." श्यामने पूर्वी कधीही चिमणपुरचे नाव ऐकिले नव्हते. त्याने आश्चर्याने विचारले, "चिमणे, तुझ्या गावाचेही नाव चिमणपुरच? ते नाव तुझ्या नावावरून पडले की काय?" चिमणी हसून म्हणाली, "इश्श! माणसावरून का कधीं गावांची नावे पडतात? काहींच तरी!" श्याम आपल्या तुटपुंज्या पांडित्याचे प्रदर्शन करीत म्हणाला, "तुला हे खोटे वाटते? मी आपलें पुस्तकच काढून दाखवितो, म्हणजे तुला कळून येईल की औरंगजेब बादशहावरूनच औरंगाबाद शहराचे नाव पडले. मला तर वाटते की, शहापुर, शिवापुर ही नावेंसुद्धा शहाजीच्या आणि शिवाजीच्या नावावरूनच पडलीं असलीं पाहिजेत. मग तुझ्या नावावरून तुझ्या गावचे नाव पडण्याला काय हरकत आहे!" बिचारी चिमणी अजून मराठी दुसऱ्या इयत्तेतच शिकत होती. ती श्यामची विद्वत्ता पाहून थक्कच झाली आणि म्हणाली, "मग आमच्या गावाचेही नाव तू म्हणतोस त्याप्रमाणे माझ्या नावावरून पडले असेल; नाही कोणी म्हणावे? तुझ्या पुस्तकातही सापडेल ती गोष्ट."

श्यामः—अं हं. आमच्या भूगोलात फक्त मोठ्याच शहरांची नांवें आहेत. लहान गावाचा भूगोल कदाचित् बी.ए., एम्. ए.च्या परीक्षांकरितां ठेवीत असतील.

चिमणीः— आम्हाला फक्त तीस पाढ्यापर्यंत उजळणी असते. बी.ए.-च्या मुलाना शंभर पाढे शिकवितात की काय?

श्याम म्हणाला, "तर काय! आणि एम्. ए.च्या मुलाना हजार पाढ्यांपर्यंतही शिकवीत असतील. ती मुले लाबलांब झगे घालून परवाचा म्हणत असतील तेव्हा मजा मजा होत असेल, नाही?" हजार पाढ्याचे गणित चिमणीच्या आटोक्यापलीकडचे होते. सबब ती नुसती आश्चर्याने भिवया चढवून स्तब्ध बसली. यानंतर श्यामने कागदाच्या पाचसहा पुड्या काढून त्यांतून त्याच्या आईने त्यास दिलेले बदाम, पिस्ते, खेदाणा, काजू, अक्रोड चिमणीला खावयाला दिले व तिच्याबरोबर आपणही खाल्ले. चिमणीचें नुक्तेच जेवण झालेले असल्यामुळे तिला मुळीच भूक नव्हती. पण आपल्या नवीन सोबत्याचा हिरमोड होऊ नये म्हणून व त्याच्या प्रत्येक व्यवसायांत

भाग घेण्यापासून तिला एक अननुभूत आनद होत होता म्हणून तिनें आढेवेढे न घेता त्या पदार्थाचे मनमुराद सेवन केले. नतर श्यामने आपल्या आवडीची बरडी सुपारी काढून ती चिमणीच्या दाताने फोडण्या-करिता धोतरांत गुडाळली; व ती आपल्या दातात धरणार इतक्यांत त्याला कसलासा विचार येऊन तो म्हणाला, "नाहीं तर तूच ही फोड, आणि मला अर्धी देऊन तू अर्धी घे. तू आपल्या दातांनीं फोडलीस तरी मी आनंदाने खाईन.तुला ती चिमणीच्या दातानेच फोडण्याचे कारण नाहीं."

चिमणी.—वा! मीं नुसत्या दातांनींच जरी फोडली तरी ती चिमणीच्या दातांनीच फोडल्यासारखी नाही का झाली?

हसत हसत इतके बोलून तिने आपल्या दातांनी सुपारी फोडली, आणि अर्धी त्याच्या हातात देऊन अर्धी आपण खाल्ली.

अशा निष्कपट सभाषणात एक तास कसा गेला ते त्या बालकास कळलेही नाही. इतक्यांत दारांशी गाडी जुपून तयार असल्याची वर्दी आल्यामुळे त्यास आटपते घ्यावे लागले. चिमणी जाण्याकरिता उठली तेव्हां श्यामने घाईघाईने आपल्या टेबलाचा खण उघडून एक खरेखुरें घड्याळ काढिले, व ते चिमणीच्या हाती देऊन तो म्हणाला. "चिमण, हें घड्याळ मला आईने माझ्या गेल्या वाढदिवसाला बक्षीस दिले, तेव्हा-पासून मी ते जपून ठेविले आहे. मी ते दुसऱ्या कोणालाही दिले नसते. तुला म्हणूनच देतो. माझी आठवण म्हणून ठेवशील ना?" चिमणी म्हणाली, "पण माझ्यापाशी तुला उलट देण्याला कांहींच नाही. तूं चिमणपुराला आला असतास म्हणजे मीही तुला असेच एकाद कांही तरी दिले असते." श्याम उत्तरला, "कांही हरकत नाही. तू माझी आठवण ठेवलीस म्हणजे त्यात सारे कांही आले." इतके बोलून तो तिला गाडीपर्यंत पोंचविण्यास गेला. समान वयाच्या व समान प्रकृतीच्या मनुष्याचा सहवास गाढ स्नेहात परिणत व्हावयास कालाचे फारसें साहाय्य लागत नाहीं. श्यामचा व चिमणीचा सहवास फार तर एका प्रहराचा असेल; पण तो किती तरी वर्षांचा आहे असे त्या उभयतांस वाटू लागले होतें. चिमणी आपणास सोडून जाणार व तिची पुढे भेट होणेंही जरा दुरापास्तच हा विचार मनांत येतांच श्यामच्या तोंडून शब्द

उमटेना आणि त्याच्या डोळ्यास पाणी आले. ते लपविण्यासाठीं त्याने तोंड फिरविले. तिकडे चिमणीचीही तीच अवस्था झाली होती. पण वडील माणसे डबडबलेल्या डोळ्यांनीं परस्पराचा निरोप घेण्यात मग्न झालेलीं असल्यामुळे त्यांच्या लक्ष्यांत हा प्रकार आला नाही. इतक्यांत गाडी चालू झाली. ती दिसे तोंवर उभयता मायलेक तिजकडे टक लावून पहात होतीं. नंतर ती जड अंतःकरणानीं आपल्या नित्याच्या व्यवसायाला लागलीं.

संध्याकाळीं बळवतराव घरीं आले तेव्हा त्यास सुंदराबाईकडून पाहुणे येऊन गेल्याचे वर्तमान कळलें. ते सांगताना तिने चिमणीची खूपच तारीफ केली व ती श्यामला करून घेतल्यास त्यांचा जोडा उत्तम शोभेल असेही ध्वनित केले. बळवतरावानीं काही वेळ थांबून "ती काय शिकते?" असा प्रश्न केला. त्यास "गुढघ्यायेवढी पोर ती कितीशी शिकलेली असणार?" असा जबाब मिळाला. बळवतराव म्हणाले, "गुढघ्यायेवढी पोर शिकण्यालाच काय ती लहान दिसते. लग्नाला मोठीच आहे म्हणावयाची!"

सुंदराबाईः—लग्न तरी आतां थोडेंच कोणी करायला बसले आहे!

बळवतरावः—आता करावयाचें नाही तर त्याचा वाद तरी कशाला पाहिजे? ती शिकेल सवरेल तेव्हा पहाता येईल. तोंवर आमच्या श्यामच्या-ही शिक्षणाचा अजमास करिता येईल.

यानंतर सहा वर्षांनी श्यामच्या अभ्यासात फारशी प्रगति दिसून न आल्या-मुळे बळवतराव त्याचा विवाह लांबणीवर टाकीत होते तर सुंदराबाई सुन-मुख पहाण्यासाठीं अधीर झाली होती. चिमणीचे वय चौदा वर्षांचे झालें असून तिच्या आईबापांच्या मते तिला यापुढे अविवाहित ठेवण्याची मुळीच सोय नव्हती. गोपाळरावांकडून सुंदराबाईस विवाहनिश्चय करण्या-बद्दल निकडीचीं पत्रांवर पत्र जाऊं लागली. अखेरीस तिजकडून नकारात्मक जबाब आल्यावर त्यांनी आपल्या वैभवास शोभण्याजोगें दुसरें स्थळ पाहून शुभ मुहूर्तावर चिमणीचा विवाह उरकून टाकिला

चिमणीच्या सहवासात घालविलेला प्रहर हा श्यामच्या आयुष्यातील अल्पच पण अत्यंत उज्ज्वल असा भाग होता. पुढील आठ वर्षांच्या भेसूरपणामुळे तो भाग त्यास फारच उज्ज्वल वाटत होता. त्याची स्मरण-

शक्ति जरी फारशी धड नव्हती तरी तिला प्रेमाचे पाठबळ मिळाल्यामुळे त्या प्रहरातील प्रत्येक प्रसगाचा, विशेषतः त्याच्या व चिमणीच्या सभाषणाचा धागान् धागा त्याच्या स्मरणांत ताजा राहिला होता. हरिणपुरच्या स्टेशनावर मल्हारीबावांनीं चिमणपुराचा उच्चार करितांच तशा विषण्ण व विकल स्थितीतही त्याची बधिर झालेली स्मरणशक्ति एकदम जागृत होऊन तिने त्याच्या मनात घोळणाऱ्या 'कोठें जावयाचें ?' या प्रश्नाचा निर्णय चिमणपुरातर्फे देवविला होता. चिमणपुर येथील नवीन परिस्थिती-मुळें व जीवनकलहात नित्य नवे नवे म्हणून उभे रहाणाऱ्या प्रश्नामुळे त्यास चिमणीबद्दल विचार करण्यास बरेच दिवस सवड मिळाली नाही. एकादे वेळी विचार आलाच तर तो "मला अविवाहित शूद्राला एका ब्राह्मण विवाहित मुलीचें चिंतन करण्याचा काय अधिकार आहे ?" असा स्वतःस प्रश्न करून तो विचार मनातल्या मनातच दाबून टाकी. रात्रीच्या वर्गात प्रार्थनासगीतातील पदें आळवितांना कधी कधीं त्यास "हें पद मीं चिमणीसमोर म्हटलें होतें." असा विचार आल्यावाचून रहात नसे. त्याची तिजविषयींची स्मृति प्रेममिश्रित नसून आदरमिश्रित असे. चिमणीची व त्याची भेट होऊन फार वर्षे झाली होतीं. आदरविषयीभूत वस्तूपासून अदबीने अतरावर उभे रहावेंसे वाटतें व दूरस्थ वस्तूबद्दल आपोआप आदर वाटतो या नियमात आदराशीं कार्यकारणभावानें सबद्ध म्हणून दर्शविलेलें अतर स्थानांमधील नसून कालामधील असलें तरी त्या नियमास बाध येत नाही. चिमणीचा सहवास जों जों भूतकालात मागें मागें पडत गेला तों तों श्यामचा तिजविषयींचा आदर वाढत गेला. तिच्या विवाहानें उभयतामधील अतर आणखीही वाढवून त्या आदरात बरीच भर घातली होती. 'गरुड' पत्राचा अंक श्यामच्या हाती पडला त्या सुमारास त्याची तिजविषयींची भावना मातृविषयक भावनेच्या किंचित् खालच्या पायरीची अर्थात् ज्येष्ठ भगिनीबद्दल असावी तशी होती. उभयताच्या परि-स्थितीतील अतरास योग्य इतकें अतर उभयतामध्यें ठेवून दुरूनच तिचें आदरानें चिंतन करणें योग्य आहे असें त्यास वाटत होतें. पण अंक हातीं पडल्यावर मात्र तिच्या माहेरीं जाणें त्यास आवश्यक वाटू लागलें. आपल्या आईनें ज्याअर्थी वर्तमानपत्रांत जाहिरात दिली आहे त्याअर्थी तिनें

गोपाळरावासही आपणाबद्दल चौकशी करण्याबद्दल पत्र घातलेच असेल. यांचा कदाचित् आपणाबद्दल ब्राह्मणमंडळीमध्ये शोधही चालला असेल. तो शोध निष्फळ ठरल्यावर चौकशीचा रोख ब्राह्मणेतराकडेही वळेल. तसे होऊन आपण बेसावधपणे सापडण्यापूर्वी आपणच गोपाळरावाच्या येथे कोणत्या तरी निमित्ताने जाऊन ते किंवा त्यांच्या कुटुंबातील दुसरे कोणी आपणास ओळखू शकते किंवा काय याचा अंदाज पहाणे जरूर आहे. त्यापैकी कोणी आपणास ओळखिल्यास त्याबद्दल आपल्या आईकडे न कळविण्याबद्दल त्याची विनवणी केली पाहिजे. असा विचार करून श्याम गोपाळरावाच्या घरी जाण्याचे निमित्त शोधू लागला. ते त्यास लौकरच सापडले. त्याचे रात्रीचे वर्ग सुरू होऊन बरेच दिवस झाले होते, आणि त्याच्या शिष्यशिष्यिणींची लेखनवाचनात व हिशोबात बरीच प्रगति झाली होती. जवळच येऊन ठेपलेल्या पावसाळ्याकरिता वर्गास एखादी इमारत न मिळाल्यास त्याच्या शिक्षणात खंड पडणार होता. इमारत मिळविण्याकरिता वर्गाची सुस्थिति गावकऱ्यांच्या नजरेस आणणे भाग होते. गोपाळराव देशमुखासारख्या गावातील प्रमुख गृहस्थांकडून शिष्यांची व त्यांच्या बायकामंडळीकडून शिष्यिणींची परीक्षा घेवविण्याचा योग घडवून आणल्यास वर्गाची सोय होऊन तो त्यास ओळखितात की नाही हेही सहज अजमाविता येण्यासारखे होते. ही युक्ति सुचताच त्याने वेळ न दवडता आपले नेहमीचेच कपडे जरा नीटनेटकेपणाने अंगावर चढविले, व ब्राह्मण आळीतील देशमुखांचा वाडा गाठला. देवडीवरील शिपायाने त्याचे नाव विचारले, व ते मालकास कळविण्यासाठी तो आंत निघून गेला. श्यामला गेल्या पाचसहा महिन्यांत ब्राह्मणाच्या घराचा उंबरठा ओलांडण्याचे कारण पडले नव्हते. ते दिवस त्याने गावच्या एका अव्यवस्थित व गलिच्छ भागात मागसलेल्या वर्गाच्या वस्तीत गरीबी रहाणीने काढले होते. आज आपण एका कुलीन व संपन्न ब्राह्मण गृहस्थाच्या घरी कुणबी म्हणून आलों आहोत या विचाराची अपूर्वता त्याच्या अंगावर रोमांच उभे करावयास पुरेशी होती. तो गृहस्थ कोणी परका नसून आपला निकट-चा आप्त आहे, इतकेच नाही तर एकदा त्याचा विचार आपली मुलगी आपणास देण्याचा होता ही कल्पना त्या विचाराच्या मागोमाग येताच

त्याची चित्तवृत्ति क्षुब्ध झाली असल्यास नवल नाहीं. त्याच्या कल्पन चक्षूसमोर चिमणीची बालमूर्ति उभी राहिली, व तिच्या सहवासात गेलेल्या अत्यंत मधुर पण अत्यंत अल्प कालांतील प्रत्येक प्रसंगाचे त्याला स्मरण झालें. हल्लीं ती येथें असेल का, व असली तर आपणास ओळखील का असा विचार त्याच्या मनात उद्भवला. इतक्यात त्याच्या कानांवर बांगड्याचा आवाज आला; त्याबरोबर त्याची छाती धडधडू लागून अंगातील रक्त उसळ्या मारूं लागलें. इतक्यांत एक प्रौढ वयाची व तेजस्वी पण खिन्न चेहऱ्याची स्त्री त्याच्या समोरून जाऊं लागली. ती गोपाळरावाची पत्नीच आहे असें अंशतः अंधुक स्मृतीच्या व अंशतः तर्कांच्या बळावर त्यानें ओळखिलें. तिनेंही त्याजकडे निरखून पाहिलें; पण त्याला ओळखिल्याचें चिन्ह तिच्या तोंडावर मुळीच दिसलें नाहीं. श्यामचा जीव काहींसा खाली पडला. आपल्या मामीनं जर आपणास ओळखिलें नाहीं तर मामानें तरी का ओळखावें या विचारानें त्याच्या मनास बराच धीर आला. इतक्यात रावसाहेब बोलावीत आहेत अशी शिपायानें वर्दी दिली, व श्याम त्याच्या मागोमाग एका दिवाणखान्यात गेला. तेथें एक प्रौढ गृहस्थ सचिंत मुद्रेनें बसले होते. ते गोपाळरावच असल्याबद्दल श्यामची जरी खात्री होती तरी त्यांची त्याजबद्दलची आठवण इतकी अस्पष्ट झाली होती, कीं ते त्यास दुसरीकडे भेटले असते तर त्यानं त्यास मुळींच ओळखिलें नसतें. तो अदबीनें रामराम करून त्याजपासून काहींशा दूर अंतरावर बसला. ते पाहून गोपाळराव म्हणाले, "इतके दूर बसण्याचें काहीं कारण नाहीं. ब्राह्मण व ब्राह्मणेतर यामध्यें उत्तरोत्तर अधिकाधिक सख्य होत गेलें पाहिजे. तुम्हीच जर असा परकेपणा ठेवूं लागलात तर तें कसें व्हावें? त्यातून तुमची योग्यता इतर मराठ्यांच्या योग्यतेपेक्षां निराळी आहे. तुम्हीं एक रात्रीची शाळा काढिली आहे ना!"

"होय, रावसाहेब. तिच्यासंबंधानेच एक विनंति करण्याकरिता मी आलों आहे."

"शाळा काढण्याला तुमचें वय जरा लहानच आहे, नाहीं का?"

"रावसाहेब, ब्राह्मणांतल्याप्रमाणें आमच्यांत सुशिक्षित मंडळी फार नाहींत. ज्याला ज्याला म्हणून कांहीं र ठ फ येत असेल त्यानें त्यानें

आपल्या अशिक्षित बधूंना शिकविण्याचे व्रत घेतल्याशिवाय आमचा समाज सुधारणार कसा ? आमच्या शाळेत प्रत्येक विद्यार्थ्यांकडून तशा अर्थाची शपथच घेवविण्यात येते."

" योग्य ! योग्य ! तुम्ही विद्यार्थ्यांकडून फी घेत नाहीं म्हणून ऐकतों. मग तुमचा चरितार्थ कसा चालतो ?"

" एका जिवाला ते कितीसे लागणार ? माझ्या धंद्यात जी प्राप्ति होते तिच्यातून माझ्या खाण्यापिण्याचा खर्च जाऊन बरीच बचत उरते, रावसाहेब."

" तुमचा धंदा तरी कोणता ?"

" मी हमाल आहे, रावसाहेब, आणि म्हणूनच मी आपणापासून दूर बसलो होतो."

" छे:, छे: ! तुम्ही नुसत्या धंद्यावरून स्वतःला हीन लेखण्याचे मुळींच कारण नाहीं. तुमचा धंदा कळल्यापासून तर मला तुमच्याबद्दल फारच आदर वाटू लागला आहे. दिवसा अंगमेहनतीनें पैसा मिळविणारे व रात्री मानसिक श्रम करून विद्याधनाचे दान करणारे आपल्या लोकात कितीसे हमाल सापडतील ? जो इसम डोक्यावर ज्ञानाचा बोजा विनाकारण वहातो त्यालाच हमाल म्हणणे रास्त होईल. मग तो ब्राह्मण असो किंवा ब्राह्मणेतर असो. तुम्ही भावी पिढीचे गुरु आणि म्हणून सर्वांस वंद्य आहात."

" या स्तुतीला मी पात्र नसलो तरी आपली आमच्या कार्याला अंतः-करणपूर्वक सहानुभूति आहे येवढें तरी आपल्या बोलण्यावरून समजण्यास हरकत नाही."

"मुळींच नाही. बोला, माझी तुम्हांला कोणत्या बाबतीत मदत पाहिजे ? वर्गणी पाहिजे असेल तर तुम्ही म्हणाल तो आंकडा घालण्याला माझी तयारी आहे."

" तूर्त वर्गणीची जरूर नाहीं. पाट्या, पेन्सिली, कागद वगैरे साहित्य प्रत्येक विद्यार्थी आपल्या खर्चानेच आणीत असतो. विद्या अगदी फुकट मिळण्यापेक्षां थोडीशी पदरमोड होऊन मिळाली तर तिची किंमत अधिक वाटते. आम्हांला तूर्त पावसाळ्याकरिता एखाद्या निवाऱ्याच्या जागेची

जरूर आहे. ती गावाच्या सांदीकोंदीत असली तरी चालेल. मात्र ती अंमळ प्रशस्त असावी आणि तिजवर छप्पर असावें."

"तुम्ही म्हणतां तशी एक जागा मजपाशीं आहे. ती मी तुमच्या शाळेच्या उपयोगाकरिता आनंदानें देईन."

"पण आपणांस शाळेची प्रगति दाखविल्याशिवाय ती घेणं मला प्रशस्त वाटणार नाहीं त्याकरिता आपणास माझ्या शिष्याची व शिष्यिणी-ची परीक्षा घेण्याची तसदी घेतली पाहिजे.'

"मुलांमुलींची परीक्षा मींच घ्यायची म्हणता ?"

"त्याला काय हरकत आहे ? आम्हा कुणब्यामाळ्यांत मुळींच गोषा नाहीं. आमच्यातील बायकांपुरुषांना जवळजवळ बसून विद्यादान घ्यायला मुळींच संकोच वाटत नाहीं."

'पण आम्हा ब्राह्मणांना वाटतो ना ! तुमच्या शिष्यशिष्यिणींची मीं परीक्षा घेतली तर त्यांना संकोच वाटणार नाहीं, पण मला वाटेल, त्याची काय वाट ?"

"तसें असेल तर आपण पुरुषांची व बाईसाहेबांनीं स्त्रियांची घ्यावी."

"बाईसाहेबांचें अकटोविकट ज्ञान तुम्हाला माहीत असतें तर तुम्हीं ही सूचना केलीच नसती. त्यांची योग्यता परीक्षक म्हणून तर नाहींच; पण विद्यार्थी या दृष्टीनें सुद्धां त्यांची योग्यता आपल्या शाळेंतील कनिष्ठ विद्यार्थ्यांच्याइतकी ठरणार नाहीं. तथापि तुम्हांला अगदींच नाउमेद होण्याचें कारण नाहीं. आमची मुलगी चिमणी माहेरपणाकरिता लौकरच येणार आहे. तिला थोडंबहुत शिक्षण मिळालेलें असून शिक्षणाच्या बाबतींत पुढाकार घेण्याची हौसही आहे."

"तसें असेल तर आमच्या विद्यार्थिनींच्या परीक्षेसंबंधाची अडचणही उरली नाहीं म्हणावयाची."

"मी तर म्हणतों कीं तुमच्या विद्यार्थ्यांचीही परीक्षा तिनेंच घ्यावी."

"पण ही गोष्ट ब्राह्मण समाजाला मान्य होईल का ?"

"कुणबी मुलांमुलींची परीक्षा ब्राह्मण पुरुषानें घेण्यास तुमची जर हरकत नाहीं तर ब्राह्मण स्त्रीनें घेण्यास आमची तरी हरकत कां असावी ?

तुम्ही जसा आम्हावर विश्वास ठेवता तसा आम्ही तुम्हावर ठेवावयास नको का ? "

" खुद्द चिमणाताईंस ते आवडेल का ? "

" तिला स्त्री-पुरुषांच्या मिश्र सभातून बोलण्याची चांगलीच सवय आहे; म्हणून तिला या बाबतीत संकोच वाटण्याचे मुळीच कारण नाही. उलट तिला या कामी उत्साहच वाटेल."

" आपण त्यांच्याबरोबर येऊन परीक्षेत काही भाग न घेतल्यास तेही बरे दिसणार नाही."

" मी तिच्याबरोबर येणारच नाही म्हणजे झाले. मग बरेवाईट दिसण्याचा प्रश्नच कुठे निघतो? माझाही यात एक मतलब आहे. तुम्हांपाशी सांगण्यास हरकत नाही. किंबहुना तुम्हांला तो सांगितल्याने माझ्या कार्याला मदतच होणार आहे. 'गरुड' पत्रात 'दु:खीकष्टी आईची हाक' या मथळ्याखाली आलेली जाहिरात तुमच्या वाचण्यात आली असेलच ! "

श्यामच्या डोळ्यात आसवे उभी राहिलेली पाहून गोपाळराव पुढे म्हणतात, " तुम्हासारख्या कनवाळू मनुष्याच्या अंत:करणाचे पाणी पाणी करून सोडण्यासारखीच ती जाहिरात आहे यात शंका नाही. ती माझ्याच मावसबहिणीने दिलेली आहे. ती नावाला जरी माझी मावसबहीण असली तरी प्रेमाने सख्ख्या बहिणीसारखी आहे. आमची चिमणी तिच्या मुलाला देऊन ते प्रेम अधिकच दृढ करण्याचा आमचा हेतु होता. पण त्या गोष्टी आता कशाला पाहिजेत ! ते लग्न कांहीं कारणामुळे फिसकटले; आणि आता तर आमचा भाचाच नापत्ता झाला आहे. तो निघून गेल्यावर माझ्या बहिणीने जे अंथरुण धरिले ते महिनाभर सोडिलें नाही. त्यानंतर दोनतीन महिने शोधात गेले. त्यात निराशा झाल्यावर हा जाहिरातीचा उपाय करून पाहिला आहे. जाहिरात प्रसिद्ध झाल्यावर लवकरच 'गरुड' पत्रास काही नवे वर्गणीदार मिळाल्याचे माझ्या बहिणीस त्या पत्राच्या मालकाकडून कळले. त्यांपैकी बरेचसे ब्राह्मणेतर असून ते बहुधा त्या पत्रांत त्यांसबंधाने आलेल्या एका सहानुभूतिपर लेखावरून झाले असावे. नवीन वर्गणीदारांत कांहीं ब्राह्मणही आहेत. त्यांचा व

त्यानंतर ब्राह्मणेतरांचाही शोध करण्याकरिता माझ्या वहिणींने एका इसमाची रवानगी केली आहे. आपल्या गांवच्याही काहीं इसमानीं 'गरुड' पत्र सुरू केले आहे. त्यांचीं नांवे मला वहिणींने कळविली असून त्यांच्या शोधाचे काम मजकडे सोंपविले आहे. मीं आमच्या ब्राह्मणआळींत बारकाईने तपास करून पाहिला; पण तेथें माझा भाचा नसल्याबद्दल माझी खात्री झाली आहे. तो ब्राह्मणेतरात बिऱ्हाड करून राहिला असेल असें मला वाटत नाहीं. पण तो तेथें रहात आहे असें धरूनच शोध केला पाहिजे. वहिणींने इतक्या विश्वासाने सोंपविलेल्या कामाची थोडीसुद्धा हेळसांड करून उपयोग नाहीं. प्रथम मला येथील ब्राह्मणेतरामधील नवीन वर्गणीदारापैकी 'गरुड' पत्रातील सहानुभूतिपर लेखामुळे किती झाले व तुमच्या शाळेतील वाढत्या शिक्षणामुळे किती झाले याची छाननी केली पाहिजे आणि उरलेल्या वर्गणीदारावर बारकाईने नजर ठेविली पाहिजे. आतां मी ब्राह्मणेतराच्या वस्तीत स्वतः किंवा लेह्यामार्फत जर उघड उघड शोध चालविला तर माझ्या भाच्यास त्याचा सुगावा लागून तो तेथून नापत्ता व्हावयाचा. म्हणून त्याच्या बिऱ्हाडाचा पत्ता लावण्याऐवजी तोच आपण होऊन तुमच्या शाळेसारख्या सार्वजनिक ठिकाणी येईल अशी योजना केली पाहिजे. त्याकरिता परीक्षेनंतर एखादा जाहीर बक्षीससमारंभ करणेही वावगे होणार नाहीं. माझ्या बेताचा आणि तुमच्या शाळेच्या परीक्षेचा संबध आता तरी तुमच्या लक्ष्यात आला ना ?"

"अस्सं! आणि म्हणूनच आपण स्वतः न येता चिमणाताईच्या हातून परीक्षेचे काम उरकणार तर ? योजना कांहीं वाईट नाही. पण बक्षीससमारंभास जमणाऱ्या मोठ्या समाजातून आपल्या भाच्यास नेमके हुडकून काढण्यास चिमणाताईसारख्या भिडस्त व विनयशील स्त्रीस जरा जडच नाही का जाणार ?"

"म्हणूनच तर अगोदर परीक्षा घ्यायची. तुमच्या शाळेस गांवांतील ब्राह्मणेतरांचीं अठरावीस वर्षांची यच्चयावत् मुले येत असलीं पाहिजेत असा मीं ऐकलेल्या कीर्तीवरून माझा समज झाला आहे."

"तो समज काही खोटा नाहीं. मात्र आमच्या शाळेत आपला भाचा अडाण्याचें सोंग घेऊन शिकण्याकरिता किंवा मास्तर म्हणून शिकविण्या-

करिता खरोखरच येत असला तरी चिमणाताईंच्या नावाला बिचकून तो परीक्षेच्या दिवशी गैरहजर राहण्याचाच संभव आहे."

"पण माझ्या मुलीचें माहेरचें नांव जाहीर करायचेंच नाही मुळीं. 'शारदाबाई देशपांडे' हें तिचें सासरचें नांव येथें फारसें कोणाला माहीत नाही. एका अपरिचित ब्राह्मण विदुषीच्या हातून परीक्षा व समारंभ पार पडणार हें कळताच बहुधा सर्व ब्राह्मणेतर मंडळी हजर रहातील."

"आपण आपल्या भाच्यास भेटून किती वर्षे झाली?"

"झालीं असतील आठदहा वर्षे."

"मग आपणाला किंवा चिमणाताईंना त्याची ओळख पटेल म्हणता?"

"माझ्या स्वतःविषयीं विचाराल तर तो माझी प्रत्यक्ष भेट घेऊन व माझ्याशी घटकाभर संभाषण करून जरी निघून गेला तरी त्याची मला ओळख पटणार नाहीं. त्यातून अलीकडे त्याच्या रंगारूपांत बराच फरक पडल्याचें जाहिरातीवरून दिसते. तो बराच उजळ व नाजूक झाल्यासारखा दिसतो."

"मग चिमणाताईंना तरी त्याची ओळख कशी पटावी? उभयतांची गांठ अलीकडे पडली असल्यास मग माझें काही म्हणणें नाहीं."

"गांठ तिची व आमची बरोबरच पडली. पण तिच्याशीं तो जरा बरोबरीच्या नात्यानें व मोकळेपणानें वागला. तसा आमच्याशीं न वागल्यामुळे त्याचे मुद्राविकार, अंगविक्षेप व इतर लकबी जशा तिच्या लक्ष्यांत आहेत तशा आमच्या लक्ष्यांत नाहीत. चिमणीनें त्याला तांबडतोब जरी ओळखिलें नाहीं तरी त्याच्या लकबी दिसून पडण्याइतका अवसर मिळाल्यास ती त्याला खात्रीनें ओळखील असें मी तिला पाठविलेल्या पत्रास तिनें धाडलेल्या उत्तरावरून वाटते. म्हणूनच मीं तिला कांही दिवसांकरितां येथें बोलाविलें आहे. नवऱ्याची वकीली नुक्तीच सुरू झालेली असल्यामुळे त्यानेंही तिच्या येण्याला हरकत घेतली नाही."

श्यामची छाती धडधडू लागली. तो जरा भीतभीतच म्हणाला, "मग मी त्यांना निमंत्रण देण्याला केव्हां येऊं?"

"आता तुम्हीं तसदी घेण्याचें काही कारण नाहीं. आज तुम्हीं आपला इतका अमोल वेळ येथे घालविलात हेच फार झाले. चिमणी येत्या शनिवारीं येथे येऊन पोहोंचेल. दुसऱ्या दिवशीं म्हणजे रविवारीं दुपारीं बारा वाजता ती तुमच्या शाळेत येईल. सहा तास विद्यार्थ्यांच्या व विद्यार्थिनींच्या अभ्यासाची साधारण चाचणी पाहून सहा वाजतां ती बक्षिसें वाटील. माझा शिपाई बरोबर बक्षिसें घेऊन येईल. रविवारीं सर्वांनाच सुट्टी असल्यामुळे कोणाचीही गैरसोय होणार नाहीं. तुम्हीं जाहीर पत्रक काढून ते गावात चोहोकडे फिरविल्यास बरं होईल."

"फार उपकार झाले आपले. मी रविवारीं दुपारीं चिमणाताईची मार्गप्रतीक्षा करीत बसेन."

श्यामराव गोपाळरावास रामराम करून निघून गेला. गोपाळरावांनीं आणि त्याच्या पत्नीने त्यास ओळखिले नाहीं याचे त्यास नवल वाटले नाहीं. त्या उभयताच्या स्मृतींतील त्याच्या चित्राच्या रेषास दीर्घ कालामुळें बराच अस्पष्टपणा आला होता, त्याप्रमाणे त्याचे शरीर, चेहरा वगैरेतही त्याच कारणामुळे पुष्कळ फरक पडला होता. तो जर त्यांजपासून भिऊन दूरदूर राहिला असता तर त्या वर्तनानेच त्याने आपणावर त्याचा संशय ओढून घेतला असता. पण त्यानें धिटाईने आपण होऊनच त्याच्या भेटीस जाऊन पुढे येणाऱ्या संशयाचे बीज आगाऊच नष्ट करून टाकिले होते. आपली प्रहरभरची बालमैत्रीण मात्र आपणास ओळखिल्यावांचून राहणार नाहीं याची त्यास विचाराअंती खात्री वाटू लागली. पण त्या कल्पनेनें त्यास भीतीबरोबर आनंदही वाटू लागला. त्या औट घटकेच्या पाहुणीने माझ्या अंतःकरणांत जसें कायमचे वास्तव्य केले आहे तसा मलाही आपल्या अंतःकरणात थारा दिला असेल का ? तिची बाळपणची अकृत्रिम व प्रेमळ वृत्तीच कायम असेल की श्रीमतीने व विद्वत्तेनें ती कृत्रिम व कठोर बनली असेल ! तिला त्या भेटीच्या स्मरणाने आनंद होत असेल की लाज वाटत असेल ! मला तिने ओळखिल्यास मी पत्करिलेल्या पेशाबद्दल ती माझा तिरस्कार करील की कींव करील ? माझा अज्ञातवास गुप्त ठेवील कीं त्याचा बोभाटा करील ! इत्यादि अनेक शंकांनीं त्याच्या मनांत गर्दी केली. त्याच्या दृष्टीने पुढील रविवारीं होणारी परीक्षा त्याच्या

अध्यापनकौशल्याची किंवा त्याच्या शिष्यशिष्यिणींच्या तयारीची नसून परीक्षिकेच्या अंतःकरणाची होती; व ती त्या परीक्षेत कितपत उतरते हे पहाण्याकडेच त्याचं चित्त लागून राहिले. त्याच्या विद्यार्थ्यांची मात्र स्वतःच्या परीक्षेच्या अभ्यासाची उजळणी करण्याची एकच धादल उडून राहिली.

प्रकरण सहावें

# जुनी ओळख

रविवार उजाडला. आज कुणब्यांमाळ्याची अनेक कुटुंबे शाळेंत समग्र जाणार असल्यामुळे त्यांच्या घरांत पहाटेपासूनच जेवणाची तारांबळ सुरू झाली. दुपारीं अकरा वाजतां शाळेच्या भव्य पटांगणात पांचसहाशे विद्यार्थी-मंडळी उत्सवाच्या दिवशी करावयाचा पोशाख करून एकत्र जमली. श्यामच्या हाताखालीं शिकून तरबेज झालेले विद्यार्थी मधून मधून फिरून इतर विद्यार्थ्यांचे शंकासमाधान व इतरही साह्य करूं लागले. तथापि त्या सर्वांचे डोळे वारंवार श्यामकडे फिरत. त्यानें आपल्या प्रेम-रज्जूंत त्या मुग्ध, अर्धविकसित, उत्फुल्ल व जीर्ण वनपुष्पांना सारखेंच गुंतविलें होतें; आणि सूर्यविकासी व सूर्योन्मुख कमलाप्रमाणें तीं आपलीं मुखें वारंवार त्याकडे पसंतीकरितां फिरवीत होतीं. त्याच्या सहज पडणाऱ्या दृष्टि पातांनेही तीं प्रसन्न होत होतीं. त्यांना जर वस्तुस्थितीची किंचित् कल्पना असती तर अनेक ग्रहोपग्रहांना आकर्षण करणाऱ्या या सूर्यावर एका अधिक बलाढ्य ज्योतीचें आकर्षण घडत आहे असें त्यांच्या लक्ष्यांत आलें असतें. नीला-काशरूपी अवाढव्य तबकडीवरील तेजस्वी घटेकांटा ज्या गतीनें आपलें मूक भ्रमण करीत होता त्याच्या दुप्पट गतीनें पृथ्वीवरील घड्याळांचे घटेकांटे आपापल्या छोटेखानी तबकड्यांवरून टिक् टिक् शब्द करीत फिरत होते; पण बिचाऱ्या श्यामच्या हृदयरूपि घटीयंत्राचे ठोके त्यांच्या-पेक्षांही जलद व मोठ्यानें पडत होते. त्याची उत्कंठा अनावर होत चालली. बारा वाजण्याचा सुमार झाला तसे त्याचे डोळे रस्त्याकडे सारखे खिळून राहिले. आपल्या धाकट्या भावंडाच्या अल्प प्रगतींसाठी चारी दिशांस वणवण हिंडणारा मिनिटकांटा बरोबर बारावर येऊन बंधूच्या प्रेमालिंगनांत बद्ध होऊन राहिला व इकडे श्यामच्या हेलकावे खाणाऱ्या अंतःकरणरूप तराजूचा कांटाही बरोबर मध्यावर येऊन थबकला, तोंच एक दोन घोड्यांची गाडी धांवतच शाळेसमोर येऊन उभी

राहिली. श्यामचें हृदय आपल्या प्रिय वस्तूचे दर्शन घेण्याकरिताच की काय, छातीशीं धडक्या देऊं लागलें. तो धांवतच गाडीच्या दाराशी जाऊन विनयानें उभा राहिला. त्याचे पंचप्राण डोळ्याच्या ठिकाणीं गोळा झाले होते. इतक्यांत गाडीवानाजवळ बसलेल्या शिपायानें घाईघाईनें गाडीचें दार उघडिलें, व त्यांतून एक अत्यंत लावण्यसंपन्न तरुणी बाहेर आली. ही शारदाबाई देशपांडे बालपणची चिमणी देशमुखच कीं काय असा श्यामला प्रश्न पडला. मुग्ध कलिकेस पूर्णविकसित पुष्पाचें किंवा द्वितीयेच्या चंद्रास पूर्णिमेच्या चंद्राचें रूप प्राप्त झालेलें पाहून जें सानंद आश्चर्य वाटतें तें श्यामच्या आश्चर्याच्या पासंगासही पुरणार नाहीं. तें आश्चर्य प्रतिदिनी किंवा प्रतिमासीं दिसणाऱ्या चमत्कारापासून उद्भवलेलें नव्हतें, व म्हणून त्यास पुनरावृत्तीचें मांद्यही आलें नव्हतें. शिवाय कलिकेंत विकासामुळें किंवा चंद्रांत कलावृद्धीमुळें पडणाऱ्या फरकाहून स्त्रींत वयोमानानें पडणारा फरक पुष्कळच भिन्न असतो. तो केवळ शारीरिक असतो तर हा मानसिक व आत्मिकही असतो. चिमणीची बालपणींची बाहुलीप्रमाणें दिसणारी चिमुकली शरीरयष्टि आतां कदलीप्रमाणें भरदार व रसरशीत झाली होती. तिचे लहानपणचे गुडघ्यापर्यंत लोंबणारे काळे व तुळतुळीत केस आतां धरणीचा ठाव पाहूं लागले असावे असें त्यांच्या फुगीर बुचड्यावरून वाटत होतें. तिची बालपणची हिरकण्याप्रमाणें चमकणारी दंतपंक्ति आतां कुंदकळ्याप्रमाणें शोभिवंत व अवघ्राणयोग्यही दिसत होती. ज्या अवयवावरून स्त्रीचें अंतरंग स्फटिकांतल्याप्रमाणें स्पष्ट दिसून येतें त्या तिच्या अवयवांत तर विलक्षण अंतर पडलें होतें. तिची बालपणची निर्भय दृष्टि आतां लज्जाशील झाली होती, तिच्या भिंवयांचें पूर्वीचें तांडव बंद होऊन लास्य सुरू झालें होतें; पूर्वीं गालावर एखादे वेळीं श्रमानें दिसून येणारी लाली आतां गुलाबी रूप धारण करून तेथ कायमचेंच ठाणें देऊन बसली होती, व मुखावर वाटेल तेव्हां स्वच्छंदानें खेळणाऱ्या हास्यानें आतां स्मिताचें सौम्य पण स्थिर रूप धारण केलें होतें. सारांश, चिमणी देशमुख व शारदाबाई देशपांडे या नावांमध्यें जितकें अंतर तितकेंच तिच्या आठ वर्षांपूर्वींच्या कौमार्यावस्थेंत व आतांच्या विवाहितावस्थेत पडलें होतें. भूमीवर सरपटणाऱ्या सुरवंटाचें आकाशांत उडणाऱ्या

फुलपांखरात जें रूपांतर होतें त्याच्याच जातीचे हेंही रूपांतर होतें. तें केवळ आकारांत नसून प्रकारांतही होत. चिमणी कुमारीची पत्नी झाली तशी आणखी कांहीं वर्षांनीं माता होईल, व आतापर्यंतचे स्थित्यंतर जितके आश्चर्यकारक तितकेंच तेंही होईल. कुमारीच्या देहांत व भावनांत तारुण्याने व प्रौढत्वाने जितके अंतर पडते तितके किंबहुना त्याहूनही अधिक अंतर अजाण मनुष्यात ज्ञानाने व संस्कृतीने पडतें. ज्ञानदीपाने केवळ त्याच्या अंतःकरणातला अंधकारच नष्ट होतो असे नाही, तर त्याचे तेज त्याच्या चेहऱ्यावरही पसरतें. मुग्ध व अजाण चिमणीने गेल्या आठ वर्षांत बरेच ज्ञान संपादन केले असावे असे तिच्या तेजस्वी मुद्रेवरून दिसत होतें; व तें ज्ञान अहंकारमिश्र नसून दुसऱ्याविषयीं आदर व सहानुभूति यांनी युक्त, अर्थात् संस्कृतिपूर्ण आहे असे तिच्या चेहऱ्यावरील तेजाच्या सौम्यपणावरून उघड होत होतें. कलिकेतील किंवा चंद्रातील परिवर्तनाप्रमाणें हें परिवर्तन श्यामच्या दृष्टीस पायरीपायरीने न पडता अचानक पडले होतें. यामुळे त्यास आपल्या बालमैत्रिणीची ताबडतोब ओळख न पटतां तो तिच्याकडे काहीं वेळ आश्चर्यानें पहातच उभा राहिला यांत नवल नाहीं. या खेडवळाचा हा शिष्टाचाराचा अतिक्रम बुद्धिपुरस्सर नसून अज्ञानमूलक किंबहुना अत्यादर-मूलकच आहे हें ओळखून म्हणा अगर सहज सौजन्यामुळे म्हणा, शारदा-बाईनी किंचित् स्मित करून "आपणच का नाना मराठे?" असा प्रश्न करून श्यामला त्याच्या तंद्रींतून जागे केले. त्याने ओशाळून होकारार्थी मान हलविली व आपल्या सन्मान्य पाहुणीस लवून नमस्कार केला. तीही त्यास परत नमस्कार करून तो शाळेच्या जागेकडे वळतांच त्याच्या मागें चालू लागली. ती कोण आहे हें माहीत असूनही तिला ओळखण्यास जर श्यामला प्रयास पडले होते, तर तिनें त्याला ओळ-खिलें नाहीं यांत काहींच आश्चर्य नव्हतें. त्याजमध्येही गेल्या आठ वर्षांत कमी अंतर पडलें नव्हतें. तो मूळचाच मोठ्या हाडापेराचा व निकोप प्रकृतीचा असल्यामुळे त्याचें शरीर वयाच्या मानाने असावें त्यापेक्षां बरेंच धिप्पाड व भरदार झालें होतें. तारुण्याच्या आगमनकालीं उत्तमांगाच्या द्वारावर जें रोमराजिरूप तोरण दिसूं लागतें तें श्यामच्या

ओंठावर स्पष्टपणे दिसूं लागले होते. त्याच्या धद्याचाही त्याच्या शरीरावर, विशेषेकरून चेहऱ्यावर लक्ष्यांत येण्यासारखा परिणाम झाला होता. त्याचे दड पिळदार व छाती भरींव झाली असून तोंडावर अधिकच काळसरपणा आला होता. स्वावलंबनाच्या जाणिवेमुळे त्याच्या मानेत ऐटदारपणा व दृष्टींत निर्भयपणा आला होता. आज त्यानें मुद्दामच अस्सल कुणबाऊ थाटाचा पोषाख केला होता. त्यानें कपाळावर चदनाचा पांढरा टिळा लावून अगात जाडाभरडा बंदाचा अगरखा, डोईस पांढरा व बिनकांठी फेटा आणि पायात जाड व ओबडधोबड जोडा चढविला होता आणि बिनकाठाचें साधे धोतर नेसून तसेच साधें उपरणें अगावर घेतले होते. तो व त्याच्या मागोमाग शारदाबाई शाळेत जाऊन पोहोंचताच तेथील विद्यार्थ्यांनी त्यास एकदम खर्डीताजीम दिली आणि एक ईशस्तुतिपर पद म्हणण्यास सुरवात केली. त्याच्या आवाजात कोमल, कठोर, उच्च, नीच, खणखणीत, घोगरे इत्यादि भिन्नभिन्न प्रकारच्या स्वरांचें बेमालूम मिश्रण झालेलें असल्यामुळें एखादा सहस्रार्जुन एखादी पांच-सहाशे सप्तकांची पेटी वाजवीत आहे कीं काय असा क्षणभर भास होत होता. एका मनुष्याच्या गाण्यात केवळ स्वराच्या कमी अधिक उचींचा एकेरी अनुभवच येत असतो. पण अनेकांच्या गाण्यात स्वराच्या उचीच्या जोडीस भरींवपणा व विविधता हीसुद्धां येऊन त्यास घन स्वरूप प्राप्त होते, आणि त्याचा श्रोत्यांच्या मनावर परिणामही फार मोठा होतो. अशा प्रसगीं श्राव्याबरोबर दृश्याच्या भव्यतेचाही मनावर ग्रह होत असतो. पाश्चात्य देशांत सार्वजनिक प्रसगी हजारो लोकाचे एका स्वरानें गायन चालत असल्याबद्दल चिमणाताईनें वाचिलें होते, पण तसें गायन, कांहींशा लहान प्रमाणावर का होईना, ऐकण्याचा तिचा हा पहिलाच प्रसग ! अशा गायनाचा मानवी श्रोत्यावर जर चिरस्मरणीय परिणाम होतो तर ईश्वरावर कांहींच होत नसेल का ? असा विचार चिमणाताईच्या मनांत ते पद ऐकतांना घोळत होता. त्याबरोबर तिला फार पूर्वकाळची स्मृतिही होत असावी असें तिच्या मुद्रेवर दिसून येणाऱ्या तद्रीवरून अनुमान होण्यासारखें होतें. सुंदर देखाव्यानें किंवा गीताने पूर्व जन्माची स्मृति होते असें कालिदासानें म्हटलें आहे, तसाच प्रकार चिमणाताईचाही झाला नसेल

ना ! इतक्यांत दचकल्यासारखें करून तिनें श्यामला हलक्या स्वरात म्हटलें, " हें गाणें माझ्या ओळखीचें दिसतें. तें मीं ब-याच वर्षांपूर्वी माझ्या वडिलांच्या मावसबहिणीच्या घरीं ऐकलेलें आहे. हें गाणें शिकविणारा इसम या गांवचा मूळचाच रहिवाशी आहे कीं नुक्ता पांचसात महिन्यांपूर्वीच आला आहे ! "

श्यामनें तावडतोब उत्तर दिलें, " आपल्या प्रश्नाचा रोंख रावसाहेबांनीं सांगितलेल्या हकीगतीवरून माझ्या पूर्णपणें लक्षांत आला. पण हें गाणें मीं स्वतःच शिकविलें आहे. तें 'प्रार्थनासंगीत' या पुस्तकांतील आहे." चिमणाताई स्वतःशीं पुटपुटली, " चमत्कार आहे ! तेंच गाणें, तेच स्वर ! इतक्यांत तिला काहीं विचार सुचून ती श्यामकडे जरा बारकाईनें पाहूं लागली. त्यासरशी त्याच्या मनाची फारच धांदल उडाली. तिचें निरीक्षण गाणें संपेपर्यंत चाललेंच होतें त्यापासून स्वतःचा बचाव करून घेण्याकरितां त्यानें अनेकदां विद्यार्थ्यांना इशारा देण्याच्या निमित्तानें मान फिरविली, घाम पुसण्याच्या निमित्तानें तोंडावरून उपरणें फिरविलें; पण शिष्टाचाराकरितां तरी त्याला मधून मधून तिजकडे चेहरा करून तिच्या भेदक दृष्टीचा वेध सहन करावा लागे. या अवधींत त्यास सुटलेला कंप, त्याचें वारंवार ओठ चावणें, खालीं मान घालणें इत्यादि चिन्हांवरून त्याची भांबावलेली स्थिति तिच्या पूर्णपणें लक्षांत आली असली पाहिजे. तिची कसून परीक्षा घेण्यास उद्युक्त झालेल्या श्यामची स्वतः परीक्षा देतादेतांच पुरेवाट झाली !

गाणें संपलें. त्यानंतर थोडा वेळ चोंहोंकडे जी स्तब्धता पसरली ती तुलनेनें फारच तीव्र भासूं लागली. हा वेळपर्यंत श्याम व चिमणाताई उभीं होतीं. पण गाणें संपतांच श्यामनें तिला एका बाजूस दोन खुर्च्या व एक टेबल ठेविलें होतें तिकडे नेलें आणि एका खुर्चीवर बसण्याची विनंति केली. दुसऱ्या खुर्चीवर श्यामला बसावयास सांगून ती स्वस्थानापन्न झाली. नंतर परीक्षेस सुरवात झाली. विद्यार्थ्यांस कोणकोणत्या विषयांत शिक्षण मिळालें आहे याची प्रथम श्यामकडून माहिती घेऊन तिनें आरंभीं त्यांस बेरीज, वजाबाकी, गुणाकार, भागाकार यांचीं सोपीं सोपीं उदाहरणें पाट्यांवर करावयास सांगितलीं. ज्या विद्यार्थ्यांनीं उत्तरें बिनचूक लिहून



वाचन चालू असता तिची दृष्टि सारखी श्यामच्या मुद्रेकडे लागली होती

पाट्या अगोदर टाकल्या त्यांचीं नावें तिनें क्रमाने टिपून ठेविलीं. तोच प्रकार तिने तोंडच्या हिशेबासबंधानेही केला. नंतर तिनें शुद्धलेखना-करिता बरोबर आणिलेल्या 'गरुड' पत्रातून श्यामसंबंधाच्या जाहिरातीचा मजकूर सावकाश वाचून दाखविला. वाचन चालू असता तिची दृष्टि सारखी श्यामच्या मुद्रेकडे लागली होती. सर्प ज्याप्रमाणे आपल्या दृष्टीनें पक्ष्याची नजर खिळवून टाकितो त्याप्रमाणें तिने त्याची नजर खिळवून टाकिली, व जाहिरातीच्या प्रत्येक शब्दाचा त्याच्या मुद्रेवर काय परिणाम होतो हें ती बारकाईने पाहूं लागली. चिमट्याने कीटक एका जागीं खिळवून त्याचें सूक्ष्मदर्शक यंत्राच्या साह्यानें निरीक्षण करणाऱ्या प्राणि-शास्त्रज्ञास दोन आयुधाची जरूर असते. पण तिची भेदक दृष्टि श्यामला जागच्या जागीं खिळविण्याचें व त्याच्या निरीक्षणाचे अशीं दोन्ही कार्यें एकटीच करीत होती. तो दीर्घ सुस्कारे सोडू लागला, त्याची छाती भरून आली व त्याच्या डोळ्यात अश्रु उभे राहिले. त्या अश्रूंनी त्यास क्षणभर अंधत्व येऊन समोर कांही दिसेनासे झाले, व त्याच्या कल्पनाचक्षुसमोर त्याचें हरिणपुरातील घर, त्याजबद्दल हरिणकाळजी करीत बसणारी त्याची आई, त्याच्यासाठीं पृथ्वीच्या पाठीवर वणवण करीत हिंडणारा दगडू हीं स्पष्टपणें उभीं राहिलीं. इकडे विद्यार्थी क्रमाने आपापल्या पाट्या चिमणाताईसमोर आणीत होते; त्या पाहून त्यांची प्रतवारी लावण्यात ती कांहीं वेळ गुतून गेली. वळणदार व सुवाच्य अक्षर, अक्षराचे र्‍हस्व-दीर्घत्व, त्याजवरील टिंबे, विरामचिन्हें इत्यादि दृष्टींनीं ज्याचे लेखन सर्वोत पसंत ठरले त्यांचीं नांवे टिपून घेऊन नतर तिने तोंडी परीक्षेस सुरवात केली. श्याम भानावर आला त्या वेळीं परीक्षिका व एक अष्ट-वर्षीय विद्यार्थिनी यांजमध्ये खालील प्रश्नोत्तरे चालली होती.

"मुली, माझे नांव काय ते माहीत आहे का तुला ?"

"शारदाबाई देशपांडे."

"ते माझे सासरचे नांव. माझे माहेरचे नांव ठाऊक आहे तुला ?" ( विद्यार्थिनीनें नकारार्थी मान हलविलेली पाहून ) माझे माहेरचं नांव चिमणी. आपल्या गांवचें नांव माहीत आहे !"

"चिमणपुर."

" माझ्या आणि गांवाच्या नांवांत तुला कांहीं सारखेपणा वाटतो ? "

" होय."

" याचे कारण काय असावे बरें ? "

" आपलें नांव गांवावरून पडले असावे."

" की गांवाचे नांव मजवरून पडले ? "

" छे: ! गांव फार वर्षांचे आहे. आपले वय फार तर सोळा सतरा वर्षांचे असेल."

" शाबास! ( श्यामकडे वळून ) मास्तरसाहेब, ही मुलगी या वयाच्या बऱ्याच मुलापेक्षा बुद्धिमान् आहे, नाहीं ? "

आपणाला हिने ओळखिले असल्याबद्दल श्यामला जो संशय आला होता त्यास आतां खात्रीचे स्वरूप येऊं लागले. त्याने होकार दर्शवितांच पुन्हां प्रश्नोत्तरें चालू झालीं:—

" चिमणी नावाचा पक्षी तूं पाहिला असशीलच ? "

" होय. ती चिंवचिंव शब्द करिते, आणि आपल्या पिलाकरिता मऊ घरटे तयार करिते."

" आणि खाते काय ? "

" खाण्याला तिला आपल्याप्रमाणेंच कोणतेही धान्य चालतें."

" आणि तिला मुखशुद्धीकरितां आपणासारखी सुपारीही लागत असेल ? "

" छे:, तिचे दांत आपल्यासारखे कठिण नसतात कांहीं ! "

" पण आपण कधीकधीं सुपारी चिमणीच्याच दाताने नाहीं का फोडीत ? "

" चिमणीच्या दांताने फोडायची म्हणजे पदराआड ठेवून आपल्याच दांतांनी फोडावयाची."

" शाबास ! बरें, चिमणीचे पिल्लू सांपडेनासें झाले म्हणजे तिची कशी अवस्था होते सांग पाहू ? "

" ती चिंवचिंव करीत घरट्यांतून बाहेर आणि बाहेरून घरट्यात सारखी येरझारा करीत रहाते."

" कोणासारखी बरें ? "

" त्या जाहिरातींतल्या आईसारखी."

" शाबास ! बरें, तिचे पिलूं जाहिरातींतल्या मुलाप्रमाणे रुसून गेलें असेल तर आईची दशा कळल्यावर त्यानें काय करावे बरें ? "

" परत आपल्या आईकडे यावे."

" शाबास ! मास्तरसाहेब, या लहान मुलीला तुमच्याआमच्यापेक्षाही अधिक समज असावा हा चमत्कार नाहीं का ? "

आता श्यामला मुळीच संशय उरला नाही. त्यास आतां आपले रहस्य गुप्त ठेवण्याबद्दल चिमणाताईची विनंति करणें हा एकच मार्ग शिल्लक होता. त्याने जिवाचा धडा करून म्हटलें, " ताईसाहेब, इला त्या प्रश्नाचा सर्व बाजूंनीं विचार करिता आला असता तर इने असें उत्तर दिलें नसतें."

" म्हणजे ? या प्रश्नाला आणखीही एखादी बाजू आहे कीं काय ? "

" असलीच पाहिजे. अशा प्रेमळ मातेला दुःखात ठेवून कोणता मुलगा सुखासुखी परदेशी राहील ? घटकाभर अशी कल्पना करा कीं त्याच्या वडिलांनी त्याचे तोंड न पाहण्याची शपथ घेतली आहे. अर्थात् त्याला वडिलाचा शब्द खरा करावयाचा झाल्यास राजरोसपणें घरीं पाऊल टाकिता येत नाहीं. त्याने आईची गुप्तपणे भेट घेतली तर ती थोडाच वेळ टिकावयाची हें उघड आहे. अशा ओझरत्या भेटीनें तिला काहीं घटका अत्यंत सुख होईल हे खरे आहे; पण त्यापुढील दीर्घ विरहाचें दुःख त्या सुखामुळेच असह्य वाटणार नाही का ? हल्लीं मुलाचा विरह सवयीनें तिच्या अंगवळणीं पडत चालला असेल. त्या संवईत अशा भेटीने खळ पाडणे योग्य होईल का ? "

" मग तिला दुःखांत विरगुळा वाटण्याचे कांहींच साधन राहिलें नाही म्हणावयाचें ? "

" का राहूं नये ? आपल्या मुलाच्या एखाद्या स्नेह्यास दत्तक घेऊन आपल्या अंतःकरणाची तहान भागवावी."

" आणि तो स्नेही निराळ्या जातीचा असला तर ? "

" तर त्याला पुत्रवत् मानून त्याजवर आपल्या प्रेमाचा वर्षाव करावा.

ब्राह्मण मुलगा शूद्रांत राहून जर शूद्र होऊं शकतो तर शूद्र मुलगा पुत्र म्हणून जवळ बाळगल्यास कांहीं काळाने पुत्रतुल्य कां वाटू नये ? "

" ते सारें मानण्यावर आहे; आणि ती जाहिरात देणारी आई दुसऱ्याच्या मुलाला आपला मुलगा मानण्यास तयार होईल असे मला वाटत नाहीं. तिच्या मुलाची मनोरचना निराळी असल्यास सागवत नाही. पुरुषाचे अंतःकरण जात्याच बायकांच्याहून निराळे असते."

" त्या बिचाऱ्याच्या चित्ताला काय तळमळ लागली असेल ती त्याची त्याला माहीत ! बाकी बायकांपेक्षां पुरुषांना मन गुतविण्याला पुष्कळ उद्योग असल्यामुळे आपली मनोव्यथा सोसणे सोपे जाते असे आपले म्हणणे असेल तर ते मला कबूल आहे. त्या बाईच्या मुलाने मनांत आणिले तर त्याला माझ्या शाळेसारखी एखादी शाळा काढिता येईल."

" असे कितीही उद्योग मागे लावून घेतले तरी स्वकीयाच्या सहवासावांचून मनाला पूर्ण समाधान होणे शक्य नाही."

" ईश्वराची तशी इच्छाच असेल तर त्याला एखादे जुन्या परिचयाचे नात्याचे माणूसही भेटेल. नाही कोणी म्हणावे ? आईवरचे प्रेम बहिणीकडे बळवून त्याला आपली प्रेमाची तहान तृप्त करून घेता येईल. बहिणीनेही त्याच्याकडे पाठ केली तर मात्र त्याच्यासारखा अभागी तोच म्हटला पाहिजे."

चिमणाताईचें अंतःकरण विरघळून गेले. ती तावडतोब म्हणाली, " असे निर्दयपणाचे वर्तन तिजकडून होईल तरी कसे ? होईल असे म्हणणारास स्त्रीहृदयाची परीक्षाच नाही असे म्हटले पाहिजे."

जाहिरातीला वाजवीपेक्षां अधिक महत्त्व दिल्यास लोकांना संशय येण्याचा संभव आहे हे जाणून चिमणाताईने उरलेल्या तोंडी परीक्षेत दुसरे अनेक प्रचलित विषय काढून तत्संबंधी विद्यार्थिविद्यार्थिनींना कितपत ज्ञान आहे याची चांचणी पाहिली. त्यांपैकी कांहीं वयातीत स्त्री-पुरुषांची बुद्धि तिला इतकी तीव्र व तरळ दिसून आली, कीं त्यांचा जन्म ब्राह्मण जातींत झाला असता तर त्या बुद्धीचा पूर्ण विकास होऊन त्यांची गणना निःसंशयपणें उत्तम पंडितांत झाली असती.

पांच वाजतां परीक्षा आटोपली. चिमणाताईस सारखे पाच तास श्रम करावे लागल्यामुळे बराच थकवा आला होता. श्यामने जवळच्या एका

झोपडीत उपाहाराची व्यवस्था केली होती, तिकडे ती त्याच्या विनंतीवरून गेली. तेथे एक पाट मांडिला असून त्यासमोर फळे, पेढे, बर्फी, बदाम, बेदाणा, पिस्ते वगैरेंनीं भरलेलें ताट व आटींव दुधाने भरलेली वाटी होती. एका बाजूस स्वच्छ पाण्याने भरलेला गडवा होता. तो ब्राह्मणानेच भरून ठेविला आहे असा श्यामने खुलासा करिताच चिमणाताई हसून म्हणाली, " मी येथे आल्यापासून ब्राह्मण्याबद्दलच्या माझ्या कल्पना पार बदलून गेल्या आहेत. आपल्या शिष्यशिष्यिणींत किती तरी 'ब्राह्मण' या पदवीला पात्र अशी सांपडतील. चातुर्वर्ण्याच्या श्रमविभागात ब्राह्मणाच्या वाट्याला आलेले विद्यादानाचे पवित्र कार्य खुद्द आपण इतक्या निःस्वार्थ बुद्धीनें चालविलें आहे की, आपणांहून श्रेष्ठ ब्राह्मण माझ्या तरी आजपर्यंत आढळण्यात आला नाहीं. फार काय सांगू ? आपणासारख्या पवित्र ब्राह्मणाच्या पंक्तीचा लाभ मिळाल्यावाचून या उपाहाराचा स्वीकारही मला करिता येत नाहीं. माझ्या पाटासमोरच एक पाट आणि ताट मांडवा पाहू ! फराळाचे साहित्य निराळे आणण्याचे काहीं कारण नाहीं. कारण माझ्या ताटांतलेच साहित्य मला पाहिजे त्याच्या दुपटीहून अधिक आहे." जवळ लहान मुलगे व मुली स्वच्छ पोषाख करून उभीं होतीं, त्यांनी तिच्या इच्छेप्रमाणें व्यवस्था केली, आणि नंतर त्या उभयतांनीं आनंदानें बरोबरच उपाहार केला. तो संपेपर्यंत शाळेच्या पटांगणांत बक्षीससमारंभाकरिता व्यवस्थित बैठक घालण्यात येऊन तिजवर गावांतील कुणबी, माळी, सुतार, लोहार वगैरे अनेक जातीचे शेकडों लोक येऊन बसले होते. त्यांत कांहीं ब्राह्मणही होते. श्याम व चिमणाताई तेथे बरोबर सहा वाजतां आलीं. तीं येतांच ते सर्व आदरानें उभे राहिले व चिमणाताई खुर्चीवर बसल्यानंतर खाली बसले. श्याम त्यांच्यामध्येच जाऊन बसला. प्रथम यशस्वी विद्यार्थ्यांस बक्षिसें देण्याचा समारंभ झाला. बक्षिसाचीं पुस्तकें चिमणाताईने घरून येताना बरोबर आणिलीं असून तीं तिच्या शिपायानें नुकतीच समारंभाच्या जागीं आणून टेबलावर हारीनें रचिलीं होतीं. प्रत्येक पुस्तक देताना ते कोणत्या गुणाबद्दल देण्यात येत आहे याचा ती खुलासा करी. बक्षिसे गणित, हिशेब, वाचन, शुद्धलेखन इत्यादि विषयांतील प्रावीण्याबद्दलच नसून स्वच्छता, टापटीप, व्यवस्थित-

पणा इत्यादि इतर गुणांबद्दलही देण्यात आलीं. एका ऐशीं वर्षाच्या म्हातारीस त्याच्या विद्याभिरुचीबद्दल बक्षीस देण्यांत आले तेव्हा सर्व प्रेक्षकांनीं आनंदानें टाळ्यांचा गजर केला. एक चार वर्षांची लहान मुलगी बक्षीस घेण्याकरितां पुढे आली असता ती टेबलापेक्षाही ठेंगणी असल्यावरून तिला त्यावर उभे करण्यांत आले, तेव्हाही प्रेक्षकांनीं आपला आनंद त्याच मार्गानें प्रदर्शित केला. सारीं बक्षिसं वाटल्यावर चिमणाताईने समारोपादाखल सुमारे एक तासभर अस्खलित भाषण केले. त्यांतील शब्दयोजना व वाक्यरचना इतकी सुलभ होती की ते भाषण बालापासून वृद्धापर्यंत व अज्ञान्यापासून ज्ञान्यापर्यंत सर्व श्रोत्यास सारखेच सुबोध वाटले. तें व्याख्यात्रीच्याच शब्दांनी दिल्यास फार विस्तार होईल. त्याचा भावार्थ सारांशरूपानें दिल्यास त्यांत शब्दाचें व वाक्याचे काठिन्य अपरिहार्य आहे. तथापि पुढील कथाभाग समजण्यास तो आवश्यक असल्यामुळे काठिन्याचा दोष पत्करूनही येथे दिला पाहिजे. त्या भाषणाचा आशय येणेप्रमाणे:—

" माझ्या लहानथोर सर्व जातींच्या बंधुभगिनींनो, आजचा समारंभ अनेक दृष्टींनी अपूर्व आहे; व तो गेल्या शतकापासून एका अगदीं नवीन युगाचा उदय झाल्यामुळेच शक्य झाला आहे. अत्यंत प्राचीन काळीं चातुर्वर्ण्य जन्मावर नसून गुणकर्मांवर अवलंबून असे. यामुळें शूद्रादि कनिष्ठ जातींसही उद्योगाने ज्ञान, सत्ता व संपत्ति संपादन करून ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या वरिष्ठ जातींचे अधिकार प्राप्त करून घेता येत. त्या युगात प्रत्येक जातीस तिच्या विशिष्ट अधिकाराबरोबर विशिष्ट कर्तव्येंही असत; व त्यांचे योग्य रीतीनें पालनही होई. त्या काळीं स्त्रियांना-ही वेदाध्ययनाचा अधिकार असे. त्या युगास आपण सुवर्णयुग म्हणूं. त्यापुढील युगांत मात्र ही सर्व व्यवस्था बदलली. अधिकार व कर्तव्ये हीं पूर्वी एकाच ठिकाणीं रहात, त्यांची या मध्ययुगात फारकत झाली, आणि ज्ञान, सत्ता व संपत्ति हीं पूर्वी गुणकर्मसाध्य असत तीं जन्मसिद्ध होऊन बसलीं. समाजाचा अर्धा भाग अर्थातच स्त्रियांचा असावयाचा. बाकीच्या अर्ध्या भागांत चार जातींचे पुरुष समसमान प्रमाणांत होते अशी कल्पना केली तरी शूद्रांचे एकंदर समाजाशीं प्रमाण रुपयास

दोन आणे पडावयाचे. याप्रमाणे स्त्रिया व शूद्र मिळून होणाऱ्या दहा आण्याच्या हिस्सयाकडे बहुधा निव्वळ सेवारूप कर्तव्य देण्यांत आले; आणि बाकीच्या सहा आण्यांच्या हिस्सयात ज्ञान ब्राह्मणाकडे, सत्ता क्षत्रियाकडे व संपत्ति वैश्याकडे पृथक्पणे देण्यात आली; म्हणजे त्या वस्तूचा त्या जातीकडे मक्ताच देण्यात आला. या तीन जातीचे आपापल्या क्षेत्रातील अधिकार अमर्याद असून कर्तव्य मात्र स्त्रियांच्या व शूद्रांच्या मानानें फार मर्यादित असत. या जाती जन्मावरूनच ठरविण्यात येऊ लागल्यामुळे बुद्धिमान ऋषीचा निर्बुद्ध वंशजसुद्धा ब्राह्मण म्हणवून घेऊन त्या जातीचे अधिकार उपभोगू लागला, पराक्रमी राजाचा नेभळा वंशज-सुद्धा क्षत्रिय म्हणवून घेऊन इतरांवर सत्ता गाजवू लागला, कृषिकर्म-कुशल शेतकऱ्याचा किंवा धाडसी व्यापाऱ्याचा अडाणी अगर भित्रा वंशजसुद्धा वैश्य म्हणवून घेऊन शेती अगर व्यापार करण्यास अधिकारी गणिला जाऊ लागला. या समाजव्यवस्थेस धर्माचे पाठबळ असल्यामुळे ती दीर्घकाल टिकली. परंतु ती कृत्रिम असल्यामुळे भिन्न भिन्न जातींनी आपापल्या अधिकाराचे अतिक्रमण केल्याचे प्रकार मधून मधून घडून येत. पेशव्यांनीं ब्राह्मण्य बाजूस ठेवून राजसत्ता आपल्या हातीं घेतली हे अशा अतिक्रमणाचे अगदीं अलीकडचे उदाहरण होय. पण हे प्रकार अपवादरूप होत. एकंदरीनें चातुर्वर्ण्यसंस्था बऱ्याच अव्यंग स्थितीत कायम राहिली. त्याचा परिणाम असा झाला, की प्रत्येक जातीत त्या जातीच्या विशिष्ट गुणाचा मागमूसही नसलेल्या नादानांचा भरणा वाढू लागला. ब्राह्मणांचा व वैश्यांचा पराक्रम क्षत्रियांच्या उपयोगी पडेनासा झाला, शूद्रांची व स्त्रियांची नैसर्गिक बुद्धिमत्ता राष्ट्राची बौद्धिक संपत्ति वाढवि-ण्याच्या कामी येईनाशी झाली. याप्रमाणे बहुतांशी निर्बुद्ध, निस्तेज व निःसत्त्व बनलेल्या समाजावर परकीयांनी स्वाऱ्या करावयास सुरवात करितांच त्याची शकलें उडण्यास अवधि लागला नाही यात नवल वाट-ण्याचे कारण नाही. हिंदुस्थानचे स्वातंत्र्य नष्ट होऊन तो एकामागून एक अनेक परकीयांच्या अमलाखालीं गेला. आपल्या पूर्वीच्या राज्य-कर्त्यांनीं याच देशांत कायमची वस्ती केल्यामुळे त्यांचे हितसंबंध आपल्या हितसंबंधाशीं बऱ्याच अंशांनीं निगडित राहिले. पण हल्लींचे राज्यकर्ते पर-

देशांत रहात असल्यामुळे त्यांचे व आपले हितसबंध परस्पराहून भिन्न आहेत. शिवाय हे राज्यकर्ते प्राचीन काळीं जरी आपल्या मानानें अत्यंत हीन अवस्थेत असले तरी सांप्रत काळी ज्ञान, सत्ता व संपत्ति यापैकीं प्रत्येक बाबतींत आपणाहून श्रेष्ठ आहेत; आणि ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या तिन्ही जातींचे अधिकार त्यांजमध्ये एकवटलेले असल्यामुळे ते आपणामधील एकाएका जातीला भारी आहेत. आपण सख्येनें जरी अधिक असलों तरी आपली संख्या शेकडों पोट जातींमध्ये विभागलेली असल्यामुळे तिचा उपयोग आपणास न होतां राज्यकर्त्यांसच होत आहे. आपल्या देशातील संपत्तीचा परदेशात जो ओघ चालला आहे तो अडवायचा असेल तर आपणास स्वयसत्ताक शासनपद्धति प्राप्त करून घेऊन व्यापाराची व इतर धंद्याचीं सूत्रें आपल्या हातीं घेतली पाहिजेत. मध्ययुगातील बहुजनसमाज अज्ञानी असल्यामुळे एकतंत्री अमलावर संतुष्ट राहिला. पण हल्लीच्या प्रजेपैकीं कांहीं भाग ब्राह्मणादि श्रेष्ठ व एकदा अधिकाराचा उपभोग घेतलेल्या जातींनी बनलेला असल्यामुळे तो भाग तरी परकीय एकतंत्री अमलावर संतुष्ट रहाणें शक्य नाही. पण आपणांपेक्षा श्रेष्ठ अशा राज्यकर्त्यापाशीं हक्कांची मागणी परिणामकारक रीतीनें करण्यापूर्वी त्यांस आपणाहून कनिष्ठ असलेल्या वर्गास समान हक्क दिल्याशिवाय गत्यंतर नाहीं; व ते दिले म्हणजे चातुर्वर्ण्यपद्धतीस शिथिलता येणार ही गोष्ट त्याना पूर्णपणें कळून चुकली आहे. परकीय राजसत्तेमुळें आपली राजकीय, आर्थिक वगैरे बाबतीत कितीही अवनति झाली असली तरी तिनेंच याप्रमाणे आम्हांला नवीन दृष्टि देऊन भावी उन्नतीची दिशा व मार्ग ठरविण्याच्या कामीं साहाय्यही केलें आहे. हल्लीं आपण प्रत्येक गोष्टीकडे धार्मिक दृष्टीनें न पहाता राजकीय व सामाजिक दृष्टीनीं पाहू लागलो आहोत. श्रेष्ठ जातींस स्वतःसाठीं समान हक्क मागतांना इतर जातींना समान हक्क देण्याच्या इष्टतेचा विचार करणें भाग पडत आहे. याप्रमाणे वरिष्ठ ज्ञातीकडूनच उपक्रम झाल्यामुळे ज्ञान, सत्ता व संपत्ति यांमधील कुंपणे भराभर नष्ट व्हावयास लागून ती त्रयी सर्व ज्ञातीस सारखीच साध्य होऊ लागली आहे. शिक्षण सार्वत्रिक होण्याच्या मार्गाला लागले आहे. राजसत्ता मागेंपुढे प्रजेच्या ताब्यांत येण्याचीं स्पष्ट चिन्हें दिसत आहेत. पूर्वी व्यक्तिनिष्ठ

असलेली संपत्ति आतां समाईक भांडवलाच्या रूपाने संघनिष्ठ होऊं लागली आहे. कुळांच्या व मजुरांच्या संघामुळे जमीनदार व भांडवलवाले टेकीस येऊन त्यांस मागेंपुढें आपल्या नफ्याचे वाटेकरी करतील अशीं लक्षणें दिसत आहेत. याप्रमाणें ज्ञान, सत्ता व संपत्ति ही त्रयी आतां समाजाची मालमत्ता बनत चालली आहे. अशा स्थितीत पूर्वी सेवेचेच अधिकारी गणिले गेलेले शूद्र व स्त्रिया हे वर्ग अचल रहाणे शक्य नाही. आपणामध्येही उच्च वर्गांच्या बरोबरीनें बसण्याची इच्छा जागृत झाली आहे. ब्राह्मणादि श्रेष्ठ जाती व शूद्रादि कनिष्ठ जाती यांतील वैषम्य पूर्ण-पणें नाहीसें होण्याच्या मार्गांत मुख्यत्वेंकरून तीन विघ्नें आहेतः— धार्मिक समजुती, रूढि व संस्कृतीमधील अंतर. ब्राह्मणवर्ग धर्मदृष्ट्या इतर वर्गांपेक्षां श्रेष्ठ आहे ही चुकीची समजूत उत्पन्न होण्यास आरंभीं कोणतीही कारणें झालीं असलीं तरी ती यापुढें चालू रहाणें सर्वथा अनिष्ट आहे. ईश्वराच्या दृष्टीनें साऱ्या वर्गांची समान योग्यता आहे ही कल्पना उत्तरो-त्तर रूढ होत गेली पाहिजे. मध्ययुगांत राज्यकर्ते बहुधा स्वधर्माचे असल्या मुळे त्याजकडून ब्राह्मणास क्षत्रियवैश्यापेक्षा व क्षत्रियवैश्यास शूद्रापेक्षा अधिक मान देण्यांत येई. पण सांप्रत काळीं ज्ञान, सत्ता व संपत्ति या तिन्ही बाबतींत श्रेष्ठ पद मिळविलेल्या परकीय राज्यकर्त्यांच्या दृष्टीनें या देशांतील साऱ्याच जाती एकजात हीन योग्यतेच्या आहेत. अशा स्थितींत ब्राह्मणानें आपणास शूद्रापेक्षां श्रेष्ठ म्हणविणें सत्याच्या दृष्टीनें जसें चुकीचें आहे तसें समजसपणा-च्या दृष्टीनेंही आहे. पण त्या बाबतींत एकट्या ब्राह्मणासच दोषी ठरविणें न्यायाचें होणार नाही. कारण शूद्रही स्वतःस ब्राह्मणापेक्षा हीन समजून त्याच्या श्रेष्ठतेचें पोषण करीत असतो. वास्तविक पहातां, घड्याळांतील मिनिटकांट्यास घटेकांट्यापेक्षां बारापट धांवावें लागत असताही त्याची योग्यता त्या कांट्याच्या बाराव्या हिश्श्याइतकीच मानण्यांत येते यांत ज्या-प्रमाणें त्यांतील एकाही कांट्याचा दोष नसून त्याची सारी जबाबदारी यंत्र-रचना करणाऱ्या शिल्पकाराकडे असते, त्याप्रमाणें ब्राह्मण व शूद्र स्वतःस अनुक्रमें श्रेष्ठ व कनिष्ठ समजतात यांत त्यांतील एकाचाही दोष नसून त्याची सारी जबाबदारी दोघांत असत्य कल्पनांचें बीजारोपण करणाऱ्या मध्ययुगीन चातुर्वर्ण्यात्मक धर्माकडेच आहे. आधुनिक शिक्षणानें ज्या ब्राह्मणांच्या

च शूद्राच्या डोक्यांत सत्याचा प्रकाश पडला आहे त्यांच्या अंतःकरणांत श्रेष्ठकनिष्ठतेच्या या मिथ्या कल्पनेला मुळींच थारा मिळत नाहीं. असो, ब्राह्मणशूद्रांत वैषम्य रहाण्याचें दुसरें कारण रूढि. ही धर्मापेक्षांही प्रबळ आहे. पुष्कळदा सामाजिक सुधारणेस विरोध करिताना धर्माचें जें निमित्त पुढें करण्यांत येतें तें त्या विरोधाचें खरें कारण नसून रूढीचा अमल हेंच त्याचें खरें कारण असतें. पण धर्माप्रमाणेंच रूढीचेंही सामर्थ्य उत्तरोत्तर कमी कमी होत चाललें आहे; व ज्ञानाचा प्रसार जसजसा अधिकाधिक होत जाईल तसतसें तिचें उरलेलें सामर्थ्यही संपुष्टांत येईल यांत शंका नाहीं. जेथें जेथें रूढि गैरसोयीची व जाचक वाटली तेथें तेथें ती आपण झुगारून दिली आहे. बैलगाड्या जाऊन आगगाड्या व मोटारी आल्या; पायाचा प्रवास जाऊन पायगाड्या आल्या, सांडणीस्वार जाऊन टपाल व तारायंत्र आलें; परदेशांस जाण्याचीं दारें बंद होतीं तीं सताड उघडीं टाकण्यांत आलीं; अस्पृश्य म्हणून मानिलेल्या जातींची सावली खपत नव्हती तेथें विटाळ खपूं लागला, ब्राह्मणाचें नित्याचें सोंवळें जाऊन त्याच्या जागीं आंवळें येऊन बसलें; शेंड्या जाऊन राख-लेले केस आले; चिलमी जाऊन चुट्टे आले; धोतरें व अंगरखे जाऊन पाटलुणी व कोट आले; पागोटीं जाऊन टोप्या आल्या; पुराणें जाऊन व्याख्यानें आलीं, पुराणास जाणाऱ्या बायकांच्या हातचे तांदूळ व वाती जाऊन स्वतःचें अन्नवस्त्र शिक्षणाच्या जोरावर स्वतःच मिळविण्याची धमक आली. या साऱ्या गोष्टी प्रचारांत येण्यास कसून विरोध करणाऱ्या रूढीला अखेरीस ज्ञानप्रसाराबरोबर पुढें पुढें सरसावणाऱ्या सुधारणेपुढें माघार घेऊन हात टेंकावे लागले. ती रूढि ब्राह्मणशूद्रांच्या ऐक्यासच प्रतिबंध करील हें मुळींच शक्य नाहीं. उभयतांच्या संस्कृतीमधील भेद हाच वास्तविकपणें त्या ऐक्याच्या आड येत आहे. तो भेद तुम्हीं आम्हीं नाहींसा केला पाहिजे. ब्राह्मण ज्ञानसंपन्न आहेत तर शूद्रांनींही तसेंच झालें पाहिजे. त्यांची भाषा शुद्ध, पोषाख स्वच्छ, साधे व टापटिपीचे आणि भोजनपानादि व्यवहार स्वच्छ, सात्त्विक, व्यवस्थित व शिष्टसंमत आहेत, त्याअर्थी त्यांचें यांनीं अनुकरण केलें पाहिजे. उभयतांमधील अंतर कमी-कमी होत जाण्यास उभयतांमधील दळणवळण वाढलें पाहिजे. सुशिक्षित

ब्राह्मण स्त्री-पुरुषांनीं शूद्र कुटुंबांत जाऊन उपदेशानें व उदाहरणानें त्यांच्यांत सुधारणा घडवून आणली पाहिजे. पण याही बाबतीत शीघ्र व खात्रीची सुधारणा व्हावयास ज्ञानाचा जसा उपयोग होईल तसा इतर साधनांचा होणार नाहीं. याप्रमाणे भ्रामक धर्मकल्पनांचा, शिरजोर रूढीचा व संस्कृतिवैषम्याचा नायनाट करून ब्राह्मणशूद्रात ऐक्य स्थापित करण्यास ज्ञान आवश्यक आहे, व साक्षरता ही संपूर्ण ज्ञानभांडाराची चावी आहे. ही चावी हस्तगत करून घेण्याला दोन चार महिन्यांसारखा अल्प अवधिही पुरे आहे हें या शाळेच्या विद्यार्थ्यांना स्वानुभवानें समजलें आहे. ही चावी एकदा हस्तगत झाली की गुरूची सेवा न करितां, प्रयोगात पैसा व वेळ न दवडता आणि प्रवासाचे अगर प्रत्यक्ष अनुभवाचे कष्ट न सोसतां घरबसल्या अल्प प्रयासानें जगांतील सर्व उपलब्ध ज्ञान संपादन करितां येण्यासारखे आहे येथील शूद्रास शिक्षण देण्यास त्यांच्या-पैकीच एक सुविद्य व सुसंस्कृत गृहस्थ मिळाले ही सुदैवाची गोष्ट आहे. गुरूस स्वजातीय शिष्याबद्दल जितका जिव्हाळा वाटतो तितका परजातीय शिष्याबद्दल वाटणें शक्य नाहीं. नाना मराठ्याची अध्यापनाची योग्यता व हौस पाहिली असता त्यास ब्राह्मण-श्रेष्ठ म्हणणेंच योग्य होईल. त्यांची चाल-रीत सुद्धां इतकी ब्राह्मणी थाटाची आहे कीं, ते जन्मापासून ब्राह्मणामध्येच वाढले असावे असाही एखाद्या वेळीं संशय आल्यावाचून रहात नाहीं. आजचा बक्षीससमारंभ माझ्या हातून व्हावा अशी त्यांनी माझ्या वडिलां-पाशीं इच्छा प्रदर्शित करिताच मी तिला आनंदानें मान्यता दिली, याचें कारण असें की, शूद्रांच्याप्रमाणें स्त्रियांचा वर्गही आजपर्यंत मागसलेल्या वर्गांपैकीच गणला जात होता. दोन्ही वर्ग समदुःखी होते. आता दोन्ही वर्गांना शिक्षणाची द्वारें खुलीं झाली आहेत. एका वर्गाच्या शिक्षणास दुसऱ्या वर्गानें शक्य तितकी मदत करणें त्यांचें पवित्र कर्तव्य आहे. या रात्रीच्या शाळेचे संस्थापक व चालक शूद्रांचे प्रतिनिधि असून मी स्त्रियांची प्रतिनिधि आहे. केवळ चार पांच महिन्याच्या अल्प अवधींत या शाळेनें केलेली प्रगति पाहून मला सानंद आश्चर्य वाटतें. प्रत्येक सुशिक्षित गृहस्थ जर आपल्या आयुष्याचा काही वेळ अशा सत्कार्यांत खर्च करील तर मागसलेल्या वर्गांची सुधारणा होण्यास मुळीच उशीर

लागणार नाहीं. आजच्या समारंभाचा आपल्यावर झाला असेल तितकाच किंबहुना त्याहूनही मजवर अधिक परिणाम झाला आहे. नाना मराठ्यांनीं आपल्या अध्यापनानें आपल्या शिष्यास जे शिक्षण दिलें त्यापेक्षा अधिक शिक्षण आपल्या उदाहरणानें मला दिलें आहे. आजपासून मागसलेल्या वर्गाच्या शिक्षणास शक्य तितका हातभार लावण्याचा माझा संकल्प झाला आहे. शूद्रजातीय कुटुंबांत मिळून मिसळून त्यांच्या आचारास योग्य वळण लावण्याचाही माझा निर्धार झाला आहे. नाना मराठे या पवित्र कार्यात मला गुरुस्थानीं आहेत. त्यांच्या शिष्यांस मीं जीं बक्षिसें दिलीं आहेत त्यांनी त्यांना विद्यासंपादनाच्या मार्गावर एक एक पाऊल पुढे टाकण्यास उत्तेजन येईल अशी आशा आहे. पण त्यांच्या व माझ्याही गुरूचा सत्कार मी कोणत्या साधनानें करणार ? त्यांनीं जें लोकसेवेचें व्रत पत्करिलें आहे तें कोणत्याही बक्षिसाच्या लोभानें नसून निरपेक्षपणें पत्करिलें आहे. त्यांना केवळ कर्तव्यबुद्धीपासूनच प्रेरणा मिळाली असून कर्तव्य पार पडणें हेंच त्यांचें सर्वांत मोठें बक्षीस आहे. त्यांच्या दिव्य व अमोल कार्याचें मोल पार्थिव वस्तूंनीं करणें महत्पाप होणार आहे. तरी त्यांच्या संतोषाकरिता नव्हे, तर स्वतःच्या संतोषाप्रीत्यर्थ मी त्यांना हें घड्याळ गुरुदक्षिणा म्हणून नजर करीत आहे. तें त्यांनीं नेहमी जवळ बाळगिल्यास मला संतोष होईल, इतकेंच नाहीं तर माझा बहुमान झाल्यासारखा वाटेल."

व्याख्यात्रीचें सौम्य लावण्य, तिचा कोमल आवाज, तिच्या प्रत्येक शब्दांत व्यक्त होणारें मृदु व शुद्ध अंतःकरण यांनीं ती मिश्र सभा मंत्रमुग्धाप्रमाणें स्तब्ध होऊन बसली होती. टाळ्या वाजविल्यास त्यांच्या आवाजांत एखादा अमोल शब्द लुप्त होईल या भीतीनें त्या वाजविण्याचा मोहही श्रोत्यांनीं आवरून धरिला होता. श्यामही इतरांप्रमाणें आश्चर्यमूढ होऊन बसला होता. बालपणीं आपणाहून अज्ञानी असलेली चिमणी हीच काय असा त्यास मधून मधून संशय येत होता. पण तिनें त्यास ओळखिल्याबद्दलची खात्री पटविणारीं वाक्यें—कीं ज्यांचें पूर्ण स्वारस्य त्यास एकट्यासच कळण्यासारखें होतें, किंबहुना ज्यांचा उच्चारही त्यास अनुलक्षूनच होत होता—कानांवर येऊन त्या संशयाचें तावडतोब निराकरणही होत होतें. अखेरीस तिनें त्याचा गौरव करण्याकरितां घड्याळ

देण्यास पुढें केले तेव्हां त्यानें एखाद्या यांत्रिक पुतळ्याप्रमाणे उभा राहून व पुढे सरसावून त्याचा स्वीकार केला व ते देणारीस लवून नमस्कार केला. इतक्यांत त्या घड्याळाच्या परिचित स्पर्शामुळे म्हणा किंवा टिक-टिकीमुळे म्हणा, तो एकदम भानावर येऊन त्या घड्याळाकडे बारकाईनें पाहू लागला तो ते घड्याळ आपलेंच असून आपण उभयताच्या वियोग-कालीं चिमणीस दिले होते अशी त्यास आठवण झाली. त्याबरोबर त्याच्या सर्वांगावर रोमांच उभे राहिले. पण ती वेळ जुन्या गोष्टींचे स्मरण करीत दवडण्याची नव्हती. त्याने शारदाबाई देशपांड्याचे शाळेची परीक्षा घेऊन पारितोषिकें दिल्याबद्दल उचित शब्दांनीं आभार मानिले. स्वतःस मिळालेल्या बक्षिसाबद्दल तो साश्रु नेत्रांनीं म्हणाला, "हे घड्याळ मी अंतःकरणाजवळच बाळगीन; व हे घड्याळ कालदेवतेशी जितक्या एकनिष्ठपणे वागते तितक्याच एकनिष्ठपणे या शाळेच्या उपकारकर्त्या भगिनीशी वागण्याचा ते अंतःकरण सदा प्रयत्न करील." यानंतर सभेचें काम संपले, व तेथे जमलेली मंडळी शारदाबाईचे गुणानुवाद गात घरोघर जाण्यास निघाली. श्याम चिमणाताईस पोंचविण्याकरिता तिच्या गाडीच्या दारापर्यंत गेला. ती गाडीत बसल्यावर त्याने आपले रहस्य पूर्णपणे गुप्त ठेवण्याबद्दल तिची हलक्या आवाजांत विनंति केली. तिने मान हल-वून व "कधींकधी आमच्याकडे येत जा." असे म्हणून गाडीवानास निघ-ण्याचा इशारा केला. त्याबरोबर गाडी द्रुतवेगानं धडधड करीत निघून गेली. श्यामचें हृदयही पूर्वपरिचित घड्याळाचा पुनरपि सहवास घडल्या-मुळेंच की काय, आनंदाने धडधड करीत होते. श्यामलाही पूर्व परिचयाचें एक आवडते माणूस पुन्हा भेटले होते. पण त्या माणसाशी वधूच्या नात्यानेंही निकट सहवास घडण्याचे त्याच्या नशिबी नव्हते. ती विवाहित ब्राह्मण स्त्री व हा अविवाहित शूद्र तरुण. त्यांचा परस्परांबद्दल कितीही गाढ स्नेहभाव असला तरी अवस्थाभेद व जातिभेद हे दुलंघ्य व अभेद्य तट उभयतांमध्यें पहारा करीत उभे होते. गोपाळरावांच्या घरीं तिच्याशीं आपणाला पूर्ववत् मोकळेपणानें बोलतां येईल का ? हा एकच विचार घरीं परत जातांना श्यामच्या मनांत घोळत होता.

## प्रकरण सातवें

# चर्चा

वक्षीससमारभाचे प्रसंगी जमलेल्या विद्यार्थ्यांत किंवा कुतूहलप्रेरित होऊन आलेल्या सभाजनात श्यामशीं सादृश्य पावणारा एकही इसम आढळला नाहीं असे आईबापास सांगणे चिमणाताईस फार जड गेले. वास्तविक पहातां तें विधान शब्दशः अगदीं खरें होते. कारण श्यामची गणना विद्यार्थी किंवा कुतूहलानें जमलेले सभासद यांपैकीं एकाही वर्गांत होण्यासारखी नव्हती. पण त्या विधानानें श्रोत्यांची फसगत होण्यासारखी होती हें मात्र खरें; व चिमणाताईची सत्यनिष्ठा इतकी प्रखर होती कीं, असत्यावर शाब्दिक सत्याचा मुखवटा घालून त्याचें खरें स्वरूप लपविण्याचा तिला मनापासून तिरस्कार होता. ती वचनबद्ध होऊन चुकली नसती तर तिनें एक तर श्यामच्या रहस्याचा स्फोट तरी केला असता किंवा मौनव्रताचा स्वीकार तरी केला असता. पण अशा प्रसंगीं मौनाचा स्वीकार म्हणजे पर्यायानें रहस्यफोट करण्यासारखेंच झालें असते. हें जन्मांतील बहुधा पहिलेंच असत्य भाषण करितांना तिचा चेहरा गोरा-मोरा होऊन डोळे अश्रूंनीं डबडबून गेले. त्यावरून हिला आपल्या बाल-मित्राचा शोध लावण्याची प्रथम बरीच आशा असून अतीं निराशा झाल्यामुळेंच इतकें अवघड वाटत आहे अशी तिच्या आईबापांनीं आपली समजूत करून घेऊन त्या विषयाचा तिच्यादेखत पुनरुच्चार न करण्याचा निश्चय केला. त्यांस श्यामचा आपल्या गावात शोध लागण्याची विशेष आशा कधींच नव्हती; व म्हणून त्यांची त्या बाबतीत निराशाही मुळींच झाली नाही.

गोपाळरावांचे शिक्षण बेताचेंच झालें होतें. तथापि चिमणाताई त्यांचे एकुलतें एक अपत्य असून तिच्यावर त्यांचा जीव की प्राण असल्यामुळें तिला उत्तम प्रकारचें शिक्षण देण्यास त्यांनीं मुळींच कसूर केली नव्हती. तिला सासर नवीन विचारांचें मिळाल्यामुळें तिचें शिक्षण लग्नानंतरही चालू

राहिलें. नुक्तीच ती मुबई विश्वविद्यालयाची प्रवेशपरीक्षा पास झाली होती. यापुढील शिक्षण मिळण्याची मात्र तिला आशा नव्हती. कारण तिच्या नवऱ्याने नुक्तीच वकीलीची सनद मिळवून घ्यासही सुरवात केल्यामुळें तिला आता ससाराकडे लक्ष्य देणे भाग होते. शिक्षणात व्यत्यय आल्यामुळें तिची विशेष हानि झाली असे मात्र नाहीं. कारण तिला जिज्ञासा व वाचनलालसा अतोनात असल्यामुळे तिन घरच्या घरीच आपले ज्ञान वाढवून सामान्य पदवीधराच्या ज्ञानाच्या जोडीस आणून बसविले होते. सभातून व्याख्यानें देण्यात ती जितकी प्रवीण होती तितकीच वादविवाद करण्यातही कुशल होती. चिमणपुरातील प्रत्येक ब्राह्मण कुटुबात तिचे लहानपणापासून कौतुक होत आले होते. तिने सुधारणेच्या वतीने बोलण्यास सुरवात केली, की तिची मते मान्य नसलेली वृद्ध मडळीसुद्धां तिने सौम्य पण प्रत्ययोत्पादक रीतीने मांडिलेले मुद्दे निमूटपणे कबूल करी व या रीतीने झालेल्या आपल्या अपजयांतच धन्यता मानी. गोपाळराव तर प्रत्येक बाबतीत तिच्या ओंजळीने पाणी पीत असे म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाही. ते पूर्वी कट्टे धर्माभिमानी होते, पण मुलीचा प्रत्येक शब्द बाबावाक्याप्रमाणे मानीत आल्यामुळे आतां कडवे सुधारक बनण्याच्या मार्गाला लागले होते. 'मार्गाला लागले होते' असे म्हणण्याचे कारण इतकेच की त्याना अजून स्वतःची मते कृतींत उतरविण्यास लागणारे मनोधैर्य आले नव्हते. असो.

बक्षीससमारंभाच्या दुसऱ्याच दिवशी श्याम गोपाळरावाच्या घरीं गेला. त्या वेळीं बापाचे व लेकीचे प्रचलित राजकारणावर सभाषण चाललें होते. उभयतांनी प्रसन्न मुद्रानी त्याचे स्वागत केले. त्यांच्या भाषणांत आपल्या येण्याने व्यत्यय येऊ नये अशी इच्छा त्याने दर्शविल्यावरुन त्यानीं सभाषण पुढे चालू ठेविले.

गोपाळ०:—या साहेब लोकांना वाटते की आम्ही स्वर्गातून उतरलों आहोंत. त्यांना आमच्याशी हस्तादोलन करण्यालाही लाज वाटते. आम्ही सुधारणेच्या शिखरावर होतो तेव्हां हेच लोक अगांस रग लावून नागडे उघडे फिरत होते.

चिमणीः——त्या काळीं आपली व त्याची गाठ पड.
आपणही त्याच्याशीं हस्तादोलन करण्यास माघार घेतली अस..

गोपाळ०ः——अर्थात्च.

चिमणीः——मग आता त्यानींही तसेच वर्तन केले तर राग यावा ? ते हल्लीं सुधारणेच्या शिखरावर बसले असून आपण त्याच्या दृ. अगदीं रानटी अवस्थेत आहोत असे नाहीं का तुम्हांला वाटत, बाबा ?

गोपाळ०ः——आधिभौतिक दृष्टीनें असू कदाचित्; पण आध्यात्मिक दृष्टीने आम्ही त्याच्यापेक्षा खास श्रेष्ठ आहोत. त्याचा राक्षसी हव्यास कोणीकडे आणि आमचा अल्पसंतुष्टपणा कोणीकडे ? त्याचा डामडौल कुठे आणि आमचा साधेपणा कुठे ?

चिमणीः——त्याचा हव्यास राक्षसी आहे यात शंका नाहीं. त्याच हव्यासामुळे त्यानीं जगावर व सृष्टीवर आपले वर्चस्व स्थापित केले आहे. अशा वैभवसंपन्न माणसानीं डामडौलानें रहावें यातही मनुष्यस्वभावाला सोडून काहीं नाहीं. आमचा अल्पसंतुष्टपणा अनुकरणीय आहे यातही कांहीं संशय नाहीं. प्राचीन कालातल्याप्रमाणें तो ऐश्वर्यानें युक्त असता तर त्याला किंमत असती. निर्धन मनुष्य डामडौलानें राहू लागला तर तें त्याला मुळीं झेपणारच नाहीं. त्याला साधेपणाची रहाणीच शक्य असते. त्या साधेपणाबद्दल त्याने स्वतःची पाठ थोपटून घेणें कधींच शोभणार नाहीं. गरिबींत साधेपणानें रहाणारा इसम थोडेसें वैभव प्राप्त होतांच गाडयाघोडे उडवूं लागतोच कीं नाही ? उडवीत नसेल तर तो कवडीचुंबक आहे म्हणून खुशाल समजावे. तो गाड्यांघोड्यात पैसे खर्च करीत नाहीं तसा परोपकारातही करीत नाहीं. उलट पक्षीं पाश्चात्य देशात डामडौली लोकाप्रमाणे आपली सारी दौलत परोपकारार्थ खर्च करणारे धनिकही बरेच असतात ही गोष्ट नाकबूल करून चालणार नाहीं.

गोपाळ०ः——बरे, आमचा आहार तरी सात्त्विक असतो कीं नाहीं ?

चिमणीः——आमचा म्हणजे ब्राह्मण आणि त्याच्याच आचारविचारांच्या ज्या थोडया जाती आहेत त्यांचा असेल कीं नाहीं ? पण अशा जातींतल्या लोकांची संख्या इतरांच्या मानानें किती तरी अल्प आहे !

गोपाळ०ः——आणि आमची स्वच्छता ?

विमणीः—ती सुद्धां त्याच जातीपुरती व शरीराच्या बाह्य शुचिर्भूतपणापुरतीच मर्यादित असते. शरीराची अंतर्गत स्थिति, शरीरावर वापरावयाचे कपडे आणि रहावयाचे घर यासंबंधाने एखादा वेदोनारायणसुद्धा किती उदासीन असतो हे मींच काहीं सांगायला नको. त्या बाबनींत साहेब लोक आपणापेक्षा किती तरी श्रेष्ठ आहेत.

गोपाळ०:—आमची नीति तरी इतर राष्ट्रांनीं समोर कित्यादाखल ठेवण्यासारखी आहे कीं नाही ?

विमणीः—ग्रंथांत लिहून ठेविलेले नीतिसिद्धांत निःसंशय तसे आहेत. पण ते आचरणांत कितपत उतरतात हें नको का पहायला ? आपल्या धर्मांत सत्याची आणि निस्पृहपणाची इतकी थोरवी वर्णिली आहे. पण आपल्या समाजांत सत्याला स्मरून व निरपेक्षपणे आपलीं कर्तव्ये करणारीं किती माणसं दाखविता येतील ? आगगाडीच्या स्टेशनावर जा किंवा पोलीसस्टेशनांत जा, नोंदणीकचेरींत जा किंवा मामलेदारकचेरीत जा, न्यायमंदिरांत जा किंवा धर्ममंदिरांत जा, प्राचीन काळीं अत्यंत सत्यवादी व निस्पृह म्हणून गाजलेल्या ब्राह्मणाच्या वंशजांकडून द्रव्यार्जनाकरिता किती तरी अनन्वित प्रकार चाललेले दिसतील !

गोपाळ०:—यापैकीं बहुतेक संस्था गोऱ्या लोकांनीच काढिलेल्या आहेत.

चिमणीः—त्या कोणींही काढिल्या असल्या तरी त्यामुळे नीतिमान् म्हणविणाऱ्या हिंदु लोकांनीं आपली नीतिमत्ता भ्रष्ट कां होऊं द्यावी ! बरें, त्या संस्थांमुळे हिंदी लोकांचा अधःपात घडून यावा व इंग्रज लोकांचा घडून येऊं नये याचें तरी कारण काय ? तिकडील पोलीस अमलदार पहा, न्यायाधीश पहा, धर्माध्यक्ष पहा, त्यांची कर्तव्यनिष्ठा आपल्याकडील तशा अधिकाऱ्यांच्यापेक्षा किती तरी प्रखर व जाज्वल्य दिसून येईल ! इंग्रजांनीं निर्माण केलेल्या संस्था सोडून आपल्या परंपरागत संस्थांचा जरी विचार केला तरी त्यांत आपल्या नजरेस अधिक सत्यनिष्ठा येते का ? मुळींच नाहीं. आपल्या व्यापाऱ्यांचीच गोष्ट घ्या ना ! त्यांजमध्ये कितीशी सचोटी दिसून येते ! लबाडीशिवाय व्यापार चालावयाचा नाहीं हा तर इकडच्या व्यापाऱ्यांचा मूळ सिद्धांत ! उलट पाश्चात्य व्यापाराचा पायाच प्रामाणिक-

पणा हा आहे. तिकडील पेढ्या शेकडो वर्षे चालतात आणि आमच्या निघतात न निघतात तोंच नामशेष होतात यांतील रहस्य तरी हेंच आहे. मी इकडील लोकाच्या नैतिक अधःपाताबद्दल त्यास दोष देतें असें नाहीं. हजारों वर्षे एकतंत्री राजसत्तेचा, कृत्रिम धर्मबंधनाचा व अन्यायी रूढीचा अमल निमूटपण सोशीत आलेल्या समाजांत अधिक नीतिशुद्ध आचरण दिसले असतें तरच नवलाची गोष्ट होती.

गोपाळ०:—इंग्रज जर तू म्हणतेस इतके नीतिमान् असते तर त्यांनीं हिंदुस्थान जिंकतांना नीतितत्त्वें बाजूला गुंडाळून ठेविलीं तीं का ?

चिमणी:—शत्रूशीं आचरायची नीति निराळी आणि स्वजनांशीं आचरायची निराळी. भारती युद्धासारख्या धर्मयुद्धांत धर्मासारख्या धर्मनिष्ठास स्वतःच्या आप्तांशी लढतांना सुद्धां असत्याचा आश्रय करावा लागला. मग अलीकडची युद्धें आणि राजकारणें म्हणजे बोलूनचालूनच लपंडाव! पण रणक्षेत्रावर व राजकारणांत हुलकावणीचे डाव खेळणारे हेच इंग्रज लोक संकटाच्या वेळीं आपसांतील वैमनस्यें विसरून पराकाष्ठेचा स्वार्थत्याग करूं शकतात हें पाहिलें म्हणजे आपल्या स्वार्थीपणाची लाज वाटू लागते. ज्या काळीं त्यांच्या या नीतिमत्तेचा ऱ्हास होईल त्या काळीं त्यांचें वर्चस्वही संपलें म्हणून समजावें.

गोपाळ०:—आपणामध्यें देशाभिमानाचा पूर्ण अभाव आहे याबद्दल वाद नाही. त्या अभावाचा उगम काय असावा हें कळत नाहीं.

चिमणी:—त्याचा मुख्य उगम आपणामधील कृत्रिम जातिभेद हा आहे. आपल्या भिन्नभिन्न जातीमध्यें स्पर्शभोजनपानादिनिर्बंधांच्या भक्कम पायावर उभारलेली तटबंदी इतकी उंच आहे की, एका जातीला दुसरी-बद्दलच फारसा आपलेपणा वाटत नाहीं, मग संपूर्ण देशाबद्दल वाटणें दूरच राहिलें. पाश्चात्यामध्यें स्वहिताच्या व कुटुंबहिताच्या पुढची पायरी राष्ट्रहित हीच असते. उलट आम्हामध्यें ज्ञातिहित ही असते. आम्हास भिन्नभिन्न जाती भिन्नभिन्न राष्ट्रांच्याच ठिकाणीं वाटतात. पाश्चात्यांचें स्वराष्ट्रावर जें प्रेम तेंच आमचें स्वज्ञातीवर असतें. आम्हामधील निःस्वार्थी पुरुषांच्या साऱ्या परोपकारबुद्धीचा व्यय स्वजातीचें कल्याण साधण्यांतच होतो. ती स्वदेशहितापर्यंत पोंचतच नाहीं. ज्ञातिबांधवांच्या दुर्वर्तना-

मुळें समाजाचे अकल्याण होण्यासारखें असले तरी आपण त्यास पाठीशीं घालून त्याच्या दोषावर पांघरूण घालण्याचा प्रयत्न करितों. कृत्रिम जातिभेद नष्ट झाल्याशिवाय देशाभिमानाची स्फूर्ति उत्पन्न होणें शक्य नाहीं.

गोपाळ०:—आमच्यामधील पुरुष अधोगतीला गेले आहेत हें तुझें म्हणणें मी कबूल करितो. पण आमच्या स्त्रिया तरी पाश्चात्य स्त्रियाना आदर्श होण्याच्या योग्यतेच्या आहेत कीं नाहीं ?

चिमणी:—आता तर माझ्याच जातीचा प्रश्न आला. तेव्हां माझा तिजबद्दल थोडाफार पक्षपात हा होणारच. पक्षपात सोडून विचार केला तर पुरुषाच्याच परिस्थितींत, किंबहुना त्याजपेक्षाही जुलमी अमलाखालीं वाढलेल्या स्त्रिया त्याहून भिन्न का निपजाव्यात या प्रश्नाचे समाधानकारक उत्तर देता येणार नाही. त्यांचे वैवाहिक आचरण पुरुषांच्याहून बरेच शुद्ध असते ही गोष्ट खरी आहे. पण त्याचे श्रेय त्यांच्या नीतिमत्तेकडे नसून त्यास घरात कोंडून त्याजवर जागरूकपणें पहारा करणाऱ्या पुरुषाकडेच वास्तविकपणे आहे. पिंजऱ्यातील मैना स्वेच्छाचारी नसतात याचे श्रेय त्यांच्या कर्तव्यनिष्ठेकडे देणें गैर होईल. स्त्रियामध्ये खरोखरच कर्तव्यबुद्धि असती तर वैवाहिक नीतिमत्तेशिवाय इतर प्रकारचीही नीतिमत्ता त्याच्यांत तितकीच प्रखर आढळली असती. पण सत्यनिष्ठा, न्यायबुद्धि हे गुण त्यांच्यात पुरुषातल्या पेक्षाही कमी प्रमाणात आढळतात; व त्याचे कारण त्याही पुरुषप्रमाणेच गुलामगिरीत खितपत आहेत हे आहे. किंबहुना त्या गुलामांच्या गुलाम असल्यामुळे त्याची गुलामगिरी पुरुषाच्याहूनही अधिक जाचक आहे. शिवाय त्या अज्ञानांधकारांत चाचपडत आहेत यामुळेंही त्यांना योग्य मार्ग दिसणे शक्य नाहीं. आम्हामध्येही सर्व दृष्टींनीं आदर्शभूत आचरणाच्या स्त्रिया आहेत. पण त्या अपवादादाखलच आहेत.

गोपाळ०:—मग आम्हा हिंदु लोकांत एकही सद्गुण नाही असेच तुझे म्हणणे आहे तर ?

चिमणी:—असे कसे म्हणतां येईल ? गुलामातही कांही सद्गुण असतात; आणि ते आमच्या अगीं आहेतही. आमच्या अगीं पाश्चात्यांइतकी न्यायप्रियता व स्वार्थत्याग नसला तरी आम्ही गरीब स्वभावाचे, कष्टाळू, सोशिक, निरुपद्रवी, क्षमाशील व समाधानी आहोत. आम्हांसारखे

एकनिष्ठ सेवक सांपडणार नाहीत. हजारो वर्षांच्या सवयीने आमच्या अंगी आज्ञाधारकपणा चांगलाच बाणला आहे. स्वामीसाठी प्राण धोक्यांत घालण्याचे धैर्य आमच्या अंगी आहे; पण विचारस्वातंत्र्य आणि स्वतःस योग्य वाटते ते बोलण्याचे व कृतीत आणण्याचे मनोधैर्य आम्हांत नाही. ते मनोभूमीत फोफावण्यास स्वतंत्रतेचे वातावरणच लागते.

गोपाळ०:—एवंच स्वातंत्र्यप्राप्तीशिवाय आपणास ऊर्जितावस्था येणार नाही असाच सगळ्याचा निष्कर्ष निघतो तर?

चिमणी:—पण स्वातंत्र्य म्हणजे केवळ राजकीय स्वातंत्र्य मात्र नव्हे. राजकीय स्वातंत्र्य मिळूनही आपली मनें दुबळी राहिलीं तर ते स्वातंत्र्य आपण लौकरच गमावून बसू. किंबहुना मनें स्वतंत्र झाल्याशिवाय राजकीय स्वातंत्र्य मिळणेंही शक्य नाही, आणि मनें स्वतंत्र व्हावयास त्यांजवरील कृत्रिम धर्माचा व रूढीचा पगडाही दूर झाला पाहिजे.

गोपाळ०:—हे नाही माझ्या लक्ष्यांत आले.

चिमणी:—राजकीय स्वातंत्र्य मिळण्याकरिता त्याची मागणी प्रजेकडून एकजुटीनें झाली पाहिजे. प्रजेच्या सर्व वर्गांत एकजूट व्हावयास त्यांस सर्वांचे हितसंबंध एकच आहेत असें वाटलें पाहिजे. पण जोंपर्यंत त्यांजमध्यें हक्क व जबाबदाऱ्या यांसंबंधानें जमीनअस्मानाइतकें वैषम्य आहे तोंपर्यंत त्यास तसें वाटणें शक्य नाही; आणि जोंपर्यंत कृत्रिम चातुर्वर्ण्यसंस्था हयात आहे तोंपर्यंत तें वैषम्यही रहाणारच. वैषम्य असूनही एकजूट होणें एका काळीं शक्य होतें. ज्या काळीं 'राजा बोले दळ हाले' अशी स्थिति होती त्या काळीं राजाच्या किंवा धर्मगुरूच्या एका शब्दाबरोबर लाखो लोक एकजुटीनें धांवून येत असत. पण हल्लीं 'मिंय्या बोले दाढी हाले' अशी स्थिति झाली आहे. राजसत्ता तर नाहीशी झालीच आहे; पण तिचें धर्मसत्तेला जें पाठबळ होतें तें नाहीसें झाल्यामुळें धर्मसत्ताही लुली पडली आहे. धर्मसत्तेला लोकांमधील अज्ञानाचाही मोठा आधार होता. पण तोही दिवसेंदिवस ढांसळत चालला आहे. आतां शिक्षणाचे दरवाजे महारमांगांनासुद्धां मोकळे झाले आहेत. ज्या अज्ञानामुळें ते वरिष्ठ वर्गाचा शब्द झेलण्यास तयार असत तें नाहीसें होऊन ते आतां स्वतःच्या हक्कांचा विचार करूं लागले आहेत.

गोपाळ०:—हा सारा सुधारकांच्या फाजीलपणाचा परिणाम !

चिमणीः—अस्पृश्योद्धारास सुधारकांनीं हातभार लाविला नसता तर तो घडून येण्यास कांहीं अधिक कालावधि लागला असता इतकेच. तो त्यांच्या मदतीशिवाय घडूनच आला नसता हे म्हणणे चुकीचे आहे. अज्ञानाच्या भुसभुशीत पायावर उभारलेली इमारत जमीनदोस्त व्हावयास परिस्थिती-प्रमाणे कमीअधिक काळ लागेल, पण ती अखेर ढासळणार याबद्दल शंका नको. कोंबडे कितीही दडवून ठेविलें तरी सूर्योदय व्हावयाचा रहात नाहीं. वरिष्ठ जातीच्या जन्मसिद्ध श्रेष्ठत्वाबद्दल कनिष्ठ जातींत ज्या अज्ञान-मूलक कल्पना ठाम होऊन बसल्या आहेत त्या ज्ञानाच्या प्रसाराने उम-ळून खालीं पडताच कनिष्ठ जाती वरिष्ठ जातींपासून समान हक्क हिसकावून घेतील. त्यापेक्षा ते त्यांना आपण होऊनच बऱ्या बोलानें व सोईनें दिल्या-स त्यांत वरिष्ठ जातींचे नुकसान नसून सौजन्य मात्र दिसून येणार आहे. दुसऱ्याची वस्तु त्यास परत देऊन जर दानाचें पुण्य पदरीं पडत आहे तर तें दवडा कां ? बाबा, महारमांगाच्या शिक्षणामुळे वरिष्ठ जातीच्या वर्चस्वाची हानि झाली म्हणून त्यास वाईट वाटते. तसेंच आपल्या इंग्रज राज्यकर्त्यांसही लोकांत राजकीय ज्ञानाचा प्रसार होऊन आपणाबद्दलची पूज्यबुद्धि डळमळताना पाहून वाईट वाटते. ते राजकीय चळवळ्यांना जे शिव्याशाप देतात त्यामध्ये व धर्माभिमान्याकडून सामाजिक चळवळ्यांना मिळणाऱ्या शिव्याशापांमध्ये काय अंतर आहे ? कनिष्ठ जातींवरील आपलें वर्चस्व नाहींसें होऊ नये म्हणून दक्षता बाळगणारे हेच धर्माभिमानी जेव्हां राजकीय आखाड्यांत उडी मारतात तेव्हा समान हक्कांची भाषा बोलण्यासही यांची तयारीच असते ! 'स्वराज्य हा आपला जन्मसिद्ध हक्क आहे.' असें ज्या तोंडाने आग्रहानें सांगावयाचें त्याच तोंडानें 'अस्पृश्यता ही महारमांगाची जन्मसिद्ध आपत्ति आहे.' असे तितक्याच आग्रहानें प्रतिपादणे हे हिंदुस्थानातच शक्य आहे.

गोपाळ०:--पण या दोन बाबतींत अंतर आहे. इंग्रजांचे आम्हांवरील वर्चस्व राजकीय आहे, आणि आमचे अस्पृश्यांवरील वर्चस्व धर्मानें व रूढीनें प्रस्थापित केलें आहे.

चिमणीः--इंग्रजांचे आम्हांवरील वर्चस्वही त्या सदरांत नाही का

आणितां येणार ? त्यांचा धर्मही खिस्तावर विश्वास न ठेवणारांना पतित समजतो; आणि आम्हांवरील त्याच्या वर्चस्वाची रूढिही आता शभरांहून अधिक वर्षे चालू आहे. बरें, तसेच पाहू गेलें तर अस्पृश्याना स्पर्श केल्यास ईश्वराचा आपणावर कोप होईल असे वरिष्ठ जातीच्या एकाही इसमास अंतःकरणपूर्वक वाटते काय ? ज्यास वाटत असेल त्यास इंग्रजांचा एकतत्री अंमलही जाचक वाटत नाहीं. कारण तो इसम एकतत्री अमलाखालीं आनंदानें रहाणाऱ्या जुन्या पिढीपैकींच अर्थात् असणार. पण "ना विष्णुः पृथिवीपतिः" हे धर्मांचे तत्त्व ज्यानें समान हक्क मिळविण्याकरिता झुगारून दिलें त्याने त्याच धर्मातला शास्त्राधार आपल्या दुर्दैवी देशबांधवांवरील आपले अन्याय्य वर्चस्व कायम करण्यासाठीं दाखवावा हें न्यायाचेंही नाहीं व सुसंगतपणाचेंही नाहीं. रंगारूपानें, चालीरीतींनी, संस्कृतीनें, धर्मानें आपणाहून भिन्न असलेल्या परदेशस्थानें आपणाशी हस्तादोलन केलें नाहीं तर राग यावा आणि आपल्याच धर्माच्या, संस्कृतीच्या, चालीरीतींच्या व रंगारूपाच्या स्वदेशीयाचें हस्तादोलन तर राहोच, स्पर्शही राहो, पण सावलीही आपणास अपवित्र वाटावी यापेक्षा मोठा अधःपात तो कोणता असणार ! ते कांहीं नाही, बाबा. ज्या काळीं स्मृतिबाह्य व रूढिविरुद्ध वर्तन केल्यास पारलौकिक अकल्याण होतें अशी समाजाची कल्पना होती त्या काळीं राजकीय व धार्मिक असा भेद करणें शोभलें असतें. आतां ती कल्पना नाहींशी होऊनही तो भेद करणें म्हणजे नुस्ता शब्दच्छल आहे. हल्लीं त्या भेदाबद्दल सोइस्कर व गैरसोईचें हा अगदीं निराळाच भेद येऊन बसला आहे. होमहवन, स्नानसंध्या, नैवेद्यवैश्वदेव, जपजाप्य, सोंवळेंओवळें या गोष्टी गैरसोईच्या म्हणून आपण सोडून दिल्या व इतर जातींवरील वर्चस्व सोईचें म्हणून उराशीं धरून बसलो आहोत. मुंबईच्या हॉटेलासारख्या ठिकाणीं तें सुखाच्या आड येतें तेव्हां तेंही घटकाभर बाजूस ठेवण्याला आमची तयारी असते.

गोपाळ०:—पण अस्पृश्याची राहणी आपल्या दृष्टीने जशी अमंगळ असते तशी इंग्रजाच्या दृष्टीनें आपली नसते हे तू विसरतेस.

चिमणीः—नाहीं, बाबा; तेंही खरें नाहीं. अस्पृश्यांपैकीं महारांची रहाणी मीं प्रत्यक्ष पाहिली आहे; आणि ती तुम्हांला वाटते इतकी अमंगळ नसते

त्यांचीं घरें,अंगणें आपल्याइतकींच स्वच्छ ठेविलेलीं असतात.मी एक चोखा-मेळा पयाचा महार पाहिला आहे. तो शुचिर्भूतपणात कोणत्याही ब्राह्मणाची बरोबरी करील. भग्याची रहाणीही पुष्कळच स्वच्छ असते असं मीं ऐकिलें आहे. आपली रहाणी साहेब लोकास घाणेरडी वाटत नाही हेही तुमचें म्हणणें बरोबर नाहीं. आम्ही शेणानें जमीन सारवतो हें आमच्या मतानें स्वच्छतेचे लक्षण असले तरी त्याच्या मतानें गलिच्छपणाचे आहे. वाटेल तेथें थुकण्याचा आपणापैकीं पुष्कळांस विधिनिषेध वाटत नाही; पण तें त्यांना रानटीपणाचें वाटतें. रस्त्यावर थुकण्याचीही तिकडील काही देशात मनाई असते म्हणतात. आपले नेहमीचे कपडे तर त्याना फारच गलिच्छ वाटतात. पण त्याना आपल्या वस्त्रप्रावरणापेक्षां व चालीरीतीपेक्षामुद्धां आपला वर्ण फारच अमंगळ वाटतो. आपणास हबश्याचा रंग जसा किळस-वाणा वाटतो तसा त्याना आपला वाटतो. असें वाटणे चुकीचें आहे यांत संशय नाहीं. पण असें त्यास वाटतें यांतही संशय नाही. त्याना स्वतात आणि ब्राह्मणात जसा फरक वाटतो तसा ब्राह्मणात आणि महारात वाटत नाहीं. त्याच्या दृष्टीनें तुल्य असणाऱ्या या दोघातील एकाने दुसऱ्यावर वर्चस्व गाजवावें हें तर त्याना फारच चमत्कारिक वाटत असलें पाहिजे.

गोपाळ०:--त्याना आमच्या रहाणींतील भेद कुठून कळणार ?

चिमणी:--महारभागाची अमंगळ रहाणी हेंच स्पृश्यवर्गांनी त्याना अस्पृश्य समजण्याचें खरें कारण आहे की काय हे अजमावण्याची एक सोपी युक्ति आहे. समजा, एखाद्या महाराला शिककाई, उटणीं वगैरे लावून अभ्यंगस्नान घातलें आणि अंगावर घालायला स्वच्छ कपडे दिले.आपल्यापैकीं कितीजण त्याला स्पर्श करावयाला तयार होतील ? एकही नाहींना होणार ! मग ही अमंगळपणाची सबबही धर्माच्या सबबीइतकीच लंगडी नाहीं का ? मला वाटते कीं, अतिशूद्रादि जाती आरंभीं जरी अपवित्र मानिल्यामुळें दूर ठेवण्यात आल्या असल्या तरी हल्लीं त्या दूर रहात असल्यामुळेंच अपवित्र वाटत असतात. पशु आमच्या वराजवळच गोठ्यात रहात असल्यामुळे आम्हास अतिशूद्रापेक्षां पवित्र वाटतात. महाराच्या हातचें पाणी घेतल्यास वरिष्ठ जातीचा मनुष्य बाटतो; पण बैलाच्या पाठीवर आलेलें पाणी मात्र त्याला चालते ! अतिशूद्रानें ब्राह्मणाच्या घरात प्रवेश

केला तर जमीन अग्नीनें जाळून व गाईचें मलमूत्र शिंपडून पवित्र करावी लागते ! मनुष्याला पशूच्याही खालच्या पायरीवर बसविण्याइतके आपण माणुसकीला विसरलों आहोंत. कुणब्याशीं आपलें सघट्टन विशेष पडतें म्हणून ते आपणास महारामांगापेक्षां कमी अपवित्र वाटतात. भिन्नभिन्न जाती एकत्र मिसळण्याचे प्रसंग वरचेवर येत जातील तर त्यांचा एक-जीव होण्यास फारसा उशीर लागणार नाहीं. हल्लीं ब्राह्मण बायकांचा ब्राह्मणेतर बायांशीं शिवाशिव होण्याचा क्वचित् प्रसंग येतो, म्हणून त्यांना लुगडें बदलण्याची यातायात परवडते. पण ती शिवाशिव घडो-घडी होऊं लागली तर तिचें येवढें अवघड वाटणार नाहीं. स्पर्शाच्या पुढचा प्रश्न पाण्याचा. ब्राह्मणेतर डाक्तरानें तयार केलेल्या औषधांतलें पाणी आम्हाला चालतें. मग त्याच्या हातचें नुसतें पाणी चालण्यास कां हरकत असावी ?

गोपाळ०:––औषध घेणें हा आपद्धर्म आहे.

चिमणी:––एखाद्या माणसाला शैत्य झालें म्हणजे जो आपद्धर्म श्रेयस्कर असतो तो सबंध देशाला घरघर लागली म्हणजे त्याज्य ठरतो वाटतें ! बरें, औषधाचें एक राहू द्या. गवळ्याच्या घरच्या दुधात पाणी मिसळलेलें आहे अशी खात्री असतां केवळ जिभेचें कोडकौतुक पुरविण्या-करितां त्याचें सेवन करणें हा तर आपद्धर्म नाहीं ना ? जर आपणास असें विटाळलेलें दूध चालतें तर शुचिर्भूत कुणब्याच्या हातचें पाणी पिण्या-स हरकत कोणती, अशी समजस ब्राह्मणाची तरी समजूत पडण्यास वेळ लागू नये असें मला वाटतें; व एकदां पाण्याच्या स्पर्शास्पर्शाची अडचण नाहींशी झाली कीं कुणब्याच्या हातचें अन्न चालण्यासही हरकत येणार नाहीं.

गोपाळ०:––पण उभयतांमधील सघट्टन व भोजनपानादि व्यवहार वाढण्याला कनिष्ठ जातींनाही आपल्या भाषेत, चालीरीतींत वगैरे सुधारणा करावी लागेल.

चिमणी:––अर्थातच. पण सुधारणा व सघट्टन हीं नेहमीं परस्परावलंबी-च रहाणार. सुधारणेनें सघट्टन वाढेल त्याप्रमाणें सघट्टनानेंही सुधारणेस मदत होईल. सुधारणेची जबाबदारी कनिष्ठ वर्गावर आहे तशी वरिष्ठ वर्गावरही आहे. पूर्ण सुधारणा होईपर्यंत कनिष्ठ वर्गाशीं व्यवहार करणार

नाहीं अशी वरिष्ठ वर्गांनीं अट घालणें हें स्वराज्याची पूर्ण पात्रता अंगीं येईपर्यंत त्याची प्रजेस प्राप्ति होणार नाहीं असें राज्यकर्त्यांनीं म्हणण्यासारखेंच आहे. कुणब्यामाळ्यांत मिसळून त्याना स्वच्छता शिकविणें हें ब्राह्मण स्त्री-पुरुषाचें कर्तव्य आहे. बाबा, कालच्या समारंभापासून मला असें वाटू लागलें आहे की, साऱ्या हिंदूंचा एकजीव करण्याच्या प्रयत्नास महाराष्ट्रां-तील इतर गांवीं सुरवात होण्यापूर्वी आपल्या गावात करावी. खरें म्हटलें तर नानानी रात्रींची शाळा काढून या कामास आधींच आरंभ केला आहे. त्यानीं आपल्या जातीची जबाबदारी ओळखिली तशी आपणही आपल्या जातीची ओळखिली पाहिजे. नानांची हरकत नसेल तर आम्ही दोघे मिळून आजच या कामास लागू.

श्याम:— माझी काय हरकत असणार ? मला कुणब्याबद्दल वाटतो तितकाच आपलेपणा ब्राह्मणाबद्दलही वाटतो. म्हणून दोन्ही जातींचे एकी-करण करण्याच्या कोणत्याही प्रयत्नाला माझें पाठबळच मिळणार.

गोपाळ०:—तुमच्या प्रयत्नांस मजकडून विरोध होणार नाही, होईल तर मदतच होईल. पण हजारों वर्षे चालत आलेल्या कल्पनांचा मोड दोन माणसांकडून कसा होणार याचीच मला शंका आहे.

चिमणी:—दोन माणसांकडून होणार असें म्हणतो कोण ? आरंभी आम्ही दोन असलो तरी कालांतरानें दोहोंचे दोनशे व दोनशांचे दोन हजार होतील. आम्ही एक ऐक्यवर्धक संस्थाच काढू म्हणजे झालें. शुभ च शीघ्रम्. आजच तुमच्या सहीनें जाहिरात काढून येथील ब्राह्मणांची सभा बोलाविली पाहिजे. त्या सभेंत भाषण करून या प्रश्नाचें महत्त्व ठसविण्याचा मी प्रयत्न करणार, व साधल्यास संस्थेची मुहूर्तमेढही रोवणार. पाहू या काय होतें तें.

गोपाळराव उठताउठतां हसत म्हणाले, " तुमच्या संस्था, सभा, रात्रीच्या शाळा, समता, व्यक्तिस्वातंत्र्य इत्यादि खटपटीमुळें सुधारक लोक साहेब लोकांची नक्कल करण्यांतच पटाईत असतात या धर्माभिमान्यांच्या आरोपास चांगलीच पुष्टि मिळेल म्हणावयाची !"

चिमणाताईनें उत्तर दिलें, " परक्यांच्या चालीरीतींतील ग्राह्यांश घेतल्या-शिवाय कोणतीही सुधारणा शक्य नाही. त्या परक्यांच्या म्हणूनच केवळ

त्याज्य मानण्यांत शहाणपणा नाहीं. इंग्रजांना आपल्या तत्त्वज्ञानांतील, भाषाशास्त्रांतील, वैद्यकींतील तथ्यांश उचलण्यांत कमीपणा वाटला नाहीं तसा त्यांचा राजकीय व सामाजिक व्यवहार उचलण्यांत आपणासही वाटण्याचे कारण नाहीं. संस्था, सभा, ठराव, स्वयंसेवक, फंड या गोष्टी इंग्रजांपासून सामाजिक सुधारकांनीं जशा उचलल्या तशा राजकीय सुधारकांनीं व हिंदुधर्मपरिषदेसारख्यां किंवा धर्ममहामंडलासारख्या धार्मिक संस्थांनींही उचलल्या आहेत. स्वायत्तता, समाजसत्तावाद, जन्मसिद्ध हक्क, जबाबदारीचें स्वराज्य या कल्पना पाश्चात्यांकडून घेणें जर अंध अनुकरण ठरत नाहीं तर सामाजिक समता, व्यक्तिस्वातंत्र्य इत्यादि कल्पना घेणें तरी कां ठरावें ? राजकीय व सामाजिक असा पंक्तिप्रपंच होण्याचें कारण इतकेंच कीं, राजकीय हक्कांच्या प्राप्तींत समाजांतील वरिष्ठ वर्गाचा तोटा नसून नुसता फायदाच आहे. उलट सामाजिक हक्क मिळण्यांत त्या वर्गाची हानि व कनिष्ठ वर्गाचा लाभ आहे.

ठरल्याप्रमाणे सभा भरविण्यांत आली. तिला गावांतील सर्व ब्रह्मवृंद जमला होता. एका बाजूस स्त्रियाकरितां खास जागा राखून ठेविली होती, ती चिकार भरून गेली होती. चिमणाताईचें भाषण अंदाजापलीकडेही परिणामकारक झालें. सभेंतील बहुतेकांचा तिच्याशीं प्रत्यक्ष परिचय असून त्यांस तिजबद्दल एक प्रकारचा अभिमानही वाटत होता. श्रोत्यांची वक्त्याबद्दल सहानुभूति असली म्हणजे त्यास विलक्षण स्फुरण चढत असतें. त्यातून चिमणाताईची भाषणाच्या विषयातील तयारीही उत्तम प्रकारची होती. यामुळें तिला श्रोत्यांची समजूत पटविण्यास विशेष अडचण पडली नाहीं. हिंदुस्थानास स्वराज्य मिळणें शक्य असेल तर ते सर्व जातींच्या एकीकरणानेंच कसें शक्य आहे, ते एकीकरण घडवून आणण्याची जबाबदारी कनिष्ठ जातींप्रमाणें वरिष्ठ जातींकडेही कशी जाते, कनिष्ठ जातीस बौद्धिक व इतर प्रकारचें शिक्षण देऊन स्वतःच्या स्पर्शास्पर्शासारख्या हलक्या विचारांस फाटा देणें वरिष्ठ जातींस किती जरूर आहे हें तिनें प्रथम श्रोत्यांच्या मनांवर उत्तम रीतीनें बिंबविलें; नंतर नाना मराठ्यांनीं कुणब्यामाळ्यांत साक्षरतेचा प्रसार करण्याचा मोठ्या प्रमाणावर जो प्रयोग सुरू केला होता त्याचें तिनें सुरस वर्णन केलें; त्याचे मागाहून साक्षरते-

बरोबर त्याच्या चालीरीतींतही सुधारणा होणे व त्यासाठी उभय जातींच्या परस्परसमेलनाचे प्रसग वारंवार घडून येणे इष्ट आहे असे तिने आग्रहानें प्रतिपादिले. या कार्यास अनेक स्वयंसेवकाच्या व स्वयंसेविकाच्या साह्या- ची आवश्यकता आहे असे सांगून तिने या राष्ट्रीय कामास कोण कोण तयार आहे असा प्रश्न केला तेव्हा अनेक तरुण व त्याच्या पत्नी पुढे आल्या. त्यांची ऐक्यवर्धक सस्थेचे सभासद म्हणून तात्डतोब नोंद करण्यांत आली. गोपाळरावांस सस्थेचे अध्यक्ष आणि चिमणाताई व नाना मराठे यांस चिटणीस नेमण्यांत आले. नाना मराठ्यांच्या रात्रीच्या शाळेच्या उपयोगाकरिता व भिन्न जातींच्या मिश्र समेलनाकरिता गोपाळरावांनी आपली एक एकमजली कौलारू इमारत दिली.

प्रकरण आठवें

## कार्यारंभ

दुसऱ्या दिवसापासून संस्थेच्या सभासदाकडून प्रत्यक्ष कामास सुरवात झाली. ब्राह्मणांच्या व कुणब्यामाळ्याच्या आळींत करावयाच्या कामाची भिन्न भिन्न स्त्री-पुरुष-सभासदांत वांटणी करण्यात आली. पति-पत्नी उभयता सभासद असल्यास त्यानीं बरोबर हिंडून परस्पराच्या सह-कारितेनेंच काम करावें, सभासद एकटा पुरुष किंवा स्त्री असल्यास त्याने अगर तिने आपल्यासारखाच दुसरा पुरुष अगर स्त्री बरोबर घेतल्याशिवाय संस्थेच्या कामासाठीं संचार करू नये आणि पुरुषानीं पुरुषामध्येंच व स्त्रियानीं स्त्रियामध्येंच काम करावे असे ठरलें. ब्राह्मण मोहल्ल्यात काम करणाराना जरूर पडेल तेथे गोपाळराव व चिमणाताई यांनी मदत करावी आणि ब्राह्मणेतराच्या आळींत काम करणाराना नाना मराठ्यानीं मदत करावी असेंही त्याबरोबरच ठरलें. वृद्धापेक्षा मध्यम-वयस्क, मध्यमवयस्कांपेक्षा तरुण व तरुणांपेक्षा मुलें अधिक संस्कारक्षम असतात हे ओळखून आपल्या उत्साहाचा शक्य तितका सत्पात्रीं विनि-योग करण्याची सभासदास ताकीद देण्यांत आली.

ब्राह्मण व ब्राह्मणेतर यामध्यें असा एक वर्ग होता कीं, ज्याची अजून जुनी धर्मपर दृष्टिच कायम असून ज्यास अजून नवी राजकीय दृष्टि उत्पन्न झाली नव्हती. या वर्गातील ब्राह्मणास चालू राज्यपद्धति निर्दोष वाटत असून लोकसत्ताक शासनपद्धतीचे मुळींच महत्त्व वाटत नव्हते, व ब्राह्मणे-तरास चातुर्वर्ण्याच्या रूढ कल्पना झुगारून देणे महापातक वाटत होते. हा वर्ग बहुधा वयस्क मंडळीचाच बनलेला असल्यामुळे त्यास वळविणें दुरापास्त होते; व त्याचा विरोध दीर्घकालपर्यंत जाचण्यासारखाही नव्हता.

हा आग्रही वर्ग सोडिल्यास दुसरा एक वर्ग अशा लोकांचा होता, कीं ज्यांस स्वतःचीं मते बनविण्याइतकी बुद्धि किंवा आत्मविश्वास नसल्यामुळें अगर आपलीं स्वतंत्र मतें बोलून दाखविण्याचें धैर्य नसल्यामुळें बहुजन-

समाजाची तीच आपली मते म्हणून पत्करण्याची ज्याची नेहमी तयारी असे. पहिल्या वर्गास वळवू पाहणे जसे व्यर्थ होते तसे या वर्गास वळविणे निष्कारण होते. कारण स्वतंत्र बुद्धीच्या लोकांपैकी बहुजनमत हस्तगत झाल्यास ते अनुसरण्याची या परप्रत्ययनेय वर्गापाशी निराळी याचना करण्याची मुळींच जरूर नव्हती.

उरलेल्या लोकांपैकी बरेचजण स्वतःच्या बुद्धीने चालणारे होते. पण त्यांपैकी बहुतेक स्वार्थी व संकुचित दृष्टीचे असल्यामुळे त्यांची नजर स्वतः-च्या तत्कालिक हितापलीकडे पोचण्यासारखी नव्हती. तथापि ही गोष्ट नवीन संस्थेस फारशी नडण्यासारखी नव्हती. कारण संस्थेचे अध्यक्ष गावातील सर्वांत प्रमुख व वजनदार गृहस्थ असल्यामुळे त्यांच्या मर्जीवर बऱ्याच ब्राह्मण-अब्राह्मणांचे हितसंबंध अवलंबून होते. भिक्षुकांना त्यांजपासून व त्यांच्या अनुयायांपासून दरसाल बरीच प्राप्ति होई, आणि बरेच कुणबी-माळी त्यांची कुळे व नोकर असत. गोपाळराव स्वभावाने व बोलण्या-चालण्यात फार गोड असत. यामुळे ज्यांचे हितसंबंध त्यांच्याशी निगडित नसत असे लोकही त्यांस नाराज करण्यास तयार नसत.

गावातील ब्राह्मण तरुण पिढीपैकी बऱ्याचजणांस राजकीय हक्कांची किंमत कळत असून त्यांच्या प्राप्तीकरिता कनिष्ठ जातींस सामाजिक हक्क देण्यास त्यांची बौद्धिक तयारी होती. त्यांतील एखाद्या जातीच्या इसमाच्या पंक्तीस बसण्यात किंवा त्याने विटाळलेले पाणी पिण्यात धर्मविरुद्ध किंवा रूढिविरुद्ध आचरण होते असे त्यांस वाटत नव्हते. ते आगगाडींतून प्रवास करिताना खेटून बसलेल्या अस्पृश्याकडे दुर्लक्ष करीत फराळावर ताव मारीत असत, व मुंबईस जात तेव्हा इराण्याच्या हातचें पेय पिण्यास अनमान करीत नसत. त्यांना गुप्तपणे कुणब्या-माळ्यांबरोबर एकाच बाकावर बसून फराळ करण्यास अगर त्यांच्या हातचें पाणी पिण्यास संकोच वाटण्याचें काही कारण नव्हतें. पण जी गोष्ट लपून करावयास त्यांस विधिनिषेध वाटत नसे ती उघडउघड करून वडील माणसांचीं मनें दुखाविणें त्यांच्या जिवावर येई. पण अशीं वडील माणसें स्वतः सुधारकी वर्तन करण्यास तयार न झालीं तरी त्यांच्या मुलां-बाळांच्या तशा वर्तनाकडे क्षमाशील दृष्टीनें पहाण्यास तयार करणे फारसें

कठिण नव्हते. पूर्वींच्या व हल्लींच्या पिढीत अनेक बाबींसंबंधानें जमीन-अस्मानांचे अंतर पडलेले त्यांनीं प्रत्यक्ष पाहिले होते. सोंवळें, शेंडी, ब्रह्मकर्म यांचे जवळजवळ पूर्ण उच्चाटन झालेले त्यांनीं पाहिले होते, व विधवाकेश-वपन, अस्पृश्यता यांचाही नायनाट होण्याचीं पूर्व लक्षणें त्यांच्या दृष्टीस पडलीं होती. सुधारणेचा हाच वेग कायम राहिल्यास किंवा वृद्धिंगत होत गेल्यास त्यांच्या मनास धक्का बसण्याचें कारण नव्हतें. भावी सुधारणेची रूपरेषा त्यांच्या डोळ्यांत स्पष्टपणें आली होती. तिचे डोहाळेही त्यांस दिसू लागले होते. तिच्यासंबंधानें त्यांची नजर अजून मेली नव्हती इतकेंच काय ते. ती मारणें विशेष दुर्घट होतें असेंही नाहीं. उदाहरणार्थ, शूद्राचें पान ब्राह्मणाच्या पानालगत असून त्याच्याशीं काटकोन करीत असल्यास अगर दोन्ही पानें एकाच रेषेंत पण बऱ्याच अंतरावर असल्यास त्यांच्या धर्मबुद्धीस धक्का बसत नसे; मग त्या काटकोनाचे अंश क्रमाक्रमानें वाढवितां वाढवितां कालांतरानें १८० अंशांपर्यंत नेऊन पोहोंचविले किंवा ते रेषात्मक अंतर आस्ते आस्ते कमी करीत एका तांब्याच्या व्यासाइतकें त्याचा संकोच केला तर तिला धक्का कां बसावा? एखाद्या ब्राह्मणेतर डाक्तरानें अर्काचें प्रमाण कमी व त्याशीं मिसळावयाच्या पाण्याचें प्रमाण अधिक करितां करितां कांहीं दिवसां-नीं औषध पाण्यापासून ओळखू येईनासें केलें असतें तर तें ग्राह्य व त्याच्या हातचें साधें पाणी अग्राह्य असा निर्णय देणें त्या धर्मबुद्धीस जरा जडच गेलें असतें. गवळ्यानें दुधाबरोबर बेमालूमपणें मिसळलेलें पाणी, त्यानें विकलेल्या लोण्यांतून निथळणारें पाणी आणि त्यानें स्पर्श केलेलें पाणी हीं क्रमाक्रमानें समोर आलीं असतीं तर त्यांतील बारकाईचा फरक कांटेतोल धर्मबुद्धीसही भुरळ पाडण्यासारखा वाटला असता.

वारंवार पहाण्यांत येणाऱ्या गोष्टीचें महत्त्व नाहींसें होतें तसें अप्रियत्व-ही नाहींसें होतें. अतिपरिचयामुळें अवज्ञा उत्पन्न होते तशी नाहींशीही होते. ब्राह्मण-अब्राह्मणांच्या मिश्र सभेंत एका ब्राह्मण स्वयंसेवकानें बोलतांना घसा कोरडा पडताच टेबलावर ठेवलेल्या कांचेच्या पेल्यांतील पाण्याचा घोंट घेतला. तें श्रोत्यांस विलक्षण वाटून त्यासंबंधानें गांवांत बराच गवगवा झाला. दुसऱ्या एका सभेंत तोच प्रकार झाला, तेव्हां त्याचें सभासदांस किंवा इतर गांवकऱ्यांस विशेष वैलक्षण्य वाटलें नाहीं. असें होतां होतां

तो प्रकार लोकांच्या इतका अंगवळणीं पडून गेला कीं, खुर्चीवर अध्यक्ष असल्यावांचून सभेचें काम सुरू होणें जितकें अशक्य, तितकेंच टेबलावर पाण्यानें भरलेला पेला असल्यावाचूनही अशक्य असा समज होऊन बसला. याप्रमाणें पाण्याच्या स्पर्शास्पर्शाची एक मोठी अडचण नाहींशी झाली.

अजून ब्राह्मणांस कुणब्यांमाळ्यांच्या घरचें पाणी चालत नव्हतें. त्याकरिता कुणब्यांमाळ्यांच्या रहाणींत फरक होणें जरूर होतें; व त्या कामीं त्यांच्या मोहल्ल्यांतील ब्राह्मण स्वयंसेवकांनीं चिकाटीचे प्रयत्न चालविले होते. ब्राह्मणेतरांतील बहुतेक स्त्री-पुरुष शेतकरी व मजूर वर्गांपैकीं होते. त्यांना दिवसभर शेतांत, कारखान्यांत, स्टेशनावर वगैरे सारखें खपून अंगातून घाम काढावा लागे. इतक्या श्रमांनंतर संध्याकाळीं आंघोळ करण्याची इष्टता त्यांजवर ठसविण्यांत आली. त्याचप्रमाणें सकाळीं न्याहारी करण्यापूर्वी स्नान करणें किती श्रेयस्कर आहे हेंही त्यांच्या मनावर बिंबविण्यांत आलें. पुष्कळ ब्राह्मणेतरांचीं घरें व अंगणें ब्राह्मणांच्याप्रमाणेंच सारवून व झाडून स्वच्छ करण्यांत येत असतात. पण थुंकणें, चूळ टाकणें वगैरे विधि पुष्कळदां बसल्याजागीच होत असल्यामुळें आणि घराच्या खांबांचा व भिंतींचा हातरुमालाऐवजीं उपयोग करण्यांत येत असल्यामुळें साऱ्या घरांत अस्वच्छता माजून रहाते. जमिनी वारंवार स्वच्छ केल्या जातात. पण खांबांस व भिंतींस बसलेले डाग दिवाळीची सफाई व सारवण होईपर्यंत तसेच रहातात. जागेप्रमाणें कपडे व देहही स्वच्छ ठेवणें जरूर असतें. पण ते लहान मुलांचें व गुरांचें मलमूत्र, चिखल इत्यादिकांनीं घाणेरडे आणि तेल, तूप वगैरे प्रवाही पदार्थांनीं चोपडे झाले असतांही पाण्यानें धुवून साफ करण्याची प्रवृत्ति कमी असल्यामुळें ते त्याच स्थितींत राहून त्यांवरच भोजनपानादि व्यवहार उरकण्यांत येतात. तसेंच मातीचीं व धातूचीं भांडीं स्वच्छ घासण्याची हेळसांड आणि पाण्यांत गलिच्छ हात अगर भांडीं बुडविण्यासंबंधानें होणारी उपेक्षा यामुळें पाणीही असावें तितकें स्वच्छ रहात नाहीं; आणि स्वच्छ पाणी हाच घरातील स्वच्छतेचा आधार असल्यामुळें तिचाही बिघाड होतो. गृहव्यवस्थेंत स्वच्छतेप्रमाणें टापटीपही आवश्यक असते. तिच्या अभावीं मोठें घरही अडचणीचें भासतें, व ती असल्यास लहान घरही ऐसपैस वाटतें. या साऱ्या

गोष्टी ब्राह्मण स्वयंसेवकसेविकानीं प्रत्येक घरांतील स्त्री-पुरुषांस समजावून दिल्या, व त्यासंबधानें पाळावयाचे नियम घालून देऊन त्याची अमल-बजावणीही प्रेमाच्या सक्तीनें करून घेण्याचा परिपाठ ठेविला. स्वच्छते-च्या व टापटिपीच्या बाबतींत खुद्द ब्राह्मणाच्याही कित्येक पोटजातींत असावी तितकी समाधानकारक स्थिति नाहीं, व यामुळेच अजून सर्व ब्राह्मणांत सर्रास बेटीव्यवहार सुरू होत नाहीं. प्रत्येक जातीनें व पोट-जातीनें आपापलीं वैगुण्ये ओळखून तीं नाहींशी करण्याचें व इतरातील इष्ट प्रकारांचे अनुकरण करण्याचे मनात आणिल्यास हिंदु समाजाच्या एकीकरणास जोराचे चालन मिळेल यात संशय नाहीं.

सर्व हिंदूंचे एकीकरण होण्यास मत्स्यमांसाहाराची एक मोठी अडचण आहे. पण दारिद्र्यामुळे अनेक शूद्र कुटुंबात तो आहार केवळ नावाचा उरला आहे, व अनेक ब्राह्मण कुटुंबात तो लपूनछपून सुरू झाला आहे. शाकाहारी ब्राह्मणाना मत्स्यमांसाहार मुळीच चालत नाहीं, शूद्राना तो व शाकाहार दोन्ही चालतात. अशा स्थितींत जाहीर जेवणावळीचे प्रसंगीं करावयाचा स्वयंपाक निव्वळ ब्राह्मणी थाटाचा आणि खाजगी मेजवान्याचे प्रसंगीं करावयाचा यजमानास व निमंत्रितास आवडेल तसा असावा असा नियम केल्यास या दोन जातींच्या व्यवहारांत येणारें एक मोठें विघ्न नाहींसें होईल. चिमणपुरांतील बहुतेक शूद्र कुटुंबें शाकाहारीच असल्यामुळे तो नियम करणें व पाळणें कोणासही जड वाटण्याचे कारण नव्हते. स्वयंसेविकांनीं शूद्र स्त्रियांस नाना प्रकारचे ब्राह्मणी पदार्थ करावयाच्या रीती सप्रयोग समजावून दिल्या, व शूद्रामध्ये जे चटकदार नवीन प्रकार आढळले त्याच्या रीती शूद्र स्त्रियापासून उचलल्या. स्वयंपाक करिताना स्वच्छता ठेवण्यासाठीं काय काय योजना कराव्या लागतात हेही ब्राह्मण स्त्रियानीं शूद्र स्त्रियाना शिकविलें; आणि त्याही ते हौसेनें व निरभिमान वृत्तीनें शिकल्या.

जेवणांतल्याप्रमाणें पोषाखांतही वरिष्ठ कनिष्ठ जातींमध्यें लहानसान फरक असतात, व ते कधीं कधीं त्यांमध्ये मोठें वितुष्ट पडण्यास कारणी-भूत होतात. चिमणपुरच्या लोकानीं एकमताने असे ठरविले कीं, ब्राह्मणां-नीं व शूद्रानीं इतःपर आपापल्या पगड्या व पागोटीं वापरण्याचे सोडून देऊन टोप्या, रुमाल व फेटे यांवर शिरोभूषणांचे आणि वहाणांवर पाद-

त्राणांचे कार्य भागवावे. हा नियम अमलांत येण्यास गावातील वयस्क मडळीं-नींही हरकत घेतली नाही. शूद्र स्त्रियानीं ब्राह्मण स्त्रियाच्या वस्त्रप्रावरणाचे व अलकाराचे साधेसाधे व स्वल्प किंमतीचे प्रकार आणि ते वापरण्याच्या रीती आनदानें उचलल्या. थोड्याच महिन्यात रस्त्याने चालणारा पुरुष किंवा स्त्री ब्राह्मण आहे कीं शूद्र हे बाह्य वेषावरून ओळखू येईनासे झालें.

स्वयसेवक-सेविका श्यामबरोबर मल्हारीबाबाच्या धरीं प्रथम गेल्या तेव्हा दाराजवळच हैबती उभा होता. तो त्याच्या अगावर वसकन ओरडून म्हणाला, "आमच्या घरात या तुमच्या बामणी रीती नकोत. आम्ही बरे आहोत आपले कुणबी! खबरदार आत याल तर." इतक्यात मल्हारीबाबा व त्याची पत्नी पुढे होऊन त्यानी त्यास तेथून दूर केले आणि आपणाकडे आलेल्या स्त्री-पुरुषाचा लीनतापूर्वक सत्कार केला. हैबती त्याजवर चडफडत व दात ओठ खात तेथून निघून गेला. घरातील बहुतेक लहानमोठीं मुलें व सुना श्यामच्या शाळेत जात असता तो व त्याची बायको मात्र अजून तिजपासून पूर्ण अलिप्त राहिली होती. श्यामनें आपल्या मधुर वर्तनानें यच्चयावत् शूद्र कुटुबात जी छाप बसविली होती ती हैबतीस मुळींच पहावत नव्हती.

अलीकडे सस्थेचा चिटणीस या नात्याने श्यामने गावातील ब्राह्मण कुटुंबातही आपला प्रवेश करून घेतला होता. त्याची मुद्राच इतकी सौम्य, प्रेमळ व उमदी होती कीं, तिचा पहाणारावर प्रथमदर्शनीच अनुकूल ग्रह होत असे, आणि तो ग्रह त्याच्या मधुर भाषणाने व वर्तनाने लवकरच वज्रलेप होऊन बसे. लहान मुलाना तर थोड्याच सहवासानें त्याचा इतका लळा लागे कीं, तो घरीं येताच तीं आपल्या आयाच्या कडेवरुन त्याजकडे जाण्यास झापा टाकीत, व त्यानें त्याच्या गालांचा पापा घेतला असतां तो हातानीं पुसून न टाकितां त्याने ओठांचाही घ्यावा म्हणून तीं ते पुढे करीत. या त्याच्या पक्षपाताबद्दल त्या आयास श्यामचा राग न येतां कौतुकच वाटे. तो त्यांस आपल्या मुलाप्रमाणें किंवा भावाप्रमाणें वाटे. ब्राह्मण कुटुबांत सामान्य कुणब्याचा जितका विटाळ मानीत तितका श्यामचा मानीत नसत. तो घरच्या यजमानाबरोबर एकाच जाजमावर बसला असतां यजमानास चहा अगर पाणी घ्यावयाचें असलें आणि त्यास तें न विटाळतां घेतां यावें म्हणून श्याम जर तेथून उठून दूर जाऊं लागला तर

यजमान त्यास आग्रहानें आपल्याजवळ बसवून घेई व स्वतः पिऊन श्यामला-ही देई. त्याची चर्या, भाषा, वागणेसवरणें इतके ब्राह्मणाच्यासारखें होतें कीं, त्याचा विटाळ कां मानावयाचा याचेंच त्यास गूढ पडे. शूद्र वर्गातील एक प्रमुख इसम ब्राह्मणवर्गास इतका प्रिय वाटूं लागला या गोष्टीपासून ऐक्यवर्धक संस्थेस फार फायदा होऊं लागला. रोज संध्याकाळीं संस्थेचे स्त्री-पुरुषसभासद गोपाळरावांनीं दिलेल्या इमारतींत आपापल्या कार्याचा दैनिक अहवाल अध्यक्षास सादर करण्याकरितां एकत्र जमत, तेव्हां त्यांजमध्ये व गांवकऱ्यांमध्ये क्षुल्लक बाबींवरून लहानमोठे गैरसमज उत्पन्न झाले असल्याचें पुष्कळदा दृष्टोत्पत्तीस येई. ते नाहींसे करून दिलसफाई करण्याचे काम श्यामकडे येई, व तें तो समाधानकारक रीतीनें पार पाडी. त्यानें टाकिलेला शब्द मोडणें दोन्ही पक्षांच्या जिवावर येई, व याप्रमाणें त्याजकडून त्याची सहजासहजीं दिलजमाई होई. भांडणाऱ्या व्यक्ति स्त्रीजातीच्या असल्यास ते काम साहजिकच चिमणाताईकडे जाई; व ते तिजकडून उत्तम रीतीनें पार पडे. संस्थेच्या कार्याची प्रगति शक्य तितक्या सामोपचारानेंच घडवून आणण्यावर चालकांचा कटाक्ष असल्यामुळें तिच्या स्त्री-पुरुषसभासदांत उत्तरोत्तर सपाट्यानें भर पडूं लागली.

प्रत्येक महिन्यास संस्थेच्या इमारतींत ब्राह्मणशूद्रांचा एक मिश्र भोजनसमारंभ होई. प्रथम प्रथम त्यात भिन्नभिन्न जातींच्या संख्येइतक्याच पगती एकमेकींशीं काटकोन साधून अगर दोघीदोघींत बरेंच अंतर ठेवून चतुष्कोणाकृतींत बसविण्यात येत. पुढें पुढें चतुष्कोणाकृतीची षट्कोणा-कृति, तिची अष्टकोणाकृति याप्रमाणे होत होत अखेरीस ब्राह्मणब्राह्मणे-तरांची एकच पगत वर्तुलाकार मांडण्यांत येऊं लागली. पण उत्तरोत्तर भिन्नभिन्न जातींचा परास्परांविषयींचा वक्रीभाव कमी होत जाऊन सरळ भाव वाढूं लागला व खरा धर्म भूमितीवर किंवा महत्त्वमापनावर नाहीं हें त्यांस पटूं लागलें तसतशी एकच भली मोठी पंगत अथवा तितकी जागा नसल्यास अनेक मिश्र पंगती मराठी साम्राज्यांत खांद्याशीं खांदा भिडवून लढणाऱ्या ब्राह्मण-मराठ्यांप्रमाणें एका स्वरानें 'हरहर महादेव' पुकारूं लागल्या. प्रथम प्रथम स्वयपाक करणाऱ्या व वाढणाऱ्या बायका केवळ ब्राह्मणांच्याच असत; पण जसजशी ब्राह्मणांच्या विचारांत व

शूद्रांच्या आचारांत सुधारणा होत गेली तसतशा प्रथम कुणब्यांमाळ्यांच्या नीटनेटका पोषाख केलेल्या स्वच्छ मुली चटण्या कोशिंबिरी तयार करून व वाढून ब्राह्मण स्त्रियांना मदत करू लागल्या; नंतर नुसत्या शूद्र स्त्रिया निर्लेप फराळाचे पदार्थ तयार करून वाढूं लागल्या; आणि अखेरीस ब्राह्मण व शूद्र स्त्रिया पाकसिद्धतेंत व वाढपांत बरोबरीनें भाग घेऊन परस्परांस साहाय्य करूं लागल्या.

हे मिश्रभोजनसमारंभ सख्येच्या जागेंत होत तोंपर्यंत ते सामान्य जनतेच्या नजरेस पडत नसत; आणि ते जनतेच्या नजरेस पडल्याशिवाय त्यांजमधील अपूर्वता व अप्रियता पूर्णपणे नाहींशी होणें शक्य नव्हतें. सबब ते समारंभ आळीपाळीनें सुखवस्तु ब्राह्मणाच्या व सुखवस्तु शूद्रांच्या घरीं करण्यात येऊं लागले; आणि ज्या गोष्टी केवळ दृष्टीआड होत असल्यामुळेंच चोरटेपणाच्या व संशयित स्वरूपाच्या वाटत असत त्या आतां उजळ माथ्यानें नजरेसमोर वावरूं लागल्यामुळें निरुपद्रवी व श्लाघ्यही वाटूं लागल्या. कोणतीही गोष्ट गुप्तपणानें केल्यास तिजसंबंधानें शंकाकुशंका काढण्याला कल्पनेस जो अवसर मिळतो तो ती उघडपणे केल्यास मिळत नाहीं. प्रकाशांत घडलेल्या गोष्टीस प्रकाशाचा उज्ज्वलपणाही आपोआपच प्राप्त होतो. रस्त्यावर केलेली गोष्ट योग्य असते हा लौकिक समजच 'रास्त' शब्दाच्या उपपत्तींत गर्भित असावा. एकच गोष्ट वारंवार घडताना पाहिल्यामुळें तिच्यासंबंधानें जी परिचितपणाची किंबहुना आपलेपणाची जाणीव उत्पन्न होते ती तिच्यांतील अपूर्वता नष्ट झाल्यामुळेंच होत असते. पण हे अपूर्वतेचें मरण प्रेक्षकाच्या दृष्टीस लावण्यांत येऊन त्या गोष्टीसंबंधानें त्याची नजर मेली असें म्हणण्यात येतें. दृष्टीस एकच खाद्य वारंवार मिळाल्यानें जे हे मरण येतें त्यामुळें तिच्यांतला सारा क्षुद्रपणा नष्ट होऊन तिला दिव्यत्व येतें. चिमणपुरच्या गांवकऱ्यांस ही दिव्य दृष्टि प्राप्त होऊं लागल्यामुळें पूर्वी सवंगोलंकार म्हणून वाटणारे प्रकार आतां दैवि प्रेमानें प्रेरित झाल्यासारखे वाटूं लागले.

ब्राह्मण-शूद्रांच्या या संमेलनांनीं नुसत्या शूद्रांचाच फायदा झाला असें नाहीं; ब्राह्मणांचाही त्यांत बराच फायदा झाला. ब्राह्मणांच्या संसर्गानें शूद्रांच्या भाषेंत व आचारांत शुद्धता आली तसा शूद्रांच्या संसर्गानें

ब्राह्मणांच्या विचारांत अधिक निष्कपटपणा व प्रेमळपणा आणि आचारांत अधिक मोकळेपणा व अकृत्रिमपणा आला. त्याचप्रमाणे शूद्रांत स्त्री-पुरुषांना परस्परांशीं मोकळेपणाने बोलण्यास जी मोकळीक असते तिचेंही अनुकरण ब्राह्मणात व्हावयास लागून त्याजमधील स्त्री-पुरुषात परस्परा-विषयीं अधिक विश्वास व आदर उत्पन्न झाला. पुरुषाच्या सहवासामुळे स्त्रियास व्यवहाराचें व एकदर जगाचे अधिकाधिक ज्ञान मिळू लागले, आणि स्त्रियांच्या सहवासामुळें पुरुषाच्या भाषणात व आचरणात अधिकाधिक सभ्यपणा दिसू लागला. पिता, पति, बंधु अशा अत्यत निकट-च्या व विश्वासातल्या आप्तास बरोबर घेतल्याशिवाय स्त्रियानीं इतर पुरुषांशीं मिसळू नये असा सरधेचा नियम असल्यामुळे स्त्री-पुरुषव्यवहारात पाश्चात्यांमध्यें जो स्वैरपणा दिसून येतो त्यास फाटा मिळून त्याचे लाभ मात्र चिमणपुरकरांच्या वाट्यास येऊ लागले.

प्रकरण नववें

# भावि संकटांची छाया

प्रत्येक जातीस व व्यक्तीस स्वतःच्या हक्काच्याप्रमाणें जबाबदारीचीही जाणीव असली पाहिजे, ही श्यामच्या वडिलांची शिकवण चिमणाताईंच्या उपदेशामुळें त्याच्या अंतःकरणांत दृढमूल झाली होती. राज्यकर्त्यांनीं प्रजेस अधिकाधिक कर्तबगार बनवून त्याच्या कर्तबगारीची पूर्ण वाढ होण्यास जितका वाव देतां येईल तितका दिला पाहिजे. ब्राह्मणांनीं शूद्रांच्या भाषेत व आचारविचारांत सुधारणा करून त्यास स्वतःच्या योग्यतेचे बनविण्याच्या कामीं नेटाचे प्रयत्न केले पाहिजेत, आणि शूद्रांनीही अतिशूद्रांमध्यें सुधारणा घडविण्यास झटून स्वतःमध्यें व त्यांजमध्यें पडलेलें वैषम्य दूर करण्याचे आटोकाट प्रयत्न केले पाहिजेत. ब्राह्मण-शूद्रांमधील वैषम्यापेक्षां शूद्र-अतिशूद्रांमधील वैषम्य पुष्कळपटीनें अधिक होतें, व तें दूर करण्याचा प्रश्न ब्राह्मणांसमोरील प्रश्नापेक्षां अर्थात्च फार बिकट होता. ज्या राजकीय परिस्थितीमुळें जातींजातींमधील वैषम्यें दूर करणें अपरिहार्य होऊन बसलें होतें. तिचें ब्राह्मणांस जसें ज्ञान होतें तसें शूद्रांस नव्हतें. त्या वैषम्याच्या कृत्रिमतेची जाणीवही त्यांस ब्राह्मणांच्याइतकी नव्हती. यामुळें त्या प्रश्नाशीं झगडण्याची त्यांची पात्रताही ब्राह्मणांच्या-इतकी नव्हती. जोंपर्यंत स्वतःच्या जातीची सुधारणा करण्याचाच प्रश्न होता तोंपर्यंत हैबती व त्याचे कांहीं साथीदार यांशिवाय कोणाही शूद्राची श्यामच्या प्रयत्नांस प्रतिकूलता दिसली नाहीं. पण खालच्या जातींची सुधारणा करण्याचा प्रश्न येऊन ठेपला तेव्हां संस्थेच्या शूद्र सभासदांत चल-बिचल दिसून येऊं लागली. ब्राह्मण सभासदांनीं शूद्रांच्या सुधारणेपर्यंत यापूर्वीच मजल मारलेली असल्यामुळें त्यापुढें अतिशूद्रांच्या सुधारणेपर्यंत जाण्यास त्यांपैकीं बऱ्याचजणांची तयारी होती. परंतु शूद्रास तो प्रश्न नवीनच होता. ज्या दिवशीं चिमणाताई व श्याम यांनीं संस्थेच्या कार्या-लयांत तो प्रश्न उपस्थित केला त्या दिवशीं शूद्र सभासदांनीं त्यांस जोराचा

विरोध केला. खालील संवादावरून त्या विरोधाचें कारण व स्वरूप उघड होईल.

चिमणा०:—ब्राह्मणांनीं शूद्रांना बरोबरीच्या नात्यानें वागविण्याला जीं राजकीय, सामाजिक व धार्मिक कारणें आहेत त्यापेक्षा ब्राह्मण-शूद्रांनीं अतिशूद्रांना समतेनें वागविण्यास संख्येनें,सयुक्तिकतेने व महत्त्वाने पुष्कळच भारी कारणें आहेत. प्रथम आपण राजकीय कारणाचा विचार करू. आपण इंग्रजापाशीं स्वराज्य मागताना हिंदुस्थानचे मूळ रहिवासी आपण असून इंग्रज लोक त्यात उपटसुंभासारखे आहेत असें एक कारण देत असतों. आता आपण इंग्रजासंबंधाने जे विधान करितो तसेंच अतिशूद्रास आपणासंबंधाने करिता येणार नाहीं का ? इंग्रज जसे उपटसुंभ आहेत तसेच आपणही आहोंत. ते जसे या देशाचे मूळ रहिवासी नाहींत तसे आपणही नाहीं. अतिशूद्र हेच येथील मूळ रहिवासी आहेत; इतकेंच नाहीं, तर या देशाचे अव्वल राज्यकर्तेही तेच आहेत. आम्हीं आर्यांनीं त्यास जिंकल्यापासून त्यांची अशी अवनत दशा झाली आहे.

शूद्र सभासदः—पण आमची येथील वस्ती इंग्रजापेक्षां कितीतरीपट अधिक दीर्घ आहे.

चिमणा०:—मूळ रहिवासी कोण या प्रश्नाचा विचार करिताना उपटसुंभांच्या रहिवासाच्या दीर्घतेचा विचार करण्याचें कारण नाहीं; व तसा विचार आपण करीतही नाहीं. केला असता तर इंग्रजांचा हक्क सन १८१८ सालीं जितका होता त्याहून आतां शंभर वर्षांच्या रहिवासानें पुष्कळच अधिक झाला आहे हें आपण कबूल केलें असतें. जमिनीवर भोगवट्याचा हक्क उत्पन्न होण्यास बारा वर्षे लागतात. त्या मानानें शंभर वर्षांचा काळ किती तरी मोठा म्हटला पाहिजे. पण आपण व इंग्रज यामधील सापेक्ष हक्क कसेही असले तरी अतिशूद्रांच्या दृष्टीने आपण दोघेही उपटसुंभच आहोंत यांत संशय नाहीं. आतां हिंदुस्थानच्या या मूळ रहिवाश्यांना व राज्यकर्त्यांना आपण कसे वागवितो याचा विचार केला तर आपणास लाजेनें खालींच माना घालाव्या लागतील. आपण त्यांना रहावयास गांवाबाहेर पृथक् जागा आंखून दिली आहे; ते आमच्या वसतींत आलेच तर आमचे रस्ते व गटारे साफ करण्याकरितांच यावयाचे;

आणि त्याना आमच्याशीं बोलावयाचें झालें तर रस्त्यावर उभें राहूनच बोलले पाहिजे.

शूद्र सभासदः—पण आम्हांला इंग्रज लोक आपल्या वसाहतींतून जवळजवळ असेच वागवितात कीं नाहीं ?

चिमणा०:—जवळजवळ असे वागवितात या म्हणण्यात आपल्याइतक्या निष्ठुरपणानें वागवीत नाहींत ही कबूलीही आलीच. शिवाय ते आम्हाला ज्या देशात वाईट वागवितात तो देश त्याचा नाहीं तसा आपलाही नाहीं; पण आम्ही महारमांगाना ज्या देशात वाईट वागवितों तो मूळ त्यांच्याच मालकीचा असून आपण त्याना चार पाच हजार वर्षांपूर्वी जिंकल्या-मुळे आपल्या मालकीचा झाला. जेत्यानी जितास इतक्या प्रचंड अवधी-पर्यंत हीन स्थितींत राबविणें न्यायाचें असेल तर आपणास आणखी चार हजार वर्षेंपर्यंत तरी स्वराज्य मिळण्याची आशा करावयास नको. इंग्रजा-नीं आम्हास जिंकल्यानंतर शंभर वर्षांनीं स्वराज्य देणें रास्त असेल तर आपण चार हजार वर्षांनीं तरी जागें होऊन अंत्यजाना समान दर्जानें वागविण्यास तयार झालें पाहिजे.

शूद्र सभासदः—त्याचा हीन दर्जा त्याच्या संचिताचा परिणाम आहे. तो त्यानीं निमूटपणें मानिला पाहिजे.

चिमणा०:—हिंदु लोकांची परवशता त्यांच्या संचिताचें फळ आहे व ती त्यानीं निमूटपणें सोसली पाहिजे असें जर राज्यकर्त्यांनीं आपणाला म्हटलें तर आपण तें कबूल करूं का ? फार कशाला, आम्ही ब्राह्मणानीं तुम्हाला समतेनें वागविण्याचा संकल्प केला तेव्हा तुम्हीं स्वतःच्या संचिता-च्या आड न येण्याबद्दल आम्हाला कां बजाविलें नाहीं ? हक्काचा प्रश्न असला म्हणजे प्रयत्नवादी बनावयाचें आणि जबाबदारीचा आला म्हणजे दैववादी व्हावयाचें हा कुठला न्याय ?

शूद्र सभासदः—ताईसाहेब, हा धर्माचा प्रश्न आहे. आम्हीं ज्या महार-मांगाचा हजारों वर्षें विटाळ मानिला त्याना पंक्तिपावन करून घेऊन नरकाचें साधन कसें करावें ?

चिमणा०:—आम्हीं ब्राह्मणांनीं तुम्हांला पंक्तिपावन करून घेतलें तेव्हां तुम्हीं धर्माची सबब पुढें केली नाहीं. मग तुम्हांला धर्मनिष्ठ म्हणून तरी

कसे मानायचें! खरा धार्मिक मनुष्य स्वहिताकरितां सुद्धां धर्माची हानि पत्करीत नाही. वास्तविक पाहिले तर अत्यजांसुद्धां सारे जीव एकाच परमात्म्याचीं स्वरूपें आहेत हे उपनिषदांत व गीतेत प्रतिपादिलेले तत्त्व ज्या उदात्त धर्माचें आहे तोच खरा हिंदु धर्म असून कृत्रिम चातुर्वर्ण्यात्मक धर्म त्यावर साचलेला धुरळा आहे आणि सम दृष्टीच्या व न्यायी ईश्वराच्या सृष्टीत हा इंग्रज व हा हिंदु हा राजकीय भेद जसा नाहीं तसा हा ब्राह्मण, हा शूद्र, हा अत्यज हा धार्मिक भेदही नाहीं हे माझ्या मनोदेवतेला जसे पटते तसे तुमच्याही मनोदेवतेला पटत आहे. नाहीं तर आम्ही तुमच्या हातचे पाणी प्यायला लागलो तेव्हाच तुम्ही आम्हाला हरकत केली असती. माझे म्हणणे इतकेंच कीं, तुम्ही ब्राह्मणाशी वागताना जसे आपल्या मनोदेवतेला जागलात तसे अत्यजाशी वागतानाही जागा. तसे पाहिले तर अत्यजांशी सहानुभूति दाखविणे आणि सहकार्य करणे हे तुमच्याही फायद्याचे आहे.

शूद्र सभासदः—ते कसे?

चिमणा०:—अत्यज या देशाचे मूळ रहिवासी हे जसे कांही ग्रंथकर्त्यांचे मत आहे तसे शूद्र हे मूळ रहिवासी आहेत असे दुसऱ्या कित्येकांचे मत आहे; व ज्या युक्तीच्या आधारे तुम्ही अत्यजाना दूर ठेवू पाहतां ती युक्ति तुमच्यावरच उलटण्याची भीति आहे.

शूद्र सभासदः—आम्ही मूळचे रानटी लोक आणि आम्हाला आर्यांनीं जिंकले! अशक्य! अगदी अशक्य!

चिमणा०:—तुम्ही जर मूळचे लोक नाही तर ब्राह्मणादि तीन जातींनीं स्वतःकडे सर्व हक्क ठेवून तुम्हाकडे नुस्ती सेवावृत्ति देणे शक्य तरी कसे झाले! जित व जेते यामधील ती एक तडजोड होती याशिवाय त्याचे सयुक्तिक कारण देतां येणार नाही.

शूद्र सभासदः—तर मग आम्ही आणि अत्यजांनी परस्परांशी ऐक्य घडवून आणावे असे तुमचे म्हणणे?

चिमणा०:—तुम्हीं अत्यजाशीं आणि ब्राह्मणादि उच्च म्हणविणाऱ्या जातींनीं नीच मानलेल्या जातीशीं एकोपा केला तर स्वराज्य मिळण्याला मुळींच उशीर लागणार नाही. तसा एकोपा न करितां आपण उदासीन

राहू अगर परस्परांवर जातिभेदमूलक कृत्रिम वर्चस्व मिरवीत बसू तर सध्यां आपल्या समाजाचा जो ऱ्हास चालला आहे त्याची गति वाढत जाऊन आपण थोड्याच काळात नामशेष होऊ. अत्यजांबद्दल आपण उदासीन राहिल्यामुळे ते किती सपाट्याने ख्रिस्ती होत आहेत याचा तुम्ही विचार केला आहे का? आपला उदासीनपणा ख्रिस्ती पाद्र्यांच्या आयताच पथ्यावर पडला. त्यांनी त्याना जवळ केले, त्याना पोटास अन्न दिले, त्याच्या शिक्षणाची सोय केली.

शूद्र सभासद:—हे त्यांनी कोणत्या हेतूने केले हे नको का पहावयाला?

चिमणा०:—त्यांनी त्यांच्या शरीराचे आणि मनाचे पोषण दुष्ट बुद्धीने केले आणि आपण त्या दोहोंची उपासमार धर्मबुद्धीने करीत होतो इतकी बारकाई करण्यापुरती तर्कशक्ति तरी आपण त्याना कुठे राहू दिली आहे? आपण त्यांच्या जागी असतो तर आपणासही ते तत्त्वज्ञान पटले नसते.

शूद्र सभासद:—आम्ही त्यांच्या उत्कर्षाच्या कधीही आड आलो नाही, आम्ही कधी त्यांच्या तोंडचा घास काढून घेतला नाही किंवा ते शाळेत जाऊ लागल्यास त्याना मनाही केले नाही.

चिमणा०:—त्याचे कारण इतकेच की, तसे केले असते तर तुम्ही सरकारचे गुन्हेगार ठरला असता. त्यांच्या तोंडात घास पडतो की नाही याची चौकशी करण्याइतकी तुम्हीं त्याजबद्दल कधी सहानुभूतिच बाळगिली नाही, तर तुम्ही त्यांच्या तोंडचा घास तरी कुटून काढून घेणार? विद्येबद्दल म्हणाल तर त्याना अध्ययनाचा अधिकार नाही अशी जी वरिष्ठ वर्गातल्या शास्त्रकारांनी त्यांची व इतरांची समजूत करून ठेविली आहे तीच मुळीं त्यांच्या विद्यासंपादनाच्या मार्गात एक मोठी थोरली धोंड आहे. ती दूर करणें आमचे कर्तव्य आहे. ते न करिता आम्ही तटस्थ राहतो, इतकेंच नाहीं तर एखादा अत्यजाचा मुलगा शाळेत येऊ लागला तर त्याला वर्गात आपल्या मुलांच्या बरोबरीने बसू न देतां वर्गाबाहेर बसवितो! इतकें होऊनही त्यांना आपलेपणाने वागविणारे ख्रिस्ती लोक जर त्यांना आपले हितकर्ते वाटूं लागले तर घुस्सा करण्याची आमची तयारीच! याला काय म्हणावे!

शूद्र सभासदः—त्या जाती जन्मतःच बुद्धिमंद. त्यांना शिक्षण दिलें तरी त्याचा मोठासा उपयोग होणार नाहीं. धड शिक्षणही नाहीं व धड मूळचा धंदाही राहिला नाहीं अशी अर्धवट मात्र त्याची स्थिति व्हावयाची.

चिमणा०:—इथे तुम्ही चुकता. त्यांच्यातलीं किती तरी माणसें तुम्हांआम्हाइतकीं हुशार दिसून येतील. ख्रिस्ती झालेल्या अंत्यजातून शिक्षण घेऊन पुढे आलेले थोडे का सापडतील ! त्यांना आपलेपणानें शिक्षण देण्याचीच काय ती खोटी आहे. 'ब्राह्मण आणि त्याची विद्या' या ग्रंथात प्रतिपादिलेला सिद्धांत जर खरा असेल तर ब्राह्मणादि साक्षर जातींच्या माणसाचे मेंदू आजपर्यंत विद्याध्ययनाच्या एकाच व्यवसायात गुंतून राहिल्यामुळे अंत्यजाच्या पडीत पडलेल्या मेंदूपेक्षा निःसत्त्वच झाले असले पाहिजेत; व म्हणून त्यानीं त्यास यापुढे कृषिकर्मासारख्या इतर व्यवसायात गुंतवून विद्याध्ययनाचें काम अंत्यजाकडे दिलें पाहिजे. न दिल्यास त्यांचा अंत्यजाबद्दलचा आपलेपणा न दिसता स्वतःचा आपलपोटेपणा मात्र दिसून येईल.

शूद्र सभासदः—वरिष्ठ जातींच्या लोकाना त्यांच्याबद्दल ख्रिस्त्यांपेक्षा तरी खास आपलेपणा वाटतो.

चिमणा०:—वाटत असेल; पण बाहेर दिसत नाहीं तर त्याचा उपयोग काय ? त्याना स्वतःच्या मुलाबद्दल वाटत असणारा आपलेपणा जसा व्यक्त होतो तसा तो होतो का ! तीं मुलेंही प्रथम प्रथम शाळेंत जाण्याला अंत्यजाप्रमाणेंच नाखूष असतात. पण ते त्यांना शाळेंत घालतातच कीं नाहीं ! आपण त्यांना शाळेंत जाण्याला मनाई करीत नाहीं येवढ्यावरच संतुष्ट नाहीं ना रहात ? याचें कारण इतकेंच कीं त्याना मुलाबद्दल आपलेपणा वाटतो व अंत्यजांबद्दल वाटत नाहीं. पण मी म्हणते, त्याना त्यांच्याबद्दल आपलेपणा जरी वाटत नसला तरी त्यानीं त्यांना आजपर्यंत अज्ञानांत डांबून ठेविल्यामुळे व ते ज्ञानास पात्र नाहींत अशी त्याची खोटी समजूत करून दिल्यामुळें ती समजूत नाहींशी करून त्यांना सज्ञान करण्याची त्याजवर मोठी जबाबदारी आहे, व ती त्यांनीं वाटेल तें करून पार पाडिली पाहिजे. एखाद्याला हाताने विहिरींत ढकलायचें आणि त्याला तिच्यांतून वर येण्याला साहाय्य न करितां आपण त्याला

प्रतिबंध करीत नाहीं अशी कोरडी फुशारकी मारावयाची, यांत आपल-पणाही नाहीं व कर्तव्यपालनही नाही.

शूद्र सभासदः––त्यांची वस्ती घाणेरडी व ओंगळ नसती तर आम्ही त्यांच्या घरीं जाऊन शाळेत येण्याला त्यांचें मन वळविलें असतें. ज्या जातींतील लोक इतर जातींतील लोकांचे उष्टें खरकटें खातात आणि त्यांचें मलमूत्र काढितात त्या जातीशीं मिसळायला इतर जातींना खंत नाहीं का वाटायची ?

चिमणा०:––तुमच्या बायकांमुलांनी तुमचें उष्टें खाल्लें किंवा तुमच्या आयांनीं तुमचें मलमूत्र काढिलें तर त्याची तुम्हांला खंत वाटत नाही. मग एका वर्गानें दुसऱ्याचें उष्टें खाल्लें किंवा मलमूत्र काढिलें तर त्याची खंत त्या दुसऱ्या वर्गास का वाटावी ? बायकामुलांबद्दल वाटणारें प्रेम किंवा आयाबद्दल वाटणारा आदर वाटला नाही तरी बंधूबद्दल वाटणारा स्नेहभाव वाटण्यास तरी हरकत नसावी. गलिच्छ वस्तींत ओंगळ रीतीनें रहाण्याची अस्पृश्यांना हौस का होती ? तुम्हींच त्यांना गांवाबाहेर रहाण्याला भाग पाडिलें आणि स्वच्छ रहाणीची व त्याची दृष्टभेटही होऊं दिली नाहीं; आणि वर तुम्हीच ओरड करिता की ते गलिच्छ वस्तींत व ओंगळवाणी रहातात म्हणून ! चमत्कार आहे ! आम्हां ब्राह्मणांनीं तुम्हांला सुधारण्याचें मनावर घेण्यापूर्वीं तुम्ही स्वतः कितपत स्वच्छ होतां ! सहवासानें तुम्ही जर सुधारूं शकतां तर त्यांनी तरी कां सुधारूं नये ?

शूद्र सभासदः—त्यांनी रस्ते झाडण्याचें आणि गटारें साफ करण्याचें सोडून दिलें म्हणजे ती कामें करावयाची कोणी ?

चिमणा०:—हा प्रश्न करणें म्हणजे तुम्हांला स्वराज्य मिळाल्यावर कारकुनी कोणीं करावयाची असा राज्यकर्त्यांनी सवाल करण्यासारखेंच आहे. "आम्हांला प्रथम स्वराज्य मिळू द्या, म्हणजे कारकुनीच्या कामाची वांटणी तुम्हाआम्हांमधील योग्य माणसांत करण्यास फारशी अडचण पडणार नाही." असा आपण जसा त्यांना रोकडा जबाब देऊं तसा अंत्यजांनाही आम्हांला जबाब देतां येईल, की "आम्हांला प्रथम समतेने वागवूं लागा, म्हणजे घाणेरड्या धंद्यांचा प्रश्न तुम्ही व आम्ही मिळून समेटानें सोडवूं. आपणा उभयतांमधील त्या कामाला लायक

अशीं माणसे तरी शोधून काढू किंवा प्रत्येक मनुष्यानें व कुटुंबानें आपापल्यापुरती स्वच्छतेची तर्तूद करावी असा निर्बंध तरी करू. कदाचित् दोहीपैकी एकही जातीला घाणेरडे काम करावें लागणार नाहीं अशी रासायनिक किंवा यांत्रिक युक्तिही मागेपुढें निघण्याचा संभव आहे. पण तुम्हा स्वतःस स्वच्छ रीतीनें राहता यावें हे इतरांना नरकवासांत डांबून ठेवण्याला पुरेसें कारण नाहीं.

शूद्र सभासदः--त्यांना आमच्या वस्तींत राहू देणें शक्य तरी आहे का ? मुंबईसारख्या नकाली शहरांत एकाच चाळींत अठरापगड जातींचे लोक राहिले तरी खपतात; पण येथें अगदी निराळा प्रकार आहे. सोनारआळी, सुतारआळी, लोहारआळी, माळीपुरा, हमालपुरा असे निरनिराळ्या जातींचे निरनिराळे मोहल्ले आहेत. एका जातीच्या मोहल्ल्यांत दुसऱ्या जातीचें एक घर जरी आलें तरी त्याचा एकजिनसीपणा बिघडून जाईल. तें घर येऊं देण्याला त्या मोहल्ल्यातील जातीची परवानगीच मिळायची नाही मुळीं; आणि तें घर महाराचें असलें म्हणजे तर विचारावयासच नको !

चिमणा०:--तुमचें म्हणणें खरें आहे. हा एकजिनसीपणाच आम्हाला नडतो आहे. त्यानें प्रत्येक जातीचें वैशिष्टय व पृथक्‌पणा कायम राहून एकंदर समाजाचें ऐक्य होण्यास प्रतिबंध होतो. मुंबईस एका चाळींत अनेक जाती रहात असल्यामुळें जातिभेदाची तीव्रता फारच कमी झालेली आहे. येथेंही तसेंच झालें पाहिजे. प्रत्येक मोहल्ल्यात मधून मधून महार-मांगाचीं दोनदोन चारचार घरें पेरिल्यास त्यांचें व आपलें संघट्टन वाढून लौकरच ऐक्यही घडून येईल.

शूद्र सभासदः--तें मला तरी शक्य दिसत नाहीं.

चिमणा०:--धरणीकंप होऊन महारवाड्यांतील घरें आपल्या वस्तींत येऊन पडल्याशिवाय हिंदु समाजाचें ऐक्य होण्याची आशाच नाहीं तर ? बरें, स्पृश्य वस्तींत अस्पृश्यांचीं घरें वसविण्याचा प्रश्न अशक्यतेच्या सबबीवर बाजूला ठेवू. निदान प्रत्येक ऐपतदार स्पृश्य कुटुंबानें आपल्या घरीं अस्पृश्य जातीचा एकएक नोकर ठेवणें तरी शक्य होईल कीं नाहीं ?

शूद्र सभासदः--तेंही मला तितकेंच अशक्य दिसतें.

चिमणा०:--कां बरें ? स्पृश्य वस्तींतील प्रत्येक घरीं एखादा भयंकर

रोगाच्या सांथीनें कुटुंबातील सारीं माणसें अंथरुणाला खिळविलीं आणि त्याची शुश्रूषा करावयाला अस्पृश्यावाचून कोणीही मिळण्यासारखे नसलें तर तेंही शक्य आहे.

श्याम हा संवाद एकाग्र चित्तानें ऐकत होता. चिमणाताईचा युक्तिवाद त्याला इतका पटला कीं तिचें शेवटचें भाषण ऐकून तो तावडतोब उद्गारला, "ताईसाहेब, कोणताही ईश्वरी क्षोभ होण्यापूर्वीं आम्ही आपण होऊनच एक होऊं. काहीं महिन्यापूर्वी ब्राह्मणशूद्रांचें इतकें एकीकरण होईल असें तरी कोणाला वाटलें होतें? आणखी काहीं महिन्यांनीं–कदाचित् वर्षांनीं–अंत्यज व अंत्यजेतर यामधील बंधुभावाचा चमत्कारही पहावयास मिळेल. आम्हीं आपली जबाबदारी ओळखून आपलें कर्तव्य केलें पाहिजे इतकेंच काय तें."

अंत्यजाचीं घरें आपल्या मोहल्ल्यांत घेण्याची व अस्पृश्यास नोकर ठेवण्याची कोणकोणाची तयारी आहे याबद्दल चौकशी करण्यास दुसऱ्या दिवसापासून सुरवात झाली. ऐक्यवर्धक संस्थेच्या ब्राह्मण व शूद्र सभासदापैकीं बऱ्याचजणांची त्या गोष्टीस अनुकूलता होती. ब्राह्मणपैकीं भिक्षुकवर्गाची व शूद्रापैकीं हैबतीसारख्या काहीं असंतुष्ट व्यक्तींची मात्र तिला पूर्ण प्रतिकूलता दिसून आली. भिक्षुकवर्गात अजून जुन्या मताचेंच वर्चस्व होतें. गोपाळरावाच्या वजनामुळें आणि चिमणाताईच्या व श्यामच्या प्रेमळ हट्टामुळें त्या वर्गाची पुराणप्रियता काहींशी दबून गेली होती, आणि तो गावांत चाललेले भ्रष्टतेचे व अनाचाराचे प्रकार डोळ्यांवर कातडें ओढून मुकाट्यानें पहात होता. पण अस्पृश्य बिऱ्हाडांना व नोकरांना थारा देण्याची सूचना पुढें येतांच त्या वर्गाच्या पुराणप्रियतेवर बसलेली राख उडून गेली, आणि त्यानें त्या सूचनेस जोराचा विरोध केला. हा वर्ग जसा अस्सल ब्राह्मण्याचा कट्टा कैवारी होता तसा हैबतीचा पक्ष अस्सल ब्राह्मणद्वेष्ट्यांचा बनलेला होता. जे शूद्र ऐक्यवर्धक संस्थेचे सभासद झाले होते त्यास हा पक्ष 'ब्राह्मणाळलेले' या संज्ञेनें हिणवीत असे. या पक्षाचा व भिक्षुकवर्गाचा इतर बाबतींत कितीही विरोध असला तरी त्यांमध्यें अंत्यजांना दूर ठेवण्यांत पूर्ण एकवाक्यता होती. अशा महत्त्वाच्या बाबतींत सर्व गांवकऱ्यांच्या संमतीशिवाय कोणतीही क्रान्तिकारक योजना अमलांत

आणणें इष्ट नव्हतें. सबब तूर्त अत्यजोद्धारासबंधानें समाजांत व्याख्यानां-च्या व वादविवादांच्या द्वारें जागृति करण्याचें अप्रमुख काम हातीं घेण्याचेंच सत्येस ठरवावें लागलें.

पण या सुमारास प्रागतिक चळवळींपेक्षां प्रतिगामी स्वरूपाच्या चळ-वळींसच जोर येण्यासारखी परिस्थिति उत्पन्न होऊं लागली. हिंदुस्थानानें महायुद्धांत राज्यकर्त्यांस केलेल्या साहाय्याचें बक्षीस म्हणून त्यास स्वराज्याचा पहिला हप्ता देण्याचें घाटत होतें, व त्यासंबंधानें लोकमत अजमावून त्याचें स्वरूप नक्की करण्याकरितां खुद्द भारतमंत्री या देशास भेट देणार होते. तें पाहून भिन्न भिन्न जातींच्या तोंडांस पाणी सुटलें, व राजकीय हक्कांचा शक्य तितका मोठा वाटा पदरांत पाडून घेण्याबद्दल त्यांजमध्यें तीव्र अहमहमिका सुरू झाली. एकंदर लोकसंख्येच्या मानानें ब्राह्मणवर्ग जरी अल्प होता तरी ज्ञानानें, अधिकारानें व वजनानें तो इतर जातींना भारी होता. अशा स्थितींत स्वराज्याचे हक्क मिळाल्यास त्यांचा फायदा फक्त ब्राह्मणानाच मिळेल या सकारण अगर अकारण भीतीनें इतर जातींनी 'ब्राह्मणेतर' या नांवाचा एक नवाच पक्ष निर्माण केला. ब्राह्मणांच्या धार्मिक वर्चस्वास विरोध करणारा 'सत्यशोधक' समाज बऱ्याच वर्षांपूर्वींपासून अस्तित्वांत आला होता. पण त्यास हा वेळ-पावेतों विशेष जोर आलेला नव्हता. त्या समाजाच्या थोर उत्पादकाचा मूळ हेतु ब्राह्मणास वर्णगुरु या नात्यानें इतर जातींवर जें वर्चस्व प्राप्त झालें होतें तें नष्ट करून त्या जातींच्या प्रगतीचा मार्ग मोकळा करणें हा होता; व त्यांत कांहीं वावगेंही नव्हतें. कारण आपण ब्राह्मणांपेक्षां हीन ही भावना नष्ट झाल्याशिवाय इतर जातींस ब्राह्मणांची ज्ञानादि बाबतींत बरोबरी करणें शक्य नव्हतें. ती हीनतेची भावना नष्ट करण्याचे दोन मार्ग होते. विद्येत व संस्कृतींत ब्राह्मणांची योग्यता इतर जातींच्या अंगीं आणणें हा एक मार्ग, व ब्राह्मणाची योग्यता इतर जातींच्या लोकांच्या-इतकीच आहे असा त्या जातींत ग्रह उत्पन्न करणें हा दुसरा मार्ग. यां-पैकीं पहिला मार्ग अधिक श्रेयस्कर असून दुसराही वावगा नव्हता. यांशिवाय ब्राह्मण जात सर्व जातींत नीच आहे असा ग्रह उत्पन्न करणें हा तिसराही एक मार्ग मोकळा होता. या मार्गांस अनुक्रमें उत्तम,

मध्यम व अधम म्हणतां येईल. 'सत्यशोधक'समाजानें हा वेळपर्यंत बहुधा पहिला व क्वचित् दुसरा मार्ग स्वीकारिला होता. पण ते मार्ग तिसऱ्या मार्गापेक्षा कितीही श्रेष्ठ असले तरी बरेच अडचणींचे व दिरंगाईचे होते; आणि हल्लीं तर विलंब मुळींच खपण्यासारखा नव्हता. 'ब्राह्मणेतर'पक्ष संख्येनें व संघटनेनें शक्य तितक्या शीघ्रतेनें प्रतिपक्षास भारी करणें आवश्यक होतें, आणि त्याकरितां त्या पक्षातील अदूरदर्शी व उतावळ्या स्वभावाच्या नेत्यास तरी तिसऱ्या मार्गाचाच अवलंब करणें भाग पडलें असावें. ते कसेंही असले तरी ब्राह्मणांविरुद्ध एक मोठी चळवळ सुरू होऊन त्यांचा पाडाव करण्याचे प्रयत्न जारीनें सुरू झाले ही गोष्ट मात्र खरी. या प्रयत्नांपैकीं बहुतेकांचा रोख सर्व ब्राह्मण, विशेषेकरून भिक्षुक व कुळकर्णी अत्यंत नीच आपमतलबी व दुष्ट आहेत असें व्याख्यानांच्या व तमाशांच्या द्वारें ठसविण्याकडे होता. हें विधान अगदींच मिथ्या होतें असें नाहीं. हातीं असलेल्या सत्तेचा उपयोग करण्यापेक्षा दुरुपयोग करण्याकडेच मनुष्याची स्वाभाविक प्रवृत्ति असते या नियमास पाटील जसे अपवाद नव्हते तसे भिक्षुक व कुळकर्णी हेही नव्हते. आपली धार्मिक व राजकीय सत्ता गाजवितांना त्यांच्या हातूनही कधीं कधीं निंद्य प्रकार घडून येत. परंतु 'सत्यशोधकां'कडून त्यांचें जें भडक रंगांत चित्र रंगविण्यात येई त्यास शोभण्यासारखे राक्षसी वृत्तीचेही ते नव्हते हें त्यांच्या शत्रूंसही कबूल करावें लागलें असेल. असो. या चळवळीची लाट चिमणपुरापर्यंत येऊन पोंचली. त्या गांवांत ऐक्यसाधक समाजानें उपर्युक्त मार्गांपैकीं पहिला स्वीकारलेला असल्यामुळें राष्ट्रांत असंतोषास फारशी जागा राहिली नव्हती. किंबहुना त्यांच्या सुधारणेंत ब्राह्मणांनींच विशेष पुरस्कार घेतल्यामुळें त्यांस त्यांच्या बद्दल अनादर वाटणें शक्य नव्हतें. चिमणाताईस तर ते एखाद्या देवते-प्रमाणें मानीत. त्यांचा नायक श्याम यास तिजबद्दल जें आदरयुक्त प्रेम वाटत होतें तेंही संसर्गानें त्यांच्या अंगीं संचरू लागलें असल्यास नवल नाहीं. तिचा प्रत्येक बुद्धिवाद त्यांस पटूं लागला होता. तिनें तयार केलेल्या मनोभूमिकेंत ब्राह्मणद्वेषाचें बीं रुजून सफल होणें शक्य नव्हतें. तथापि त्याच्या बीजारोपणास अनुकूल अशी मनोभूमि चिमणपुरात मुळींच मिळण्यासारखी नव्हती असेंही नाहीं. हैबती व त्याचे विघ्नसंतोषी सोबती श्यामवर

सारखे जळत असून त्याजवर आपला सूड उगविण्याकरिता अनुकूल संधीचीच वाट पहात होते. 'सत्यशोधक' समाजाने आपले प्रचारक चिमण-पुरास पाठविले तेव्हा ते दैवतांच्या कपूस देवदूतांप्रमाणेच वाटले. त्यांज-कडून त्यांनी त्यांच्या सर्व शेलक्या युक्त्या हस्तगत करून घेतल्या, आणि त्यांचा प्रयोग ऐक्यवर्धक समाजाच्या ब्राह्मण व शूद्र सभासदावर करण्यास सुरवात केली. श्यामचा अपमान करण्याची संधि तर ते एकही वाया जाऊं देत नसत. तो रस्त्याने त्याच्याजवळून जाऊ लागला म्हणजे त्यास ऐकू जातील अशा बेताने ते त्यास उद्देशून 'बामणाळलेला', 'बामणाच्या पोटचा' अशा शब्दाचा उच्चार करीत. त्या शब्दात किती खोल अर्थ भरलेला आहे हें त्याजपेक्षा श्यामलाच माहीत असल्यामुळे तो ते ऐकून नुसता हसे. त्या हसण्याचा परिणाम आगींत तेल ओतल्यासारखा होत असे.

अलीकडे श्यामचें गोपाळरावाच्या घरीं संस्थेच्या कामानिमित्त वरचेवर जाणें येणें होऊ लागलें. तो गोपाळराव व चिमणाताई याच्याशीं जसा घटका घटका बोलत बसे तसा राधाबाईशींही बसे. त्या त्यास दर खेपेस कांहींना कांहीं तरी गोडधोड खाण्यास देत. पहिल्या दोन तीन खेपास त्याने त्याचा मुकाट्याने स्वीकार केला. पण पुढे त्यास ते घेताना संकोच वाटू लागला. तो म्हणाला, "काकू, तुम्ही मला खास बिघडवून टाकणार. आम्हां कुणब्याना जर असें रोजच्या रोज गोड खायला मिळू लागलें तर आमची रोजची चटणीभाकर आम्हांला गोड कशी लागावी?" त्यावर राधाकाकूंनी म्हटलें, "रोज तेंच तेंच अन्न खाऊन कंटाळा येतो म्हणून तर त्यांत पालट केला पाहिजे. मी तुमच्या संस्थेची चिटणीस नाहीं म्हणून जर तुम्हांला माझ्या हातचें गोड लागत नसेल तर तेंच चिमणीच्या हातून देवविते म्हणजे झालें ना? खरें सांगू तुम्हांला? मला तुमच्याकडे पाहिलें म्हणजे माझ्या एका नातेवाइकाची आठवण होते. कुठें बिचारा तुकडे मोडीत पडला आहे कुणास ठाऊक!" बिचाऱ्या श्यामला पुढें आलेल्या पदार्थांचा निमूटपणें स्वीकार करावा लागला.

दिवाळीचा सण आला. चारी दिवस वाड्यांतच फराळाला व जेवाय-ला येण्याबद्दल गोपाळरावांनीं व राधाबाईंनीं श्यामला खूप आग्रह केला. पण "मल्हारीबाबांच्या घरचें आमंत्रण मी आधींच घेऊन चुकलों आहे."

असे म्हणून त्याने नकार दिला. तथापि "एकदा तरी तुमचें जेवण आमच्या-कडे झालेंच पाहिजेत." या त्याच्या म्हणण्यास तो नाइलाजानेंच कबूल झाला. पहिले तीन दिवस तो वाड्याकडे फिरकलाच नाही. भाऊबिजे-च्या दिवशीं संध्याकाळीं तो राधाबाईसमोर अचानक येऊन उभा राहिला आणि म्हणाला. "काकू, आज मला चिमणाताईकडून ओवाळून घ्यायचे आहे, आणि आजचा फराळही मी येथेच करणार." चिमणाताई प्रफुल्लित अंतःकरणानें फराळाच्या सिद्धतेस लागली. तो तयार झाल्यावर गोपाळरावांनी व श्यामने एका पंक्तीस बसून त्याचें सेवन केलें. वाढण्याचें काम चिमणाताई स्वतःच करीत होती. फराळानंतर श्यामकरितां एक निराळा पाट मांडण्यां-त येऊन ओवाळण्याची तयारी झाली. चिमणाताई व श्याम नात्यानें बहीणभावंडें असली तरी जगाच्या दृष्टीनें अगदीं परकीं, इतकेंच नाहीं तर भिन्न जातींचींही होतीं. परंतु आम्हामध्यें नात्यांतील बहिणीला जसा ओवाळणीचा हक्क प्राप्त होतो तसें ओवाळणीनेंही बंधुभगिनीचें नातें प्राप्त होत असत, व तें सख्ख्या बहीणभावंडांमधील नात्याइतकेंच पवित्र मानण्यात येतें. रजपुतांत रक्षाबंधनानें उत्पन्न झालेलें बहीणभावंडांचें नातें जितकें पवित्र असतें तितकेंच आम्हा दक्षिणी लोकांत भाऊबिजेच्या ओवाळणीनें उत्पन्न झालेलें नातें असतें. रक्षाबंधनाच्या विधीनें रजपूत स्त्रियांचे धर्मबंधु बनलेले मुसलमान बादशाहा त्या नात्यास इमानानें जागल्या-चीं उज्ज्वल उदाहरणें जशीं इतिहासांत सांपडतात तशीं ओवाळणीनें निर्माण केलेले धर्मबंधु आपल्या धर्मभगिनींशीं सख्ख्या बहिणीप्रमाणें वागल्याचींही सांपडतील. भिन्नभिन्न जातींमधील स्त्रीपुरुषांत हें मानीव नातें उत्पन्न करण्याचा प्रघात जर मोठ्या प्रमाणावर सुरू होईल तर व्यास-पीठावर उभा राहिलेल्या वक्त्याच्या 'प्रिय बंधुभगिनींनो' या शब्दांनीं उत्पन्न होणाऱ्या नात्यापेक्षां सहस्रपटीनें अधिक जिव्हाळा त्यांजमध्यें निर्माण होऊन समाजाच्या एकीकरणास चांगलीच मदत होईल. चिमणाताई हातांत ओवाळणीचें ताट घेऊन श्यामच्या कपाळास कुंकू लावू लागली त्या वेळीं उभयतांच्या मनांत यासारखेच विचार घोळत होते. ओवाळणें संपतांच श्यामनें ताटांत एक कागदाची पुडी टाकिली. चिमणाताई ती उघडून पहाते तों त्यांत तेजस्वि मोत्यांच्या कुड्यांची एक जोडी दिसली.

"पाहूं दे कसली ओवाळणी आहे ती !" असे म्हणून राधाबाईने ती बारकाईने पहाण्यास मागून घेतली, तोंच चिमणाताईस पुडीच्या कागदावर पेन्सिलीने लिहिलेल्या कांहीं ओळी दिसल्या. तारांतील निरांजनाच्या प्रकाशात वाचून पहातां तिला अस्पष्ट अक्षरांनी लिहिलेले खालील आशयाचे पत्र दिसले:—

प्रिय चिमणाताई,

बंधूचा जन्मसिद्ध हक्क जगासमोर उजळ माथ्यानें बजाविता यावा म्हणून स्वतःहून दिवे ओवाळून घेण्याचा हा अतिप्रसंग करीत आहे; त्याची क्षमा कर. या परदेशी अभागी जीवाला तू घरच्याप्रमाणेच वाटावयास लाविलेस, हा तुझा उपकार फेडावयाची संधि दैवयोगाने पुढे मागे आल्यास तुझ्यासाठी माझा प्राणही खर्च करण्यास मला आनंद वाटेल. माझ्या शुद्ध वृत्तीचा निदर्शक अशा शुभ्र मोत्यांची कुडी तुला ओवाळणी म्हणून अर्पण करीत आहे. ती तू नेहमी वापरल्यास माझ्या हेतूच्या शुद्धतेविषयीं तुझी खात्री आहे असे मी समजेन.

तुझा बंधु
**श्याम**

"कुड्याकडे पहावयाचे सोडून कागदाकडेच काय पहात उभी राहिलीस ? धाडरट कुठची ! मोती पाहिलेस का किती पाणीदार आहेत तो ? अरेरे ! उभ्या दिवाळीत इकडे न फिरणाऱ्यासारखे माणसाचे काम इच होते वाटते ? आम्हां अडाण्यांना हे कसे कळणार ? घे बाई ही. चांगली संभाळून ठेव. कानांत कशी काय दिसतात ते उद्यां पहाता येईल." "उद्यां कशाला ? आताच घालतें की !" असे म्हणून चिमणाताईने श्यामकडे सस्मित मुद्रेने पहात कुडी कानात घातली. यानंतर बराच वेळ आनंदाने गप्पागोष्टी झाल्यावर श्याम घरी निघून गेला.

चिमणाताई माहेरीं येण्यापूर्वी नुकताच तिच्या नवऱ्याने वकिलीचा धंदा सुरू केला होता. त्याचे कांहींसे बस्तान बसतांच तिने सासरीं जावें व उभयतांनीं संसार थाटावा असे त्या उभयतांमध्ये ठरलें होते. नाताळापूर्वी त्याचे गोपाळरावांस पत्र आले; त्यात त्याने आपला जम थोड्या

दिवसात चांगलाच बसल्याबद्दल व नाताळांत राष्ट्रीय सभेस जाऊन परत आल्यानंतर बायकोस नेण्याचा आपला मानस असल्याबद्दल लिहिलें होतं. त्या पत्रास गोपाळरावांनीं जें उत्तर पाठविलें त्यात त्यांनीं चिमणाताईस संक्रांतीनंतर रवाना करण्याचा आपला हेतु कळविला. तिची सासरीं जाण्याची वेळ जसजशी जवळ येत चालली तसतशी श्यामला व संस्थेच्या इतर सभासदांस हुरहुर वाटू लागली. तिचा गावकऱ्यांत झालेला अवतार त्यास विद्युल्लतेच्याप्रमाणें क्षणिक पण उज्ज्वल व चिरपरिणामी वाटत होता. तिनें त्यांचीं चित्तें आकर्षून व दिपवून टाकिलीं होतीं आणि पाषाणतुल्य चातुर्वर्ण्यावर आघात करून त्यांतून प्रेमाचा झरा वहावयास लाविला होता. ब्राह्मण-आळींत तिला बाळपणापासून ओळखणारे अनेक होते. पण कुणब्यामाळ्यांना तिचें चरित्र आकाशाच्या उदरांतून निघालेल्या व पृथ्वीच्या उदरात गडप होऊं पहाणाऱ्या विजेच्याप्रमाणेंच रहस्यमय वाटत होतें. ती निघण्याच्या आधल्या दिवशीं ऐक्यवर्धक संस्थेनें एक जाहीर सभा बोलाविली. त्या सभेंत तिनें संस्थेच्या कार्यास सर्व प्रकारची मदत करण्याची श्रोत्यांना विनंती केली. तिनें अस्पृश्यासंबधानें होत असणाऱ्या अन्यायाचें इतकें विशद आविष्करण केलें कीं, अत्यजांनीं स्वच्छतेच्या बाबतींत सुधारणा केल्यास त्यांना इतःपर अस्पृश्य न मानितां शूद्रांइतकेच स्पृश्य समजावयाचें असा एक ठराव त्याच सभेंत सर्वानुमतें मान्य करण्यांत आला. सभेच्या शेवटीं गावकऱ्यांचा निरोप घेतांना तिनें जें हृदयद्रावक भाषण केलें त्यानें श्रोत्यांचे कंठ सद्गदित होऊन त्यांच्या नेत्रांवाटे अश्रुधारा वाहूं लागल्या. अखेरीस खुद्द व्याख्यात्रीचाच कंठ रुद्ध झाल्यामुळें तिला आपलें भाषण आटोपतें घ्यावें लागलें.

त्याच दिवशीं रात्रीं तिनें श्यामच्या शाळेस भेट देऊन तेथील विद्यार्थ्यांचा निरोप घेतला. त्या सर्वांस आपली आईच आपणास सोडून जात आहे कीं काय असें वाटलें. त्यांतील वृद्धांस या देवतेची हीच आपली शेवटची भेट असें वाटून ते स्फुदस्फुदून रडूं लागले. बालकें तिच्याभोंवतीं गोळा होऊन तिच्या ओच्यास बिलगलीं. त्यांच्या हातून मोठ्या कष्टानें आपली मुक्तता करून घेऊन चिमणाताई भारावलेल्या अंतःकरणानें घरीं परत गेली.

याप्रमाणे तिने चिमणपुरकराचा निरोप घेतला खरा; पण त्यांनी तिचा निरोप घेतला नव्हता. तो घेणं जरूर वाटल्यामुळेच की काय, दुसऱ्या दिवशीं गाडीच्या वेळेवर सर्व स्टेशन ग्रामस्थांनीं फुलून गेले. त्याना निरोप देता देतां तिची पुरेवाट झाली. स्टेशनाजवळील घराच्या खिडक्या, गच्च्या व छपरे तर माणसांनी बुजबुजलीं होतीच, पण झाडासही फलरूप बालका-प्रमाणे बालकरूपि फळे लगटलेलीं होती. एखाद्या बड्या अधिकाऱ्यास पोचविण्याचे प्रसर्गी बढतीची, पदवीची अगर इतर मानमरातबाची आशा, अवकृपेची भीति, आपली थोरामोठ्यांशी ओळख आहे असा डौल मिरविण्याची हौस, दर्शनकुतूहल इत्यादि अनेक हेतूंनीं जसा मोठा समाज जमतो तसा त्या प्रसर्गी जमला नव्हता. आपणाविषयीं अत्यंत सहानुभूति बाळगणारे एक शुद्ध व प्रेमळ हृदय आपणापासून दूर जात आहे या एकाच भावनेने ती सारीं माणसे एका ठिकाणीं ओढून आणिलीं होतीं. चिमणाताईंचे मधुर हास्य किंवा शब्द आपल्या वाट्याला आला नाहीं तर निदान एखादा स्निग्ध दृष्टिपात तरी यावा म्हणून त्या सर्वांची धडपड चालली होती. गोपाळराव व राधाबाई तिच्या डब्यासमोर उभीं असून मल्हारीबाबा वगैरे इतर प्रमुख गावकरी स्त्री-पुरुष त्यांच्याभोवतीं उभे होते. इतक्यात मल्हारीबाबाची पत्नी पुढे झाली व तिने गावातील स्त्रीसमाजातर्फे चिमणाताईंची खणानारळांनी ओटी भरली. पुरुषसमाजा-तर्फे पुष्पहार, पुष्पगुच्छ, अत्तरगुलाब वगैरे साहित्य आले होते, तें एका लहान मुलाच्या हाताने तिला अर्पण करण्यात आले. इतक्यांत तिला श्यामची आठवण झाली. तिला गाडींत सामानासह बदोबस्ताने बसविल्या-नंतर तो जो नाहींसा झाला होता तो हा वेळपर्यंत पुन्हा दिसलाच नव्हता. तिने आपली नजर जरा बारकाईने चौफेर फिरविली, तो दूर एका खांबाशीं स्टेशनच्या हमालामध्यें खिन्न मुद्रेने उभा असलेला तिनें त्याला पाहिला. तिने 'नाना' म्हणून हाक मारिताच तो धावतच तिच्या डब्याजवळ आला. तिने हातांतील पुष्पगुच्छ त्याच्या हातात देत म्हटले, "मीं तुम्हाला प्रथमपासूनच गुरु मानिले आहे, तेव्हां याचा तुम्ही अवश्य स्वीकार केला पाहिजे." श्यामने तो घेऊन म्हटले, "वडील बहिणीचा प्रसाद म्हणून नेहमी जवळ बाळगीन." नंतर चिमणाताईंने मातापितरांस

नमस्कार केला व गावकऱ्यास उद्देशून म्हटलें, "माझ्या तोंडून कधीं कोणास अधिकउणा शब्द पडला असल्यास त्याची क्षमा करावी. चिमण-पुरांतील साऱ्या जातींची माणसें आजपर्यंत जशीं एकमेकाशीं बंधु-भावानें वागलीं तशीं यापुढेही वागत आहेत असें मला तिकडे कळलें म्हणजे मला अत्यंत आनंद होईल." हे शब्द तिच्या मुखांतून पडतात तोंच गाडी चालू झाली. तिच्या नावाचा जयजयकार करण्याचा चिमणपुर-करांचा संकल्प असला तरी सर्वांचे कंठ रुद्ध झालेले असल्यामुळें तो कृतींत उतरला नाहीं. तिच्या शिरावर ज्या असंख्य आशीर्वादाचा व सदिच्छाचा वर्षाव झाला त्याच्या भारामुळेंच कीं काय, धापा टाकीत गाडी वाढत्या वेगानें लवकरच दृष्टीच्या टप्प्याबाहेर निघून गेली. ग्रामस्थ मंडळी चिमणाताईचे गुण गात घरोघर परतलीं.

## प्रकरण दहावें

# कसोटी

चिमणाताईंच्या जाण्यानें इतरांस वाईट वाटलें त्यापेक्षां श्यामला पुष्कळच अधिक वाटलें. हा त्याजवर विरहाचा दुसरा प्रसंग होता. पहिल्या विरहानंतर त्यास अगदीं नव्या जगांत येऊन नवीन परिस्थितीशीं झगडावें लागल्यामुळें विरहदुःखाची तीव्रता बोथट होऊन विशेष जाणवली नाहीं. पण या खेपेस त्यास नेहमींचे व्यवहार परिचित परिस्थितींतच करावे लागत असल्यामुळें त्याची विरहाची जाणीव पहिल्या घटके-इतकीच पुढेंही कायम राहिली. किंबहुना जीं जीं स्थळें किंवा माणसें चिमणाताईंच्या सांनिध्यामुळें त्यास प्रिय झालीं होतीं त्यांच्या दर्शनानें ती जाणीव तीव्रतरच होत चालली. तिनें त्याला जो पुष्पगुच्छ दिला होता तो दिवसेंदिवस वाळत चालला, पण त्यानें तिची स्मृति मात्र ताजीच ठेवली. गोपाळरावांचा वाडा आजपर्यंत तिच्या वास्तव्यामुळें त्यास गजबजलेला व आनंदमय वाटत असे, पण तो आतां त्यास भयाण व उदास वाटूं लागला. संस्थेचें कार्यालय तिच्या मूर्तीनें शोभिवंत व तिच्या वक्तृत्वानें संगीतमय वाटत असे; ते आतां त्यास विशोभित व कर्कश वाटूं लागलें. तथापि त्यास आपलीं खाजगी व सामाजिक कर्तव्यें पूर्वींइतक्याच, किंबहुना अधिक तत्परतेनें करावीं लागूं लागलीं. गोपाळ-रावास व राधाकाकूंस आपल्या मुलीचा विरह फारसा भासूं नये म्हणून त्यास स्वतःची मनःस्थिति बाजूस ठेवून त्यांच्याशीं प्रहर प्रहर बोलत बसणें भाग पडूं लागलें. चिमणाताई गेल्यामुळें निस्तेज बनलेल्या संस्थेस तिच्या स्मृतीच्या साह्यानें नवीन जोम उत्पन्न करावा लागला। चिमणा-ताई ही संस्थेची बुद्धि व श्याम हा संस्थेचें हृदय होता. त्या दोघांच्या संगानें चालणाऱ्या संस्थेस यापुढें एकट्या श्यामच्याच आधारावर चालणें भाग पडलें होतें. संस्थेच्या मार्गांत उत्तरोत्तर अधिकाधिक अडचणी उपस्थित व्हावयास लागून त्या दूर करण्याकरितां सभासदांस आपलें

शक्तिसर्वस्व खर्च करावें लागणार असा सुमार दिसू लागला होता. त्या अडचणी केवळ जातिभेदविषयक नसून आर्थिक स्वरूपाच्याही होत्या. त्याचे स्वरूप समजण्याकरिता तत्कालीन राजकीय परिस्थितीचें अवलोकन केलें पाहिजे.

नाताळात राष्ट्रीय सभेची नागपुर येथील बैठक झाली. तिचे अध्यक्ष बाबात्कारी जरी तिचे नायक होते तरी तिचे खरे सूत्रचालक महात्मा गांधी हे होते. मुत्सद्दी या नात्यानें त्यांची योग्यता किती याबद्दल मत-भेद असू शकेल. पण त्यांची जाज्वल्य सत्यनिष्ठा, प्रचंड स्वार्थत्याग, साधी रहाणी, विमल आचरण, असामान्य निस्पृहपणा, शुद्ध व सदय अंतःकरण, लोकोत्तर धैर्य इत्यादि गुणासंबंधानें या देशातच काय, पण परदेशातही मतभेद होण्याचा संभव नाही. त्यांनी राजकारणात धर्माचा व नीतीचा प्रवेश करविला, श्रद्धा व बुद्धिमत्ता यांची सांगड घातली, व्यवहार व सत्य यांचा मेळ घातला, सपत्ति व साधेपणा याचे ऐक्य घडवून आणिलें आणि लोकांची निंदा करीत असताही लोकप्रियता मिळविण्याचा अपूर्व चमत्कार करून दाखविला. त्यांनी विश्वबंधुत्वाचा व प्रेमाचा उपदेश जितक्या परिणामकारक रीतीनें केला तितक्याच परिणामकारक रीतीनें असहकारितेचा व बहिष्काराचा उपदेशही केला. त्यांनी खादीसारख्या असेव्य वाटणाऱ्या वस्तूला रेशमी व भरजरी वस्त्राची योग्यता आणिली आणि अंत्यजासारख्या अस्पृश्यास स्पृश्य बनविलें. आजपर्यंत राष्ट्रीय सभा अल्प-संख्याक सुशिक्षित चाबूकस्वाराकडून चार दिवस ठरावाचे कागदी घोडे नाचवीत असे. पण महात्मा गांधींनीं नागपुरच्या राष्ट्रीय सभेच्या मुखानें सोडिलेल्या आज्ञा एका आठवड्यांत या अवाढव्य देशाच्या कोनाकोपऱ्या-पर्यंत वायुवेगानें जाऊन धडकल्या, आणि स्पष्ट उच्चार करू शकणाऱ्या प्रत्येक मुलाच्या, तरुणाच्या व वृद्धाच्या मुखात खादी, बहिष्कार, चरखा, स्वराज्य, खिलाफत हे शब्द खेळू लागले. त्या आज्ञांचें आकलन व पालन सामान्य जनांस कठिण असल्यामुळें प्रत्येकजण त्यांचा अर्थ आपल्या बुद्धीप्रमाणे व मगदुराप्रमाणे निरनिराळा करू लागला. हिंदु व मुसलमान हे कांहीं दिवस तरी परस्परांशीं अधिक सलोख्यानें वागले; पण स्पृश्य हिंदु बक्र्यांनीं अस्पृश्यता हा विषय अंत्यजाइतकाच अस्पृश्य मानणें पूर्ववत्

चालू ठेविले./ सरकारी शाळांत मुले न पाठविण्याचा निश्चय निपुत्रिकां-कडूनच काय तो पूर्णपणे पार पडला. न्यायमंदिरावरील बहिष्कार रिणको नी जितका तडीस नेला तितका धनकोंनीं नेला नाहीं. धनकोने रिणको-स न्यायमंदिराची पायरी चढावयास लाविलीच तर रिणको त्याचे देणें नाकबूल करून व इतर प्रकारेंही त्रास देऊन त्यास चांगलीच थद्दल घडवीत असे. एखाद्या धनकोस हुकुमनामा मिळविल्यानंतर वकिलावरील बहिष्काराची आठवण होऊन तो वकीलफी बुडवून तो बहिष्कार यथा-शक्ति अमलात आणीत असे. गुन्हेगार वर्गाकडून फौजदारी न्यायमंदिरा वरील बहिष्कार नीटपणें पार पडला नाहीं; पण त्यात त्या बिचाऱ्याचा कांहींच अपराध नव्हता. कायदेमंडळाशीं सामान्य जनाचा संबंध उमेदवार या नात्यानें मुळींच नव्हता, व त्यावरील बहिष्काराचें श्रेय त्यास घरीं झोपा ताणूनच मिळविता येण्यासारखे होतें. तेव्हा ते त्यानीं पदरात पाडून घेतले यात नवल नाहीं. महात्माजींचा कटाक्ष वकिलीवर होता तसा डाक्तरीवरही होता. पण तिचा समावेश बहिष्कारत्रयींत झालेला नसल्यामुळे डाक्तर लोकाना परदेशी औषधांवर गब्बर होण्याची पूर्ण मोकळीक होती, व तिचा त्यानीं चांगलाच फायदा करून घेतला. प्रत्येकानें स्वतःच्या सदसद्विवेकबुद्धीस पटेल तेच करावें अशी एक सवलत महात्माजींनीं ठेविली होती. पण सदसद्विवेकबुद्धि कशाशीं खातात हें कळत नसल्यामुळे म्हणा किंवा स्वतःच्या मनोदेवतेशीं न जुळणारी सदसद्विवेकबुद्धि त्या नांवाला पात्रच नाहीं असें वाटल्यामुळे म्हणा, त्या सवलतीनें व्यक्तिस्वातंत्र्य मिळण्याऐवजीं अजीबात नष्ट मात्र झाले. याप्रमाणें कांहीं बाबतींत महात्मा गांधींच्या हेतूचें क्षेत्र मर्यादित करण्यांत आलें तसें इतर बाबतींत ते वाढविण्यांतही आलें. मद्यपानास आळा बसावा अशी इतर सुबुद्ध पुरुषांप्रमाणे महात्मा गांधींचीही इच्छा होती. त्यास प्रतिबंध करण्याचे त्यांचे मार्गही ठरलेले होते. पण त्यांच्या भक्तांनीं नास्तिक्य, अश्रद्धा यासारख्या मतांसही मद्यपानाच्याच पंक्तीस बसवून त्या सर्वांकरितां नव्या नव्या शिक्षा निर्माण केल्या. सरकारी न्याय-मंदिरांसमोर यावयाचे कज्जे परस्पर मिटविण्याकरितां ज्या पंचायती निर्माण झाल्या होत्या त्यांपैकीं एकीनें तर एका मुसलमानाची निमाज नेमाने न

पढण्याच्या गुन्ह्याबद्दल गाढवावर उलटी धिंड काढविली ! वकिलांच्या घरासमोर स्वयंसेवकांचे पहारे बसविण्यात आले, व त्याच्या मागे त्यांचा रात्रंदिवस ससेमिरा लागून त्यास त्यांजकडून बीभत्स अपशब्दाचा लाभही होऊं लागला. वेश्यांनी एक तर एका एका पुरुषाशी लग्न लावावें किंवा गाव सोडून निघून जावें अशी सक्ती करण्यात आली. गांधींना यांत्रिक शक्तीचा अत्यंत तिटकारा आहे असें कळताच 'कारखानदार विरुद्ध मजूर' या सामन्यास नवीनच जोर आला. मालक व नोकर, जमीनदार व मजूर आणि सावकार व कुळें यामध्येही एक एक नवी तेढ उत्पन्न झाली. ब्राह्मण ब्राह्मणेतर व स्पृश्य-अस्पृश्य यामधील वैमनस्येंही संसर्गदोषाने वाढीस लागली. याप्रमाणे वर्णद्वेषमूलक भारतीय कृत्रिम वर्गाची आणि व्यवसायभेदमूलक व मतभेदमूलक पाश्चात्य नैसर्गिक वर्गाची खिचडी होऊन तिच्यापासून ब्राह्मण वकील, ब्राह्मण डाक्तर, शूद्र कारखानदार, शूद्र मजूर, सहकारितावादी मुसलमान, असहकारितावादी मुसलमान असे अनेक भिन्नभिन्न पथ होऊन समाजाचे सहस्रशः तुकडे पडूं लागले. अन्यायाचें शासन 'निःशस्त्र प्रतिकारा'नें करावयाचें अशी महात्मा गांधींची शिकवण होती पण सामान्य जनास त्यांतील स्वारस्य न उमगल्यामुळें त्यांनीं त्या शब्दातील 'निः' या उपपदास फांटा देऊन उरलेली शिकवण यथाशक्ति आचरणांत उतरविण्याचा निश्चय केला, व त्याचें फल अनेक दंग्याच्या रूपाने प्रत्ययाला आले. स्वर्गातून अवतरलेल्या निर्मल भागीरथीस पृथ्वीच्या संसर्गानें ज्याप्रमाणे पार्थिव व कलुषित स्वरूप प्राप्त झाले त्याप्रमाणें महात्मा गांधींचे उदात्त व शुद्ध संकल्प सामान्य जनाच्या आचरणात उतरताच त्यास ग्राम्य व शबल स्वरूप आले.

चिमणपुरात ब्राह्मण व शूद्र यांचे बरेच ऐक्य स्थापित झालेलें असल्यामुळें नागपुरच्या राष्ट्रीय सभेच्या म्हणजे पर्यायाने महात्मा गांधींच्या आज्ञाचे तेथें फारसे दुष्परिणाम दिसून न येतां सुपरिणामच दिसून आले. तेथील लोकांच्या आचरणात साधेपणा दिसूं लागला. पोशाखात खादीचें प्रमाण वाढूं लागले, व आहारातून मांसाशनाचे जवळजवळ पूर्ण उच्चाटन झालें. हिंसा कृतीनेच केवळ नव्हे, तर शब्दानेंही होऊं नये याबद्दल दक्षता बाळगण्यांत येऊं लागली. श्यामच्या शिकवणीनें व आचरणाने

सत्याबद्दल जो आदर उत्पन्न झाला होता तो सपाट्याने वाढीस लागला. चिमणाताईच्या व श्यामच्या अविश्रांत परिश्रमामुळे अस्पृश्याबद्दल जी सहानुभूति उत्पन्न झाली होती तिला लौकरच क्रियेची जोड मिळेल अशीं सुचिन्हें दिसूं लागलीं. त्या दोघांचे, विशेषतः श्यामचें महात्मा गांधींशीं असलेले सादृश्य अधिकाधिक लक्ष्यात येऊन त्याजबद्दलचा आदर व प्रेम हीं जोराने वृद्धिंगत होऊं लागलीं.

तथापि सर्व देशभर जोराने पसरत चाललेल्या असहकारितेच्या प्रचंड लाटेचे कांहीं धक्के चिमणपुरच्याही वाट्याला आले. श्यामच्या प्रयत्नास कसून विरोध करणारा हैबतीचा पक्ष ठिणगीची वाट पहाणाऱ्या स्फोटक द्रव्याप्रमाणे त्याच्याशीं भांडण उकरून काढण्यास निमित्ताचीच वाट पहात होता. हा वेळपर्यंत तो पक्ष अल्पसंख्याक व कमजोर होता. पण स्वतःचें मत नसलेले जे शूद्र कोणत्या पक्षास मिळावयाचे याचा निश्चय न झाल्यामुळे आतापर्यंत तटस्थ म्हणून हेलकावे खात राहिले होते ते बहुधा कुळें व मजूर या वर्गांतील असल्यामुळे असहकारितेच्या वावटळींत सापडून गोपाळराव देशमुखास प्रतिकूल असलेल्या 'ब्राह्मणेतर पक्षाकडे खेंचिले गेले, व जे कट्टे पुराणमताभिमानी ब्राह्मण आतापर्यंत केवळ गोपाळ रावाच्या मुर्वतीखातर मूग गिळून बसले होते त्यांनीं प्रतिकारार्थ एक निराळा पक्ष स्थापून ब्राह्मणांतील तटस्थांना आपणांत सामील करून घेतलें. हे दोन पक्ष श्यामच्या प्रागतिक पक्षापेक्षां संख्येने जरी लहान होते तरी लहान तटांतील इसमांत जो पक्षाभिनिवेश व आग्रहीपणा आढळतो तो त्यांच्या घटकांत भरपूर असल्यामुळे त्यांचें उत्साहबल मनुष्यबलाशीं व्यस्त प्रमाणांत होतें.

महाराष्ट्रांत या वेळीं 'ब्राह्मणेतर' हें नांव धारण करून जो एक ब्राह्मण-विरोधी पक्ष निर्माण झाला होता तो दिवसेंदिवस अधिकाधिक बलिष्ट होत चालला होता. त्या पक्षांत क्षत्रिय, वैश्य, शूद्र, अस्पृश्य या साऱ्यांचा समावेश होत असल्यामुळे तो परिणामीं मूठभर ब्राह्मणास अत्यंत जाचक होणार अशीं चिन्हें दिसूं लागलीं होतीं. ब्राह्मणेतर जातींत ब्राह्मणाबद्दल तीव्र द्वेष उत्पन्न व्हावा म्हणून त्यांचे खरेखोटे दोष भडक रंगांत दाख-विणारे जलसे करण्यांत येऊं लागले. याचा परिणाम असा झाला कीं,

इतर जातींस अस्पृश्य समजणारे ब्राह्मण स्वतःच अस्पृश्य होऊन बसतात कीं काय अशी सकारण भीति वाटावयास लागली. खेड्यापाड्यांतून जें एखादें दुसरेंच ब्राह्मणकुटुंब असावयाचें त्यास ब्राह्मणेतरांच्या छळामुळे तेथे असून दिवस काढणें कठिण होऊन स्थलांतर करणें भाग पडूं लागले. आगगाडीच्या डब्यात एखादा ब्राह्मण उतारू ब्राह्मणेतरांबरोबर सकुटुंब प्रवास करीत असल्यास त्यास त्यांजकडून होणाऱ्या अपशब्दांच्या माऱ्यापुढे हार खाली लावून आपल्या मुलामाणसांसह दुसऱ्या डब्याचा आश्रय घ्यावा लागूं लागला. अशा आपत्तीत सापडलेला ब्राह्मण बहिष्कारवादी असल्यास तर त्याच्या हालास सीमाच नसे. सरकारवर पूर्ण बहिष्कार पडल्यास त्याची किती अडचणूक होईल याची त्यास स्वतःवर पडलेल्या बहिष्कारामुळे चांगली कल्पना येऊनही तिजपासून त्यास सतोष वाटेनासा झाला. आपले गाऱ्हाणें अर्जानें सरकारपुढे मांडावें तर तत्त्वाचा भंग होतो, न न मांडावें तर पार्टीचा होतो, मांडावें तर कर्तव्याची राखरांगोळी होते, न मांडावें तर घरादारांची होते. याप्रमाणें तोंड दाबून बुक्क्यांचा मार अशी त्या बिचाऱ्याची स्थिति झाली. आगळीक करणारावर फौजदारी खटला करावा तर कोर्टावरील बहिष्काराचें व्रत मोडून शिवाय पुराव्याच्या अभावीं स्वतःसच दंड होण्याचा उलटा प्रसंग यावयाचा! अशा आपत्तींत त्यानें कोर्टाची पायरी न चढण्याचें व्रत पाळणें विशेष स्वार्थत्यागाचें नसलें तरी महाणपणाचें मात्र खास होतें. त्यास अस्पृश्यांप्रमाणें खेड्यातील विहिरींचाही उपयोग करण्याची गैरकायदा मनाई होऊं लागल्यामुळें एकीकडे आड व एकीकडे विहिर ही म्हण स्वतःस मनांतल्या मनात लावण्याचीही चोरी झाली. चिमणपुर हें गांव शहरांत मोडण्यासारखें नव्हतें तसें खेड्यातही मोडण्यासारखें नसल्यामुळें तेथील ब्राह्मणांची जमात मोठी नव्हती तशी लहानही नव्हती. यामुळें तेथील अब्राह्मणपक्षाप्रमाणें सनातनधर्मीय ब्राह्मणपक्षही आपलें स्वतंत्र अस्तित्व टेकीनें शाबूत राखण्यास पूर्णपणें समर्थ होता.

या दोन पक्षांनीं गांवाचें ऐक्य नष्ट केलेलें पाहून श्यामला फारच वाईट वाटलें. त्यानें प्रत्येक पक्षाची समजूत घालण्याचा प्रयत्न केला, पण व्यर्थ! ब्राह्मणपक्षाची मंडळी त्याचें बोलणें कबूल करीत नसली तरी त्याज-

वरील प्रेमामुळे सौम्यपणानें ऐकून तरी घेत. 'ब्राह्मणेतर'पक्षास तोंड देणारा एक स्वतंत्र पक्ष असणें जरूर आहे व तो पक्ष नाहींसा होईपर्यंत आम्ही आपला पक्ष सोडण्यास तयार नाहीं असें त्या मंडळीचें श्यामच्या साऱ्या युक्तिवादास एकच पण ठाम उत्तर असे. मंडळीनें घातलेली अट फार जबर होती. ती पार पडणें सर्वस्वी 'ब्राह्मणेतर'पक्षाच्या हातीं होतें; व तो पक्ष श्यामला सर्वस्वीं प्रतिकूल होता. तरी त्याच्या गोटांत जाऊन त्याचा ब्राह्मणपक्षाशीं व ऐक्यवर्धक समाजाशीं समेट करण्याचा प्रयत्न करण्याचा त्यानें निश्चय केला

या सुमारास अखिलमहाराष्ट्र–'ब्राह्मणेतर'पक्षातर्फे एक मराठे गृहस्थ चिमणपुरास आले असून त्यानीं ब्राह्मणब्राह्मणेतरांत फूट पाडण्याचें कारस्थान सुरू केलें होतें. एक दिवस त्याचें हैबतीच्या पक्षाशीं खलबत चाललें असता एकाएकीं श्याम एकटाच त्यांजसमोर येऊन उभा राहिला, व त्यानें त्यांजपाशीं 'ब्राह्मणेतर'पक्षाशीं तडजोड करण्याची इच्छा प्रकट केली. त्याच्या धाडसाचें सर्वांसच नवल वाटलें, व आपली शिकार आपण होऊनच आपल्या घरीं चालत आलेली पाहून आनंदही झाला. त्यानीं लागलीच श्यामला चारी बाजूनीं घेरलें, व ब्राह्मणापासून अलग होऊन ऐक्यवर्धक समाजाच्या इतर ब्राह्मणेतर सभासदासह 'ब्राह्मणेतर'पक्षास येऊन मिळण्याबद्दल युक्तिवाद, विनवण्या, धमक्या या साऱ्या साधनांचा त्यांजवर वर्षाव केला. एकटा हैबती मात्र त्रासिक मुद्रेनें एका बाजूस उभा होता. त्याचें काहूर किंचित् शांत झाल्यावर श्याम त्यांना म्हणाला, "मी पडलों एकटा. तुमच्या या अनेकमुखी भडिमारास तोंड कसा देणार ! तुम्हांतर्फे कोणी तरी एकजण बोलेल तर मी त्याला आपलें म्हणणें समजावून देईन" हे म्हणणें त्या सर्वांस पटलें. त्यांनीं आपला मराठा पाहुणा श्यामला निरुत्तर करण्यासाठीं पुढें केला. त्यांजमध्यें झालेला संवाद खालीं दिला आहेः—

मराठा पाहुणाः—तुम्हीं ब्राह्मणांचा पक्ष सोडून आम्हांमध्यें सामील व्हावें अशी आम्हां सर्वांची इच्छा आहे. तुम्हीं या गांवांत अत्यंत लोकप्रिय असल्यामुळें तुमच्या मागोमाग इतरही मराठे त्या पक्षांतून फुटून निघतील अशी आमची खात्री आहे.

श्याम:—तुमच्याप्रमाणें आमचीही इच्छा आहे कीं तुम्हीं आपला स्वतंत्र पक्ष न ठेविता आमच्या ऐक्यवर्धक समाजात येऊन मिळावें.

मराठा पाहुणा:—पण त्या समाजात ब्राह्मण आहेत ना?

श्याम:—मग त्यात काय बिघडलें? आमच्या समाजात ब्राह्मण आहेत म्हणूनच आम्हा कुणब्यामाळ्यांची इतकी सुधारणा झाली आहे. या सुधारणेचें काम ब्राह्मणांनी आपण होऊन आपल्या शिरावर घेतलें ही गोष्ट विशेष आहे. त्याचा पुढाकार प्रथम स्त्रीनें घेतला हीसुद्धा यासबधानें लक्ष्यात ठेवण्यासारखी गोष्ट आहे. आमच्या उपकारकर्त्यांवर आम्ही उलटलों तर कृतघ्नतेचा दोष पदरीं येणार नाहीं का?

मराठा पाहुणा:—मराठा समाजातले सारेच इसम स्त्रैण नसल्यामुळें आम्हाला स्त्रीच्या मोहिनीकडे लक्ष्य देण्याचें तादृश कारण नाहीं. आम्हाला फक्त एकाच गोष्टीचा विचार करावयाचा आहे. आम्हाला हजारों वर्षें अज्ञानात डांबून ठेवून आताच आमची सुधारणा करावयाची या ब्राह्मणांना उठाठेव कां करावी? यापूर्वीच यांना ही बुद्धि कां नाहीं झाली?

श्याम:—याचें कारण त्यांच्यावर जुन्या धर्माचा पगडा विशेष होता. त्या धर्माचीं बंधनें सैल होतांच त्यांनी आमची सुधारणा हातीं घेतली. उशिरानें कां होईना, ते आपल्या चुकीची दुरुस्ती करीत आहेत ना? तसें पाहूं गेलें तर ब्राह्मणेतर जातींनीं तरी आपणाहून कनिष्ठ असलेल्या जातींची आजपर्यंत कितीशी पर्वा बाळगली? ब्राह्मणांनी विद्येचा मक्ता आपणाकडे ठेविला तसा क्षत्रियांनी पराक्रमाचा व वैश्यांनी व्यापाराचा मक्ता आपणाकडे ठेविला नाहीं का? तुम्ही आपणास क्षत्रिय म्हणविता ना! बोला, तुम्ही आजपर्यंत महारामांगांच्या सुधारणेबद्दल काय केलेंत?

मराठा पाहुणा:—आम्हीं 'ब्राह्मणेतर' पक्ष स्थापन केला तो त्या जातींच्या हितसंबंधाचा विचार केल्यावाचून कीं काय?

श्याम:—तो पक्ष खरोखरच शुद्ध बुद्धीनें स्थापन केला असता तरी त्यात येथील ब्राह्मणांपेक्षा अधिक कांहींच केलें नसतें. पण तुम्ही प्रांजल व निर्विकार बुद्धीनें विचार केला तर तुमच्या 'ब्राह्मणेतर' पक्षाचा उगम महारांमांगांबद्दलच्या प्रेमात झाला नसून ब्राह्मणांबद्दलच्या द्वेषातच झाला आहे हे तुम्हांस कबूल करावें लागेल. तुम्हीं ब्राह्मणांविरुद्ध क्षत्रिय-वैश्य-शूद्रांचा

व अंत्यजांचा मिळून एक मोठा पक्ष तयार करण्याकरिता 'ब्राह्मणेतर' हा एक नवाच पक्षबोधक शब्द निर्माण करून त्या जातींची शाब्दिक सागड घडवून आणिलीत खरी. पण तो शाब्दिक एकोपा त्या जातींच्या परस्परव्यवहारात दिसून येतो का? ब्राह्मण आम्हा शूद्रांत बरोबरीच्या नात्याने मिसळतात, आम्हाबरोबर खाणेपिणे करितात. त्याप्रमाणे तुम्हापैकी कोणी महारमांगाशी व्यवहार केला आहे का? ब्राह्मणाची मजल तर अंत्यजाना स्पृश्य करून घेण्याबद्दलचा ठराव करण्यापर्यंतही गेली आहे.

मराठा पाहुणा:—नुसता शाब्दिक ठराव करण्यात काय मोठेसे आहे!

श्याम:—त्याची किंमत 'ब्राह्मणेतर' या शब्दापेक्षा अधिक नाही हें मीही कबूल करितो. पण आमच्या समाजाच्या सभासदांची शाब्दिक सहानुभूति कृतींतही उतरेल असा मला भरवसा वाटतो. निदान येथील 'ब्राह्मणतर'पक्षाच्या बरोबरीने तरी आमचा ऐक्यवर्धक समाज प्रगतिपर ठरेल अशी माझी खात्री आहे.

मराठा पाहुणा:—तुम्हांला ब्राह्मणाबद्दल आपलेपणा वाटावा आणि ब्राह्मणेतराबद्दल वाटू नये, इतकेच नाही तर तुम्ही कुऱ्हाडीचा दांडा बनून गोतास काळ व्हावेत याचे आम्हास फार वाईट वाटते.

श्याम:—माझी किंवा ऐक्यवर्धक समाजांतील इतर शूद्र सभासदांची इच्छा कुऱ्हाडीप्रमाणे मोडावयाची नसून जोडावयाची आहे. तुम्ही स्वतःचे गोत आपल्या जातीपुरते मर्यादित समजता आणि आम्ही आपल्या गोतांत ब्राह्मणांचा आणि अंत्यजाचा समावेश करितो इतकाच काय तो तुम्हा-आम्हांत फरक आहे. हल्ली आपल्या समाजावर ख्रिस्ती व मुसलमान समाजांकडून जे हल्ले चढत आहेत त्यांकडे लक्ष्य दिल्यास सांप्रत काळी तुमच्या संकुचित दृष्टीपेक्षां आमची व्यापक दृष्टिच अधिक श्रेयस्कर आहे व त्या दृष्टीनें तुम्हीच परधर्मांच्या कुऱ्हाडींचे दांडे बनून आपल्या हिंदु-धर्मरूप गोताची शकले करण्यास त्याना साह्य करीत आहांत हें तुम्हांला कबूल करावें लागेल.

मराठा पाहुणा:—तुम्हांला ब्राह्मणांबद्दल जितका आपलेपणा वाटतो तितकाच अंत्यजांबद्दल वाटतो कीं काय याची पारख एका लहानशा कसोटीनें होण्यासारखी आहे. हातच्या कांकणाला आरसा नको. उद्यांच्या उद्यां

आम्ही एक मिरवणूक काढितो. ती मिरवणूक क्रमाक्रमानें चांभारवाड्यांत, महारवाड्यांत व मांगवाड्यांत नेऊन आणि त्यांतील आदरातिथ्याचा स्वीकार करून तेथील प्रमुख चांभारांना, महारांना व मांगांना तिच्यांत सामील करून घ्यावयाचे, आणि नंतर ती जंगी मिरवणूक परत गावांत आणून अंत्यजांना 'ब्राह्मणेतर' पक्षाच्या व ऐक्यवर्धक समाजाच्या बैठकींत पानसुपारी करावयाची असा आम्ही विचार ठरविला. बोला, या मिरवणुकींत भाग घेण्याची तुमच्या समाजाची तयारी आहे ?

श्याम:—'ब्राह्मणेतर' पक्षाची तयारी असेल तर आमच्या समाजाचीही असण्याला हरकत नाही.

लागलीच "आमची पुरी तयारी आहे. तुम्हीच माघार घ्याल." असे अनेकांकडून उपहासपूर्वक उद्गार निघाले.

श्याम:—मिरवणुकींत तुमच्या पक्षाच्या स्त्रिया सामील होणार असतील तर आमच्या समाजाच्या पुरुषसभासदांबरोबर स्त्रीसभासदही सामील होतील.

हैबती:—नाही, आमच्यापैकी एकही बायको येणार नाही.

मराठा पाहुणा:—नाना, आमच्या पक्षांत स्त्रियांचे प्राबल्य नाही हें मी मघांच तुम्हांला सुचविलें आहे.

श्याम:—तर मग आमचेही नुसते पुरुषसभासदच मिरवणुकीबरोबर येतील.

मराठा पाहुणा:—ते सर्वस्वी तुमच्या मर्जीवर आहे.

श्याम:—अस्पृश्यांविषयी आपलेपणा दाखविण्याच्या बाबतींत आमचा ऐक्यवर्धक समाज 'ब्राह्मणेतर'पक्षापेक्षा हिणकस ठरला तर आम्ही शूद्र सभासद ब्राह्मणांतून फुटून 'ब्राह्मणेतर' पक्षास मिळण्यास तयार आहोत. पण जर का उलट प्रकार झाला तर तुम्ही 'ब्राह्मणेतर' पक्ष सोडून ऐक्यवर्धक समाजास मिळालें पाहिजे.

सर्वजण:—कबूल, कबूल. या कबुलीतही हैबती सामील नव्हताच. पण त्याला आपल्या पक्षाचा निर्णय मान्य करावा लागला.

दुसऱ्या दिवशी सकाळीं 'ब्राह्मणेतर' पक्षाच्या बैठकीसमोर ताशे मर्फे, वाजंत्री, कर्णे वगैरे वाद्यें वाजू लागलीं. त्याबरोबर एका बाजूने 'ब्राह्मणेतर'-

पक्षाचे सभासद आणि दुसऱ्या बाजूने ऐक्यवर्धक समाजाचे ब्राह्मण व शूद्र सभासद सभास्थाने गोळा होऊ लागले. ऐक्यवर्धक समाजाच्या सभासदांनी आपणाबरोबर एक भगव्या रंगाचे निशाण आणिलें असून त्यावर हिंदुधर्मप्रतिपालक शिवाजी महाराजाची अश्वारूढ मूर्ति विराजमान झाली होती. साऱ्या हिंदु जातींस समतेने लेखून त्यांच्या विविध मार्गांनी वहाणाऱ्या सामर्थ्यास एकाच राष्ट्रीय कार्याच्या ओघात वहातें करणाऱ्या त्या थोर पुरुषाशिवाय दुसऱ्या कोणाचा हिंदूंच्या राष्ट्रीय निशाणावर कायदेशीर हक्क पोचण्यासारखा होता ? अर्थात् ती योजना 'ब्राह्मणेतर'पक्षास मान्य होण्यासारखीच होती. निशाणाच्या भगव्या रंगावरून शिवाजी महाराजाच्या कर्तृत्वाशीं रामदासस्वामींचा संबंध ध्वनित होत होता. पण शिवाजी महाराजास प्रमुख स्थान देऊन ऐक्यवर्धक समाजाच्या ब्राह्मण पुढाऱ्यांनीं जे औदार्य दाखविले होते ते न ओळखतां चित्राच्या भूमिकेच्या रंगात खोड काढण्याचा अनुदारपणा 'ब्राह्मणेतर'-पक्षात मुळींच नव्हता. त्या निशाणाखालीं ब्राह्मण व ब्राह्मणेतर त्या वेळे-पुरते तरी बंधु बंधु म्हणून उभे राहिले, आणि लागलीच मिरवणुकीस सुरवात झाली. काही वर्षांपूर्वी राजद्रोहाच्या संशयाने सरकारास ग्रासिले असतां भगवद्गीतेसारख्या आदर्शभूत राष्ट्रीय ग्रंथावर सरकारची अवकृपा झाली होती तशी शिवाजीमहाराजासारख्या आदर्शभूत राष्ट्रीय पुरुषावरही झाली होती, व मुसलमानी राज्यात महाराजावर अज्ञातवासात दिवस काढण्याचे जे काहीं प्रसंग आले होते त्यांच्याच मासल्याचा इंग्रजी राज्यातही एक प्रसंग आला होता. पण महायुद्धात त्यांच्या नावाच्या जादूचे मराठे वीर एका निशाणाखालीं एकत्र करण्याचे सामर्थ्य सरकारच्या नजरेस आल्यापासून महाराजावरचा सरकारी बहिष्कार दूर झाला असून त्यांच्या नावास जयघोषाच्या द्वारे आकाश दुमदुमवून सोडण्याची व त्यांच्या मूर्तीस पृथ्वीवर उजळ माथ्यानें स्वैर संचार करण्याची पुन्हां मुभा मिळाली आहे. असो.

चिमणपुरच्या स्पृश्य वस्तीपासून स्टेशनाकडे जाण्याचा जो रस्ता आहे त्यास लागूनच चांभार, महार व मांग जातींची क्रमाने वस्ती असून भंग्यांची तुरळक व किरकोळ वस्ती त्या वस्तीच्या अगदीं उलट दिशेस गावाच्या

दुसऱ्या बाजूस आहे. मराठा पाहुण्याच्या प्रयोगाला स्टेशनाकडील वस्तीच अधिक अनुकूल होती. असो. चिमणपुरकरांची जोडमिरवणूक मोठ्या थाटानें मिरवत मिरवत चांभारवाड्यात आली. तिची सूचना तेथील रहिवाश्यांस आगाऊच मिळालेली असल्यामुळें ते सामोरे जाऊन आजपर्यंत तिऱ्हाईत-पणानें वागत आलेल्या आपल्या स्पृश्य बांधवांची मोठ्या आतुरतेनें वाट पहात होते. त्यांनी त्यांस अत्यादरानें नेऊन त्यांच्याकरितां मुद्दाम तयार केलेल्या बैठकीवर बसविलें. नंतर त्यांनी आपल्या गरीबी शक्तीप्रमाणें पानसुपारी वगैरे देऊन आपल्या श्रेष्ठ पाहुण्यांचा सत्कार केला. त्या बिचाऱ्यांस सारे पाहुणे सारखेच श्रेष्ठ होते. आपणा हिंदूंच्या सर्व लोकांप्रमाणें आपल्या भिन्नभिन्न जातींमध्यें उच्चनीचभाव उरलेला आहे. ब्राह्मणाच्या स्थानास स्वर्गाची उपमा दिल्यास शूद्रांच्या पदवीस मृत्युलोकाची व अत्यंत नीच म्हणून मानिलेल्या मानवसमाजास पाताळाची उपमा द्यावी लागेल. त्या स्थानास जाण्याच्या पायऱ्या पायरीवर चिमणपुरकरांची मिरवणूक किंचित् काळ थांबल्यावर तिनें आपल्या अधोगतीस पुन्हा सुरवात केली. थोड्याच वेळात ती महारवाड्यात जाऊन पोंचली. तेथील रहिवासीही आपल्या थोर पाहुण्यांच्या स्वागताकरितां अत्यंत उत्कंठित असलेले दिसले. चातु-र्वर्ण्याची समग्र शिडी महारवाड्याच्या चतुःसीमांत उतरण्याचा अभूतपूर्व चमत्कार त्यांना आज दिसणार होता! तो चमत्कार आणखी किती हजार वर्षांनी पुन्हा घडणार याचें भविष्य पूर्व अनुभवावरून करणें सोपें काम नव्हतें. महार पुरुष, स्त्रिया व मुलें आपल्या देवतुल्य पाहुण्याकडे आश्चर्यमूढ अंतःकरणांनी व आश्चर्यपूर्ण नेत्रांनी टकमका पहात राहिलीं. पाहुणेही अनेक विचारांनीं व्यग्र झाल्यासारखे दिसले. त्यांच्यापैकीं कांहींजणानीं कुतूहलप्रेरित होऊन काश्मीर, ब्रह्मदेश, सिंहलद्वीप हे किंवा यांपेक्षांही दूरचे देश नजरेखालून घातले होते; पुष्कळांनीं व्यापाराच्या निमित्तानें इराण, आफ्रिका, चीन या किंवा यापेक्षाही लांबच्या पल्ल्यावरील देशाचा प्रवास केला होता, कित्येकांनीं धर्मबुद्धीनें प्रेरित होऊन काशी, गया, रामेश्वर, जगन्नाथपुरी इत्यादि दूरदूरच्या क्षेत्रांच्या यात्रा केल्या होत्या; व अनेकांनीं स्वदेशभूमीच्या हांकेस ओ देऊन लखनौ, अमृतसर, कलकत्ता इत्यादि दूरदूरच्या शहरांतील राष्ट्रीय सभेच्या बैठकी

आपल्या हजरीने विभूषित केल्या होत्या. पण एका हांकेवरील या अपरिचित प्रदेशास दर्शन देण्याकरितां त्यांना सबध आयुष्यांत एका क्षणाचीही फुरसद मिळाली नव्हती! या टीचभर जागेंत त्यांच्या कुतूहलास मनसोक्त खाद्य मिळण्यासारखें होतें, आणि तेथील मूठभर लोकांच्या साहाय्यानें त्यांना आपल्या संपत्तीचा, धर्माचा व स्वातंत्र्याचा ऱ्हास थांबविता आला असता. पण ती जागा म्हणजे स्वभूमीचा एक कुष्टपीडित अवयव व तेथील रहिवासी म्हणजे त्या अवयवांत वुजवुजणारे कृमि अशी चातुर्वर्ण्यात्मक धर्मांकडूनच शिकवण मिळाल्यावर त्यांना त्यांचा परिचय करून घेण्याची बुद्धि कुठून होणार? त्यांनीं आसमंतात् भागीं पसरलेल्या झोंपड्यांकडे लक्षपूर्वक पाहिलें, तों त्या त्यांना त्यांच्या कल्पनेतल्याहून अगदीं निराळ्या स्थितींत दिसून आल्या. त्यांच्या भिंती व जमिनी शेणानें व मातीनें स्वच्छ सारविलेल्या होत्या. झोंपड्यांच्या आंत व बाहेर जीं भांडीं ठेविलेलीं होतीं तीं मातीचींच असलीं तरी स्वच्छ दिसत होतीं. जवळ उभे असलेल्या महारांचे कपडेही साधे असले तरी स्वच्छ होते. त्यांचे चेहरे गोरे नसले तरी रेखीव व पाणीदार होते. त्यांच्या काही हजार वर्षांपूर्वीच्या पूर्वजांनीं आर्यांच्या स्वारीपूर्वी हिंदुस्थानावर स्वामित्व गाजविलें होतें ही गोष्ट त्यांच्या हल्लींच्या अवनत स्थितींतील तुरळक अवशिष्ट चिन्हावरूनही मननशील मनुष्यास पटण्यासारखी होती. पातालतुल्य अमेरिका खंडाचा शोध लागल्यावर कोलंबसानें तत्रस्थ तांबड्या इंडियन लोकांस पहिल्याच खेपेस ज्या कुतूहलपूर्ण दृष्टीनें पाहिलें त्याच दृष्टीनें आमचे स्पृश्य वर्गाचे प्रतिनिधि आपल्या वसतिस्थानापासून एका हांकेवर वसलेल्या त्या अमेरिकेंतील रहिवाश्यांना पहात होते. इतक्यांत एक प्रमुख महार हात जोडून त्यांच्या समोर उभा राहिला व त्यानें आपल्या पाहुण्यांस त्यांजकरितां मुद्दाम तयार केलेल्या सरबताचा स्वीकार करण्याची विनंति केली. जवळच सरबतानें भरलेला एक मातीचा रांजण असून त्याच्याभोंवतीं साधा पण नीटनेटका पोशाख केलेले महार मुलगे व मुली हातांत कांचेचे पेले घेऊन उभ्या होत्या. हा सारा घाट 'ब्राह्मणेतर' पक्षाच्या मराठा पाहुण्यानें ऐक्यवर्धक समाजाची फजीती करण्याकरितां मुद्दामच जमवून आणिला आहे हें उघड दिसत होतें. पण त्या समाजाच्या सभासदांनीं या प्रसंगीं एका

दिलानें जे वर्तन केलें त्याने त्याचे कारस्थान पूर्णपणे फसलें; इतकेंच नाहीं, तर ते त्याच्याच गळ्यांत आले. अनेक दिवसांच्या उपदेशाने व उदाहरणानें ऐक्यवर्धक समाजाच्या सभासदांची आलेल्या प्रसंगास तोंड देण्याची पूर्ण तयारी झालेली होती. अस्पृश्यांचे आचार स्वच्छ असल्यास त्यांना स्पृश्य लेखण्याचा त्यांनी निर्धार केलेला होता. महारवाड्यातील जागेची व तेथील लोकांची जी स्वच्छता नुकतीच त्यांच्या नजरेस पडली होती तिजमुळे त्यांचीं मनें प्रसन्न झालीं होतीं. यामुळे गोपाळराव देव मुखां-सारख्या ब्राह्मणप्रतिनिधीनें व श्यामसारख्या शूद्रप्रतिनिधीनें इशारा करितांच त्यांनीं तत्परतेनें पुढे सरसावून त्या पेयाचा स्वीकार केला. त्यांपैकीं अनेकांनीं पेयाच्या स्वादिष्टपणाची प्रशंसा केली, व आपल्या महार यजमानाचे अंतः-करणपूर्वक आभार मानिले. महारास हा अनुभव नवीनच असल्यामुळे त्यापासून अननुभूत आनंद झाला, व ते आपल्या पाहुण्याकडे कृतज्ञतादर्शक दृष्टीनें पाहूं लागले. इकडे 'ब्राह्मणेतर'पक्षाच्या मराठा पाहुण्यानें प्रथम स्वतः सरबत घेऊन नंतर आपल्या पक्षाच्या सभासदास पुढे होण्याबद्दल डोळ्यांनीं व हातानीं इशारावजा खुणा केल्या; पण व्यर्थ! त्याचा कांहींच परिणाम होत नाहीं असें पाहून त्यानें प्रथम त्यांची आर्जवें करून पाहिलीं, त्यांना उत्साह व ईर्षा वाटेल असे उत्तेजनपर शब्द योजून पाहिले, अखेरीस तर त्यांजवर उपहासरूपी अंकुशाचा प्रयोग करून त्यांचा स्वाभिमान जागृत करण्याचा प्रयत्न केला; पण सारें पालथ्या घागरीवर पाणी! त्या बिचाऱ्यां-चा त्यांत फारसा दोषही नव्हता. त्यांची उठावणी केवळ श्यामचा व त्याच्या अनुयायांचा पाडाव करण्याकरितांच झालेली होती. त्यांना द्वेषमूलक परापकाराशीं परिचय होता, पण प्रेममूलक स्वार्थत्यागाशीं मुळींच नव्हता. त्यांची विघातक कार्यास पूर्ण तयारी होती, पण विधायक कार्यास मुळींच नव्हती. आज आपला मराठा पाहुणा श्यामच्या पक्षाची साळी काढणार व फजीती उडविणार या सुखद विचारांत ते गर्क होते; किंबहुना भावी विजयानंदाच्या अर्ध्याअधिक भागाचा त्यांनी मनातल्या मनात आस्वादही घेतला होता. त्यावर विरजण पाडणाऱ्या त्या प्रसंगाची त्यांना मुळींच कल्पना नव्हती. त्यांचीं मनें बालपणापासून चातुर्वर्ण्याच्या साच्यांत परिपक्क झालेलीं असल्यामुळे त्यांच्यांत लवचिकपणा मुळींच राहिला नव्हता.

अस्पृश्यांच्या हातचें पाणी पिणे म्हणजे एक महापातक असे त्यांना वाटत होते. केवळ आपल्या प्रतिस्पर्ध्यांच्या धैर्याभावाच्या आधारानेच आपण त्यांजवर मात करू अशी त्यांची कल्पना होती. अस्पृश्यानीं तयार केलेले पेय पिण्यासारख्या भयकर दिव्यांतून आपणास जावे लागणार आहे असें त्यांना स्वप्नातही वाटले नव्हते. यामुळे तें दिव्य समोर उभें राहतांच त्यांची साहजिकच गाळण उडाली. ते सारे खाली माना घालून उभे राहिले. हैबती तर लाजेने मेल्यापेक्षांही मेल्यासारखा झाला. तें पाहून 'ब्राह्मणेतर'पक्षीय मराठा पाहुणा कांहींसा तिरस्काराने व काहींसा रागाने त्यांजकडे पहात म्हणाला, " इतर ठिकाणच्या सामान्य 'ब्राह्मणेतर'पक्षीयाची जी गत तीच तुमचीही! तुमच्यापेक्षा ऐक्यवर्धक समाजाचे हे सभासद किती तरी शूर व कर्तव्यनिष्ठ म्हटले पाहिजेत. अजून त्याना एका दिव्यांतून पार पडावयाचें आहे. त्यात ते कितपत टिकतात ते दिसेलच. तुम्ही मात्र अगदीं हिणकस ठरला आहात. तुम्ही येथेच महारवाड्याच्या शिवेवर उभे रहा. आमची मिरवणूक मांगवाड्यातून परत जाईल तेव्हा तुम्ही तिला मिळावें." आपल्या नायकाच्या आदेशास अनुसरून 'ब्राह्मणेतर'पक्षाचे सभासद हिरमुसल्या चेहऱ्यांनीं एकीकडे उभे राहिले, व उरलेली मिरवणूक मांगवाड्यांत गेली. तेथेंही त्यांचे पूर्ववत् स्वागत झाले. मात्र तेथें चिमणपुरकरांना महारवाड्यातल्याइतकी स्वच्छता दिसली नाहीं. तेथील रहिवासीही महारांच्या मानाने ओबडधोबड चेहऱ्यांचे व मद बुद्धीचे दिसून आले. अनेक पिढ्यापासून मारेकऱ्याचा धंदा अगर गुन्हे करीत आल्यामुळें कित्येकांच्या चेहऱ्यावर बेपर्वाई, मुर्दाडपणा व खुनशीपणा दिसत होता. महारवाड्यांतील अनुभवाने उत्पन्न झालेली चिमणपुरकरांची प्रसन्न वृत्ति मांगवाड्यांतील अनुत्साहकारक दृश्य पाहून पूर्णपणे मावळली. त्यांच्या चेहऱ्यांवर एक प्रकारची किळस दिसू लागली. इतक्यांत मांगांचा नाईक पुढे होऊन त्यानें त्यांस एका घाणेरड्या बिछायतीवर बसण्याची विनंति केली. त्यांपैकीं बरेचजण बसण्यास कांकू करीत आहेत हें पाहून श्यामने त्या कामीं स्वतःच पुढाकार घेतला, व बिछायतीवर स्वतः बसून नाइकासही कळकळीनें आपल्याजवळ बसविलें. नंतर गोपाळराव देशमुखांकडे वळून तो म्हणाला, " रावसाहेब, या समाजाची रहाणी असावी-

तशी नाहीं हे मला कबूल आहे. पण त्याची बहुतेक सर्व जबाबदारी तुम्हां-आम्हांवरच नाहीं का ? तुम्हीं आम्हीं जर या समाजाला जवळ केलें असतें, त्याला स्वच्छता व टापटीप शिकविली असती तर तो आज दिसतो या स्थितीत आपणास क्वचित दिसला नसता. हा समाज ज्ञानानें, सामर्थ्यानें व रहाणीनें वरच्या समाजास बालकासारखा आहे. आपाला जसा आपल्या अजाण व अगतिक बालकाच्या मळकट शरीराचा स्पर्श आनंद-कारकच वाटतो तसा या समाजाचा संसर्गही आपणास वाटला पाहिजे." मराठे पाहुणे मध्येच श्यामला म्हणतात, "पण आधी नाईकजींची इच्छा पुरती ऐकून घेऊन मगच आपलें कर्तव्य ठरविणें योग्य होणार नाहीं का ? नाईकजी, स्पष्ट बोला तुमचें काय म्हणणें असेल तें. आमचे नाना मराठे आज तुम्हांला निरिच्छ करतील यांत संशय नको." या छन्नी भाषणाचा अर्थ श्यामनें पुरता ओळखिला, व मराठे पाहुण्यांचा यापुढील डाव काय आहे हें जाणण्याच्या उत्सुकतेनें तो नाइकास म्हणाला, "नाईकजी, कांहीं संकोच धरूं नका. तुम्ही आमच्याशीं ज्याअर्थीं इतक्या प्रेमानें वागत आहांत त्याअर्थीं तुमचा शब्द खालीं पडूं न देणें आमचेंही कर्तव्य आहे. बोला तुमची काय इच्छा आहे ती." नाईक मराठा पाहुण्याकडे पहात भीतभीत म्हणाला, "गरिबाच्या घरची चटणी भाकर तयार ठेवण्याबद्दल मला आगाऊ वर्दी मिळाली होती, त्याप्रमाणें मी सारी तयारी ठेविली आहे. पण आपल्या प्रेमळपणाकडे पाहून आपणांशीं कपट केल्याबद्दल मला पस्तावा होतो आहे. मी आपणांला संकटांत टाकीत नाहीं. आपली मर्जी नसेल तर माझा आग्रह नाहीं. पण आपण माझ्यायेथील भाजीभाकरी गोड करून घेतली तर माझ्यावर फार मोठे उपकार होतील. ते मी जन्मभर विसरणार नाहीं, सरकार." श्यामनें ताबडतोब म्हटलें, "नाईक, तुम्हीं आपल्या पदरचा खर्च करून आम्हांसाठीं सुग्रास अन्न तयार करावें आणि आम्हीं तें संकट मानावें हें रास्त होईल का ?" नंतर त्यानें एकवार सभोंवती घाईघाईनें पाहिलें व आपल्या सोबत्यांच्या मुद्रावर दिसणारी खंत पाहून आपलें बोलणें पुढें चालू केलें. "नाईक, माझ्याबरोबर आलेल्या माझ्या सोबत्यांना तुम्हीं आग्रह करूं नका. त्यांच्या जागीं मला समजा म्हणजे झालें. मी आणि हे मराठे पाहुणे आज तुमच्या पंक्तीला बसून तुमच्या कारभारणीच्या

हातचें अन्न आवडीने खाणार." चिमणपुरकर मडळी आश्चर्यानें अ करून उभी राहिली. नाइकाचांही श्यामच्या बोलण्यावर विश्वास बसेना. तो म्हणाला, "रावसाहेब, ही थट्टा नसेल तर माझ्यासारखा भाग्यवान् मीच म्हटला पाहिजे." श्याम अगांतील कपडे काढीत म्हणाला, "आता तुम्ही माझें आणि या पाहुण्याचे पान तयार केले नाहीं तर तुमच्या निमंत्रणाला मात्र मी थट्टा समजेन. हं पाहुणे, काढा पाहू कपडे. अहो, तुम्हीं आपल्या बेताचा मला सुगावा लागू दिला असता तर आपण प्रथम येथे जेवून व नंतर महारवाड्यातील थड पेय प्राशन करून सरतेशेवटीं चाभारवाड्यात पानसुपारी घेतली असती. आपण आपल्या कार्यक्रमासंबंधानें मुग्धता स्वीकारल्यामुळे नित्याच्या व्यवहाराचा क्रम बिघडून 'आधी कळस मग पाया रे' असा प्रकार झाला आहे." मराठे पाहुणे इतराप्रमाणेंच आश्चर्यमूढ होऊन बसले होते; ते गहिंवरून म्हणाले, "नाना, मीं तुमच्यासारख्या साधुपुरुषाचा छळ करावयास नको होता. मला क्षमा करा. मी आजपर्यंत मागाच्या हातचें जेवलों नाहीं, आणि आजही तें धाडस मजकडून होत नाहीं. हा घाट केवळ तुम्हां सर्वांच्या परीक्षेकरिता जमवून आणिला होता. त्या परीक्षेत तुम्हीं एकटे तरी कसे उतरलांत हे नवल आहे तुमची इतर मंडळी उतरली नाहींत यात नवल नाहीं. खुद्द मी परीक्षकच तिच्यात नापास झालों ना! सहभोजनास तुम्हीं सर्वांनीं आपली अमान्यता दर्शविल्यावर माझीही या प्रसंगातून आपोआप मुक्तता होईल अशी माझी कल्पना होती; पण ती सपशेल चुकली. मनुष्य आपले अंदाज सामान्य अनुभवावर बांधीत असतो. पण तुमच्यासारख्य असामान्य व्यक्तीशीं प्रसग पडला म्हणजे ते अंदाज निराधार ठरतात. आजपासून तुम्ही मला गुरुस्थानीं आहात." इतके बोलून पाहुणा श्यामच्या पायावर पडला. श्यामनें त्यास प्रेमानें उठवून म्हटलें, "पाहुणे, आज आम्हां सर्वांचे पाऊल इतके पुढे पडले याचें श्रेय केवळ तुमच्याकडे आहे. तुम्हीं जर आम्हा दोन पक्षात चुरस लाविली नसती तर आमच्या मनात ही कल्पनाही आली नसती. आतां तुम्हीं किंवा माझ्या या स्नेह्यानीं या गोष्टींत माघार घेतली यात तुमच्याकडे कांहीं दोष नाहीं. तुम्हाला आईबाप, मुलेमाणसें, सगेसोयरे आहेत. त्यांच्याशीं तुमचा सबध तुटेल असें

तुम्हाला साहजिकच काहीं करिता येत नाहीं. मी हे करण्याला पुढे झालों यात माझी थोरवी ती कोणती ? मला ना बाप ना आई, ना सगा ना सोयरा. मी या नाईकजींइतकाच बहिष्कृत आहें. जो मला प्रेमाने जवळ करील, मला जवळ बसवून दोन घास खायला घालील तोच माझा सगासोयरा." इतके बोलून डोळ्यात उभीं राहिलेलीं आसवें पुशीत पुशीत श्याम नाइकाच्या मागोमाग त्याच्या घरात चालता झाला. त्याच्या बरोबरचा परिवार आपण स्वप्नात आहोत की काय या संशयात चूर होऊन त्याची वाट पहात बाहेर उभा राहिला.

अत्यंत पवित्र वस्तु प्राकृत जनाच्या दृष्टीने दूषित होऊं नयेत म्हणून त्याचें गुप्तपणें रक्षण करण्यात येतें. उलट पक्षीं अत्यंत अपवित्र वस्तु प्राकृत जनाच्या दृष्टीस पडल्यास ती दृष्टि भ्रष्ट होईल या भीतीने त्या वस्तु त्या दृष्टीपासून दूर ठेवण्यात येतात. याप्रमाणे अत्यंत पवित्र व अत्यंत अपवित्र वस्तु सामान्य जनास सारख्याच अगोचर असतात. अस्पृश्याचे वसतिस्थान महात्मा गांधींसारख्या पवित्र पुरुषानी जितके पवित्र मानिले आहे तितकेंच ते सामान्य जनानीं अपवित्र मानिले आहे. त्या वसतिस्थानातील स्वैंपाकाची व जेवणाची जागा अर्थातच पवित्रपणाचा किंवा अपवित्रपणाचा गाभाच असावयाची. ती वाचकाच्या दृष्टीस पाडून ती (?) भ्रष्ट करण्याची आमची इच्छा नाहीं. नाइकाच्या झोपडींत काय प्रकार झाले ते झोपडींतल्या भाग्यशाली किंवा हतभागी प्राण्यासच काय तो माहीत. काहीं वेळाने नाईक व श्याम बाहेर आले त्या वेळीं श्यामच्या मुद्रेवर प्रसन्नता व नाइकाच्या चेहऱ्यावर मूर्तिमंत कृतज्ञता दिसत होती येवढे मात्र खरें. नाईक श्यामच्या कानांत काहीं पुटपुटत होता. "मालकानीं अर्ध्या रात्रीं हाक मारिली तरी हा बंदा आपल्या नोकरीला हजर आहे." हें त्याचे अखेरचे वाक्य होतें.

मिरवणूक परत येण्यास निघाली. तिला महारवाड्याच्या शिवेपाशीं प्रमुख महार व 'ब्राह्मणेतर'पक्षीय लोक आणि चांभारवाड्यापाशी प्रमुख चांभार लोक मिळाले. काहीं वेळाने ती चिमणपुरात शिरली तेव्हा ती पहाण्यास प्रेक्षकांची अदृष्टपूर्व व अश्रुतपूर्व दाटी झाली. मधून मधून 'हिंदुधर्माचा विजय असो !', 'शिवाजी महाराजकी जय !' अशा जयजय-

कारांच्या ललकाऱ्या होत होत्या. अस्पृश्य वर्गांचा सत्कार करण्याचा हक्क 'ब्राह्मणेतर'पक्षानें पूर्वीच बमाविला असल्यामुळें मिरवणूक एकदम ऐक्य-वर्धक समाजाच्या मंदिराकडेच गेली. मंदिरांत प्रशस्त बिछाईत टाकिली होती; तिजवर अस्पृश्यांना आदरानें बसविण्यांत येऊन पानसुपारी, अत्तर-गुलाब वगैरे साहित्य अर्पण करण्यांत आलें. इतकें झाल्यावर अस्पृश्य पाहुणे आपआपल्या वसतिस्थानांत निघून गेले, व समारंभाची समाप्ति झाली.

## प्रकरण अकरावें

# बहिष्कार

मिरवणुकीबरोबर गेलेल्या लोकांचा महारवाड्यात कोणत्या रीतिनें सत्कार करण्यांत आला हे जेव्हां घरोघर जाहीर झालें तेव्हां त्या सत्काराचा स्वीकार करणारांवर त्यांच्या आप्तांकडून, विशेषतः स्त्रीजातीच्या आप्तांकडून प्रतिकूल टीकेचा वर्षाव झाला. "अस्पृश्यांना स्पृश्य मानण्याचा ठराव केला म्हणून त्याच्या हातचे पाणी प्यावयाचे कीं काय ? त्यांनी पेले भरभरून पुढे केले म्हणून काय झालें ? आपण आपला विचार करावयास नको कीं काय ! बरें, आमचे पुरुष आपले भोळे सांब, तेव्हां त्यांना एक तिसके घोरण राहिले नाही; पण त्या मेल्यांनी तरी कांहीं मागचा पुढचा विचार नको होता का करायला ? आमचे पुरुष त्यांच्या वस्तींत गेले हेच त्यांच्यावर खडोगणती उपकार झाले. त्यांनीं आणखी त्यांना पाणी पाजून बाटवायचे तरी नव्हतें. भटाला दिली ओसरी आणि भट पाय पसरी तशांतली गत ! (भटांचा व अस्पृश्यांचा उपमानोपमेयसंबंध समग्र मराठी वाङ्मयात हाच प्रथम घडून आलेला दिसेल !) पाणी तरी साधेच होतें की मतरलेलें होतें कुणास ठाऊक ! मतरलेले असले तर मात्र त्याचा परिणाम धड नाहीं व्हायचा ! आमचे पुरुष उद्यां खुशाल भंगिणीशीं लग्नें लावून त्याना आपल्या बायकांच्या डोक्यांवर मिऱ्ये वांटायला लावतील आणि बायकांच्या हातीं खराटे देऊन गटारें साफ करायला लावतील. तो नाना मराठ्या आहे आयताच बोहल्यावर चढायला तयार ! मेल्याला इतक्या माणसांदेखत मांगिणीच्या हातचे खायला कांहीं तरी शरम वाटायला पाहिजे होती ! पण मी म्हणते तो एक नागवा नाचला; पण आमचे पुरुष कसे मुर्दाडांसारखे तो प्रकार पहात बसले ? आज त्याने मेलेल्या गुराचे मांस खाल्ले. उद्यां तो माणसांचे मांस खायला कमी करणार आहे का ! मेल्याला घराचा उंबरठाही चढूं देतां कामा नये; आणि तान्हीं मुलें तर त्याच्या स्वाधीन करून मुळींच

उपयोग नाहीं." याप्रमाणें घरोघर उद्गार निघूं लागले. मिरवणुकीबरोबर गेलेल्या पुरुषांनीं आपल्या बायकांची अनेक प्रकारें समजूत घालण्याचा प्रयत्न केला; पण तो व्यर्थ गेला. "तुम्ही स्वतः मिरवणुकीबरोबर आलां असता तर तुम्हाला त्यात कांहींच वाटलें नसतें. महारवाड्यातील जमिनी तुमच्या आमच्या जमिनींइतक्या स्वच्छ आहेत! त्यात वाटेल त्याने आपले तोंड पाहून घ्यावे. गाडगीं मडकीं तरी किती निर्मळ! सरबत तयार करणारीं मुलेंसुद्धां आपल्याकडील आचाऱ्यापाणक्यापेक्षां किती तरी शुचिर्भूत! त्यानीं भरून दिलेले पेले दूर करणे तुम्हांलाही कठिण गेले असते." असें पुरुषांनीं म्हटलें कीं लागलीच बायकानीं म्हणावे, "पाणी मंतरलेले होते असे आम्ही म्हटले तेच खरे दिसते. साऱ्याचीं मनें कशीं भारून टाकलीं आहेत! पण आमचे सारे गाव जरी वाळीत पडले तरी त्या मेल्याना कुठे आहे त्याची पर्वा!"

सारे गांव वाळींत पडणे या शब्दसमूहाचा अर्थ बायकांच्या तरी लक्षात आला असेल की काय याची शकाच आहे. येवढे मात्र खरं कीं या खेपेस पडलेला बहिष्कार स्त्रीरूपी अर्ध्या गावाकडून पुरुषरूपी गावाच्या अर्ध्या भागावर पडला होता. ब्राह्मणशूद्राच्या एकीकरणाच्या कामीं याच स्त्रियानीं याच पुरुषाना मनोभावाने मदत केली होती. ब्राह्मणशूद्राचे परस्परांशी दर्शनभाषणादि प्रसग प्रत्यहीं घडत असल्यामुळें उभयतांच्या परिचयानें सहभोजनपानादि साधनानीं क्रमाक्रमाने जिव्हाळ्याच्या सबधांत परिवर्तन घडवून आणिताना आपण विशेष धर्मबाह्य वर्तन करीत आहोत असें त्या स्त्रियांना वाटलें नव्हतें. पण कधींच दृष्टिपथात न आलेल्या वस्तींत रस्त्यावर केवळ घाणेरडीं कामे करितानाच दिसलेल्या माणसांनीं तयार केलेले पेय पुरुषानी मुळींच आढेवेढे न घेतां घ्यावे या गोष्टीनें त्याच्या चित्तात भयकर क्षोभ झाला यांत अस्वाभाविक असें कांहींच नव्हतें. अशा बाबतींत युक्तिवादापेक्षा प्रत्यक्ष परिचयच विशेष परिणामकारक दिसून येतो. मिरवणुकींत पुरुषाबरोबर स्त्रियाही सामील झाल्या असत्या तर महारवाड्यांतील प्रकार प्रत्यक्ष त्यांच्यासमोर घडून त्यातील दूषणीय म्हणून मानण्यांत आलेले भाग त्यांच्या दृष्टीनें अनिंद्य किंबहुना श्रेयस्करच ठरले असते. तसे न घडल्यामुळें चिमणपुरातील एकीकरणाची

चळवळ स्त्रियांच्या सहानुभूतीच्या अभावीं अर्धांगवायूने ग्रस्त झालेल्या शरीराप्रमाणें कांहीं दिवस अगदीं लुली होऊन राहिली.

स्त्रिया व पुरुष यांमध्ये आगंतुक कारणांमुळे कितीं जरी फूट पडली तरी त्यांजमधील नैसर्गिक परस्पराकर्षणामुळे ती बुजण्यास फारसा काळ लागत नाहीं. पुरुषांनी केलेल्या अधर्म्य रसपानाबद्दल स्त्रियांनीं त्यांना लवकरच मनापासून क्षमा केली. इतकेंच नाहीं, तर आपण पुरुषांना केलेली शिक्षा फाजील कठोर झाली असे वाटून त्यांचे मन त्यांना खावयास लागले, व त्या त्यांच्याशीं पूर्वीपेक्षांही गोडीगुलाबीने वागू लागल्या. बिचाऱ्या श्यामवरील त्यांचा राग मात्र बरेच दिवस तसाच कायम राहिला. श्याम रस्त्यानें जात असतां ज्या स्त्रिया पूर्वीं त्याच्याशीं नसतें निमित्त काढून बोलत असत त्या तो समोर दिसताच तोंड फिरवू लागल्या. बिचाऱ्या अर्भकांचा मनुस्मृतींतील दुर्नीतीशीं परिचय नसल्यामुळे मांगाच्या घरीं जेवलेला श्याम त्यांना अजूनही पूर्वीइतकाच स्पृश्य वाटे, व त्याने आपल्या गालांस ओठांनीं स्पर्श करावा म्हणून ती त्याकडे आपली आशाळभूत दृष्टि लावून पहात असत. पण त्यांच्या माता तावडतोब त्यांस दटावून त्यांजमधील प्रेमाची भूक उपासमारीनेंच मारून टाकीत. ज्या अनेक स्त्रिया त्याजवर आईप्रमाणें किंवा बहिणीप्रमाणें प्रेम करीत, त्यांनी त्याच्याशीं अगदींच बोलणें टाकिलें असें नाहीं. पण त्यांच्या बोलण्याचा विषय नेहमीं त्याजवरील बहिष्कार हा असे. त्याने प्रायश्चित्त घेऊन शुद्ध व्हावें असा त्या प्रेमाचा आग्रह धरून बसत. त्यावर श्यामचें उत्तर ठरलेलें असे. तो म्हणे, " आपण अस्पृश्यांना दूर ठेवून आधींच दक्षम्य अन्याय केला आहे. मी प्रायश्चित्त घेतलें तर त्या अन्यायाच्या जखमेवर अपमानाचा डाग दिल्यासारखे नाहीं का होणार ? " एखाद्या स्त्रीनें जर त्याला थट्टेनें म्हटलें की, " नाना, तुम्हीं अजून लग्न केलें नाहीं हें नशीब समजलें पाहिजे. जर का लग्न केलें असतें आणि त्यापासून एखादी मुलगी असती तर तिला एखाद्या धेडालाच द्यावी लागली असती. ", तर त्याने हसत हसत म्हणावें, " बाई, मी अस्पृश्यतानिवारणाचा जसा चहाता आहे तसा व्यक्तिस्वातंत्र्याचाही आहे. लग्नाच्या बाबतींत मी मुलीवर सक्ती कधींच

केली नसती. बरें, तिनें जर एखाद्या अस्पृश्याला अनुरूप वर मानून माळ घातली असती तर मीं त्यास हरकतही घेतली नसती."

ज्याचें अन्न खावें त्यासारखें मनुष्य होतें या गोष्टीची सत्यता श्यामच्या पूर्णपणें प्रत्ययास आली. त्यानें अस्पृश्याचें अन्न खाल्लेलें असल्यामुळे त्यास अस्पृश्याबद्दल अभिमान वाटू लागला, व लोकांच्या दृष्टीनेंही तो अस्पृश्यच ठरला. मल्हारीबाबांचे त्याजवर पितृतुल्य प्रेम असल्यामुळे त्याला आपलें घर सोडून देण्याची पाळी आली नाही. पण बाकीच्या प्रत्येक बाबतीत त्याला अडचण व गैरसोय भासूं लागली. बहुतेक घरांतील पुरुषमंडळी त्याला अनुकूल होती. पण घरांतील कारभार बायकांच्या हातीं असल्यामुळे त्याजवरील बहिष्कार पूर्णपणें अमलांत येत असे. राधाबाईसारख्या ज्या स्त्रियांची त्याबद्दल पूर्ण सहानुभूति होती त्याही लोकमताच्या भीतीनें त्याच्याशीं बाह्यात्कारी फटकूनच वागत. आपणाविषयींच्या कळकळीमुळे त्याजवर संकट येऊं नये म्हणून तोही त्यांच्याशीं तितकाच फटकून वागूं लागला. अशा प्रसंगीं बायकांची प्रतिकूलता दूर करण्यांत त्यास चिमणाताईंचें बरेंच साहाय्य झालें असतें. पण तिच्या अभावीं तो विचार त्याच्या दुःखांत भर टाकण्यास मात्र कारणीभूत होत असे.

स्त्रियांच्या बहिष्काराची मजल अखेरीस ऐक्यवर्धक समाजाच्या कार्यक्रमांत भाग न घेण्यापर्यंत जाऊन पोहोंचली. तेव्हां श्यामनेंच आपलें तिकडे जाणें कमी ठेविलें, व थोड्याच दिवसांत आपल्या चिटणिशीचा राजीनामाही दिला. तें पाहून स्त्रीसभासदांनीं पुन्हां समाजाशीं पूर्ववत् व्यवहार सुरू केला. 'ब्राह्मणेतर'पक्ष समाजास मिळाल्यापासून त्याच्या पुरुषसभासदांच्या संख्येंत बरीच भर पडली होती; व त्या सभासदांच्या आप्त स्त्रियाही हळुहळू समाजांत येऊं लागल्यामुळे स्त्रीसभासदांची संख्याही फुगत चालली होती. प्रतिस्पर्धी पक्ष ऐक्यवर्धक समाजांत विलीन झाल्यापासून अस्सल ब्राह्मण्याभिमानी पक्षही नामशेष झाला होता. याप्रमाणें चिमणपुरांतील समाजाची सहतिरूप प्रकृति जरी पूर्वीपेक्षां पुष्कळच निकोप झाली होती तरी ती सुधारणारा धन्वंतरी प्रेमामृताच्या अभावीं उत्तरोत्तर म्लान होत चालला होता. प्रेम हें श्यामचें जीवन होतें. हरिणपुरास असतांना

त्याचें प्रेम सुंदराबाई व दगडू या दोघांमध्येच विभागलेले होते. त्याचा वियोग झाल्यावर त्याच्या जीवितावर औदासीन्याची जी भीषण छाया पसरली तिचा निरास त्याने प्रथम निष्कपट अर्भकाच्या निर्व्याज प्रेमाच्या व नंतर आपल्या शिष्यशिष्यिणींच्या अलोट गुरुभक्तीच्या बळावर बरेच दिवस केला. पुढें त्याच्या आयुष्याच्या क्षितिजावर चिमणाताईसारख्या दैदीप्यमान तारेचा उदय होऊन तें अधिकच उज्ज्वल झाले, व त्या तारेने लोकसेवेचा एक नवीन मार्ग दाखविल्यापासून त्याच्या सुखाचें क्षेत्रही बरच वाढले. आपल्या प्रेमाच्या कक्षेत अस्पृश्याचाही समावेश करून घेता येईल अशी आशा त्याच्या मनात नुकतीच उदित होत होती. पण तिचा पूर्ण उदय होण्यापूर्वीच ती खालीं ढासळून तिचे तुकडे तुकडे झाले. इतकेच नाही, तर त्या आशेबरोबर अर्भकाच्या व शिष्यिणीच्या निर्मळ प्रेमासही त्याला मुकावें लागलें. आपली अप्रियता आपल्या शाळेच्याही सुस्थितीस बाधल्यावाचून रहाणार नाहीं असें दिसताच त्यानें शाळेची जबाबदारी ऐक्यवर्धक समाजाच्या एका ब्राह्मण सभासदाच्या गळ्यात अडकवून तिच्याशीं असलेला आपला संबंध तोडून टाकिला. याच सभासदाच्या मानेवर त्याने समाजाच्या चिटणिशीचें जूंही दिले होतें. याप्रमाणे शाळा व समाज या दोन संस्थाशीं त्यानें बाह्यात्कारी जरी आपली फारकत करून घेतली तरी त्याचे आतून त्यांना पूर्ण साहाय्य असे.

आता त्यास द्रव्यार्जनाकरिता बराच वेळ राहू लागला, व त्याचा त्याने त्या कामी चांगलाच उपयोग करून घेतला. आपल्या आवडत्या संस्थास यापुढे आपल्या अंगमेहनतीचा जरी उपयोग झाला नाही तरी आपल्या पैशाचा व्हावयास हरकत नाहीं, समाजाने आपणास जरी अस्पृश्य लेखिले तरी आपण देणगी म्हणून दिलेल्या पैशास तरी तो अस्पृश्य समजणार नाही असा त्याचा समज होता; व तो यथार्थही होता. नीच धंद्यावर मिळविलेल्या धनाचाही सार्वजनिक संस्थांनीं देणगी म्हणून साभार स्वीकार केल्याचीं उदाहरणे आहेत. स्पृश्य समाजाने चालविलेल्या संस्थांनीं त्याच्या निढळच्या घामाचा पैसा स्वीकारण्याचे नाकारिले असते तर अस्पृश्य समाजाच्या संस्थाप्रीत्यर्थ त्याचा विनियोग करण्याचा मार्ग त्यास मोकळा होता. सार्वजनिक सत्कार्यास मदत करण्याचा त्याचा संकल्प

सत्य दृढ असल्यामुळे त्यास यशही चांगलेच आलें, आणि थोड्याच महिन्यांच्या अवधींत त्याजजवळ बरीच पुंजी जमली.

अशा प्रकारें निष्प्रेम आयुष्य चालले असतां दिवाळीचा सण आला. गत वर्षी भाऊबिजेस त्यानें चिमणाताईकडून ओवाळून घेऊन तिला ओवाळणी म्हणून मोत्यांची कुडी अर्पण केली होती. यदा समग्र स्त्री-समाजानें त्याजवर बहिष्कार पुकारिलेला असल्यामुळे त्यास आपली भाऊबीज ओवाळणीवाचूनच जाणार की काय अशी भीति पडली. त्यानें ओवाळणींत घालण्याकरितां साडीचोळी विकतही आणिली; पण ती कोणास द्यावयाची याचा निर्णय त्यास करितां येईना. अखेरीस भाऊबिजेचा दिवस उजाडला. साऱ्या चिमणपुरांत आपणास ओवाळण्यांत धन्यता मानणारी एकही धर्मभगिनी निघणार नाही का याचा विचार करितां करितां त्यास सध्याकाळ झाली; पण त्या प्रश्नाचें समाधानकारक उत्तर मिळेना. इतक्यांत त्यास कसलीशी आठवण होऊन तो एकदम जागेवरून उठला, आणि कपडे चढवून व ओवाळणीची साडीचोळी बरोबर घेऊन घराबाहेर पडला. त्यानें कुणब्यांमाळ्यांची वस्ती मागें टाकिली, हमालपुरा ओलांडला, ब्राह्मणपुऱ्यास जाण्याचा रस्ता सोडिला आणि थेट गांवाबाहेर जाण्याची सडक धरिली. कांहीं वेळानें त्यास चांभारवाडा व महारवाडा लागला; पण त्यांतही शिरण्याची त्याची इच्छा दिसेना. तो पुढेंपुढेंच चालला. अखेरीस मांगवाडा येतांच तो एकदम थबकला. त्यानें चालण्याच्या श्रमामुळे कपाळावर आलेला घाम पुसला व नंतर मांगवाड्यांत प्रवेश करून नाइकाच्या घराची वाट धरिली. येथें तरी आपला सत्कार होईल की काय अशी त्यास शंका वाटली; पण ती क्षण-भरच. तो थेट घरांत शिरला, व दोन घटका होत तोंपर्यंत बाहेर आला नाही. बाहेर आला त्या वेळी त्याबरोबर नाईक व त्याची पत्नी होती. तिघांच्या मुद्रांवर समाधानाची छटा दिसत होती यावरून श्यामची भाऊबीज त्या घरीं समाधानकारक रीतीनें साजरी झाली होती असें उघड होत होतें. मागील खेपेस नाइकानें श्यामजवळ जे उद्गार काढिले होते तसेच याही खेपेस काढिले.

या वेळेपासून श्याम अधिकाधिक उदास होत चालला. त्याची तीव्र

प्रेमपिपासा वर्षांतून एखादे वेळीं मानीव बहिणीकडून गुप्तपणे ओवाळून घेण्याने कशी शांत होणार ! उलट त्याने तिला प्रखरता मात्र आली. आईची पुन्हा भेट झाल्याशिवाय आपली उदासीनता जाणार नाहीं अशी त्याची खात्री होत चालली. मागाच्या घरीं एकदां जेवल्याबद्दल चिमणपुरच्या नायकानीं त्याजवर कडकडीत बहिष्कार घातला होता. पण आपण मागाच्या घरीं एकदां नाहीं दोनदा जेवलो हे कळूनही आपली पुत्रवत्सल माता आपणास आनंदाने क्षमा करील असा त्याचा पूर्ण विश्वास होता. ज्या माउलीने आपले ओझे नऊ महिने उदरात वागविले ती आपले सारे अपराध पोटांत घालणार नाहीं का ? जन्मदात्रीची व जन्म-भूमीची योग्यता सारखी आहे. पहिली पुत्रात प्राणाचा संचार होण्यापूर्वी त्यास उदरात वागविते व दुसरी त्यातून प्राण उडून गेल्यावर वागविते इतकाच काय तो दोघींत फरक. बाकी अपूर्णावस्थेतील अपत्यास पोटाशी धरण्यासंबधान दोघींचे पूर्ण साम्य आहे. 'जननी जन्मभूमिश्च स्वर्गादपि गरीयसी' या सुभाषितवचनाचे पूर्ण स्वारस्य एकुलत्या एक मुलास जसे कळते तसे इतरास कळत नाहीं. खुद्द सुंदराबाईने आपल्या पुत्रावरील प्रेमाची उत्कटता व निश्चलता दर्शविण्याचा कोणता मार्ग शिल्लक ठेविला होता ? इतर आया आपल्या मुलाचे ओझे नऊ महिने वाहतात तसे तिनेही वाहिले. पण त्यात असामान्य असे यत्किंचित् काही नव्हते. तिच्या प्रेमाचा अखंड झरा वहाण्यास खरी सुरवात त्याच्या जन्मापासूनच झाली. तिच्याठायी दुग्धाचा व प्रेमाचा उद्भव एकदमच झाला. पुढे निसर्गनियमास अनुसरून दुग्धाचा झरा आटून गेला, पण प्रेमाचा झरा पूर्ववत् अखंडच राहिला. पदरीं नोकरचाकर असता श्यामचे खाणेपिणे, दुखणेखुपणे तिने स्वतः खपून उरकले. दासीदासांची मालकीण असतां ती त्याची गुलाम म्हणूनच राबली. ती स्वतः निरक्षर असतां त्याच्या अभ्यासाच्या वेळीं प्रहर प्रहर त्याच्या जवळ तिष्ठत बसली, व स्वतः प्रौढ असताही तिने त्याच्या खेळात त्याच्या बरोबरीने भाग घेतला. त्याच्या बुद्धिमांद्यामुळे त्याची विलायतची सफर व तिजबरोबर उभयतांचा वियोग-ही टळेल या विचाराने तिने त्या बुद्धिमांद्यातही आनंदच मानिला व बळवतरावांकडून त्यास हमेशा मिळणारा मार आपल्या पाठीवर घेतला.

त्यानीं त्यास घरांतून घालवून दिल्यावर तिनें त्यांजपाशी त्याची निष्फळ वकीली करून त्याचे वाग्बाण सहन केले. तो आपणास कायमचा सोडून गेला अशी खात्री होताच तिनें त्याच्या नावाचा टाहो फोडीत अथरूण धरिलें, व त्याची पुन्हां भेट होईल या आशेवरच ती पुन्हा जगण्यास तयार झाली. त्याच्या प्रेमास पात्र झालेल्या त्याच्या बालमित्रावरील राग सोडून देऊन तिनें त्यास आपल्या विश्वासात घेतलें. त्याच्या वस्त्रास त्याचा स्पर्श झाला होता एवढ्याचकरिता तिनें त्याची फाटकी व मळकी वस्त्रे उराशीं बाळगून ठेविलीं, आणि बाळपणापासून शिकण्याचा कटाळा असताही त्याच्या हातची चार अक्षरे वाचावयास सापडावीं येवढ्याचकरिता तिनें अक्षरओळख करून घेतली. मुंग्यानीं बुजबुजलेल्या अवाढव्य वारुळाप्रमाणे माणसांनीं गजबजलेल्या मुंबईंत त्याचा तलास लावण्याची भोळी आशा धरून तिनें पुत्रविरहांत विरगुळा म्हणून वाटणाऱ्या त्याच्या बालमित्राला तेथें पाठविलें, व पर्जन्यबिंदूची प्रतीक्षा करणाऱ्या चातकीप्रमाणें त्याच्या पुनरागमनाची वाट पाहिली. ती आशा निष्फल होताच तिनें वृत्तपत्राच्या रकान्यातून त्याच्या नांवानें हांक मारण्याचा सपाटा लाविला, व त्या पत्राच्या मालकाकडून मिळालेल्या तुटपुंज्या माहितीवर टोलेजंग मनोरथ रचून त्यांच्या सिध्यर्थ त्याच बालमित्राला महाराष्ट्रभर संचार करावयास लाविलें. आपला मुलगा परत आल्यास तो इतरांस दिसण्यापूर्वी आपणास दिसावा या वेडया इच्छेने प्रेरित होऊन ती अजूनही आपल्या घराच्या सज्जात स्टेशनच्या रस्त्याकडे टक लावून पहात प्रहर प्रहर बसत होती. तिच्या प्रेमास मर्यादा नव्हती, आशेस अंत नव्हता व प्रयत्नास विश्रांति नव्हती. यांपैकीं हरिणपुर सोडल्यानंतर घडून आलेल्या गोष्टी श्यामला गोपाळ-रावांच्या तोंडून ऐकावयास मिळाल्या होत्या. त्यांस सुंदराबाईंचीं स्वदस्तुरचीं पत्रेंही आली होती. ती वाचून पहाण्याची अनावर उत्कंठा त्यानें रहस्यस्फोटाच्या भीतीनें मनांतल्या मनांतच दाबून टाकिली होती. त्या पत्रांतील गोपाळरावानी सांगितलेल्या मजकुरानें त्याची मातृदर्शनेच्छा प्रज्वलित झाली होती. अशा वत्सल मातेच्या हांकेस तावडतोब धांवून तिच्या मनाचें समाधान करणें आपलें कर्तव्य असतां तें आपण बजाविलें नाहीं अशी मनाची टोचणीही त्यास रात्रंदिवस

लागून राहिली होती. आईला भेटल्याशिवाय ती टोचणी थांबणें शक्य नव्हतें. हरिणपुरास परत गेल्यावर वडिलांच्या घरीं पुन्हां रहाणें जरी त्यास शक्य नव्हतें तरी दगडूच्या घरीं गुप्तपणें राहून आईची वारंवार भेट घेणें दुर्घट नव्हतें. अशा रीतीनें तिच्या प्रेमळ सहवासांत कांहीं दिवस घालवून तिच्या व आपल्या गत विरहदुःखाचें पूर्ण परिमार्जन करून आणि भावि विरहदुःख सोसण्याची उभयतांच्या मनांची पूर्ण तयारी करून तिच्या परवानगीनें परत यावयाचें असा त्यानें मनाशीं संकल्प केला, आणि तो प्रयाणाच्या पूर्व तयारीस लागला.

'ब्राह्मणेतर'पक्ष ऐक्यवर्धक समाजांत सामील झाल्यापासून हैबती श्यामच्या रात्रीच्या शाळेंत येऊं लागला होता. त्याची बुद्धि त्याच्या भावडांच्याप्रमाणेंच तीक्ष्ण असल्यामुळें व त्यानें शिकण्याचें मनावर घेतल्यामुळें तो थोड्याच महिन्यांत लिहिण्यावाचण्यांत प्रवीणही झाला होता. त्याच्या आयुःक्रमांत एकदम इतकी क्रांति झालेली पाहून श्यामला आश्चर्य वाटलें तसा त्याच्या हेतूबद्दल संशयही आला. पण त्याचें मन जात्या सरळ असल्यामुळें तो संशय त्याच्या मनांत फार दिवस टिकला नाहीं. वास्तविक पहातां 'ब्राह्मणेतर'पक्ष नामोहोरम झाल्यापासून हैबती श्यामवर मनांतून सारखा जळत होता व त्याजवर सूड उगविण्याच्या योग्य संधीची वाट पहात होता. महारवाड्यांत त्याची जी फजीती झाली होती ती वास्तविकपणें त्याच्याच मनोदौर्बल्यामुळें झाली होती. ती घडवून आणण्यांत श्यामचें कांहींच अंग नव्हतें. तो तिला केवळ निमित्तमात्र झाला होता. पण आपल्या तेजोभंगाला श्यामच कारण झाला असें मानून हैबतीनें त्याजवर दंश धरिला होता. त्या दंशास तीव्रता येण्यास आणखी एक कारण झालें. तें असें:—

असहकारितेच्या ऐन भरभराटीच्या काळांत ब्राह्मण-अब्राह्मणामध्यें जसें वैमनस्य माजलें होतें तसें सावकार व कुळें यांमध्येंही माजलें होतें. सावकारांचीं कर्जें बुडविण्याचा कुळांनीं चंग बांधिला, व कर्जें मुदतीबाहेर जाऊं नयेत म्हणून सावकारांनीं फिर्यादी मांडताच त्याजविरुद्ध 'राष्ट्रीय सभेची आज्ञा मोडणारे देशबुडवे' अशी हाकाटी करण्यास सुरवात केली. प्रथम प्रथम त्या कर्जबुडव्यांच्यापेक्षां या देशबुडव्यांचीच

बाजू न्यायाची होती. पण भांडणानें भांडण वाढते या न्यायानें कुळांच्या डावपेचांस प्रत्युत्तर म्हणून सावकारांकडूनही कुटिल नीतीचा अवलंब होऊं लागला. असहकारितावादी कुळे प्राण गेला तरी कोर्टाची पायरी चढणार नाहीत असें पाहून कांहीं सावकारानी त्यांजवर खोटेच दावे मांडून हुकूमनामेही मिळविले. हा अनुभव येताच कुळांनीं वकिलांमार्फत कोर्टाची पायरी चढण्याचा आपद्धर्म स्वीकारिला, व सावकारांवर मात करण्याकरितां त्याना पुरावा मिळू नये अशी एकजुटीने व्यवस्था केली. सावकारांनी ज्याप्रमाणे न दिलेल्या किंवा फिटलेल्या कर्जाचे हुकूमनामे मिळविले होते तसे आता खरे कर्जरोखे शाबीत न झाल्यामुळे किंवा खोटा वसूल शाबीत झाल्यामुळे त्याचे दावे भडाभड रद्द होऊं लागले. खेड्यांतून ब्राह्मणाचें घर एकटे दुकटेच असल्यामुळे त्यास जसा ब्राह्मणेतराकडून त्रास होई तसा मारवाड्यांसही कुळाकडून होऊं लागला. कुळांनी त्याच्या शेतांतील पिके खुशाल कापून न्यावीत व सरकारदरबार झाल्यास बेधडक कानांवर हात ठेवावे असा क्रम प्रत्यहीं सुरू झाला. कांहीं कुळांची मजल तर मारवाड्याच्या घरांची जाळ-पोळ व त्यांच्या बायकांची बेइज्जत करण्यापर्यंतही गेली. या प्रचंड वणव्याची आग चिमणपुरापर्यंत पोहोंचली नाही तरी त्याची धग त्यास मुळींच न लागणे अशक्य होतें. तेथल्याही मारवाड्याची व कुळांची मनें परस्परांविरुद्ध बिथरून गेलीं. तेथें घेलाशेट नांवाचा व्याजबट्टा करणारा एक मारवाडी होता. त्यानें हैबतीस दारू विकत घेण्याकरितां वेळोवेळीं लहान लहान रकमा कर्जाऊ दिल्या होत्या. दारूचें व्यसन जसें वर्धनशील तसेंच ऋणरूपि व्यसनही असतें. हैबतीच्या मागें तर या दोन्ही व्यसनांचा ससेमिरा लागला होता. अर्थातच त्याच्या दारूबाजीबरोबर घेलाशेटचें कर्जही सपाट्यानें वाढीस लागलें. सुदैवानें दारूच्या व्यसनाची वाढ मागे वर्णिलेल्या एका अकल्पित प्रकारामुळे जी खुंटली ती कायमचीच. त्या व्यसनाचा ऋणरूपी परिणाम मात्र मागें शिल्लक राहिला, आणि त्यांत व्याजाची व सवाई, दिढी, बट्टा, हुंडणावळ इत्यादि व्याजाच्याच अनेकविध प्रकारांची भर पडून त्यास लवकरच चांगले बाळसेदार स्वरूप प्राप्त झालें. हैबती असहकारितावाद्यांचा एक पुढारी

असल्यामुळे त्याजवर घेलाशेटाचा दांत होताच. त्याने त्याची जाहीर रीतीनें नामुष्की करण्यासाठीं त्याजवर एका भल्या मोठ्या रकमेचा दावा दाखल केला, व तो आपल्या जिनगीची अफरातफर करणार आहे असें निमित्त पुढे करून त्याच्या जगम मालावर अव्वल जप्ती काढिली. कोर्टाच्या शिपायाच्या हातीं जप्तीचा हुकूम व त्याबरोबर घेलाशेटाची स्वारी दिसताच मल्हारिबाबाची भयाने गाळण उडाली. त्याच्या वयास इतकीं वर्षे झालीं होतीं, पण तीं सारीं त्याने अब्रूने निभावून नेलीं होतीं. कोर्टाशीं त्याचा संबंध असा आजच पहिल्याने आला होता. घरीं पुरुषमंडळीपैकीं तो एकटाच होता. त्याचीं कर्तीसवरतीं मुलें आपापल्या कामधंद्यावर निघून गेलीं होतीं. लहान मुले कुतूहलाने सरकारी शिपायाभोंवतीं गोळा झालीं. त्यांपैकीं एका साधारण समजदार मुलास मल्हारीबाबाने श्यामला असेल तसा आणण्यासाठीं तातडीने पाठविलें, व घेलाशेटास हुकूमनाम्याची कुळकथा विचारिली. ती कळताच म्हातारा दुःखाने मटकन् खालींच बसला. हैबतीच्या व्यसनाची त्यास आजपर्यंत गंधवार्ताही कळली नव्हती. ऐक्यवर्धक संस्थेच्या सभासदांशी झालेल्या त्याच्या वर्तनावरून तो बराच द्वाड आहे असें त्यास वाटत होते. पण तो जन्मभर तसा थोडाच रहाणार आहे, वयोमानाने त्याचे वर्तन निवळलेंच पाहिजे अशीही त्याबरोबरच त्याची खात्री होती. त्याने आज ऐकिलेला प्रकार मात्र अकल्पित होता. त्याच्या घराण्यात एकानेंही आजपर्यंत कर्जपाणी केले नव्हते. मिळेल त्यांतच समाधान मानून संसार हाकण्याचा त्यातील पुरुषांचा आजपर्यंत परिपाठ चालत आला होता. दारूचे व्यसनही त्या घराण्यास आजतागाईत अपरिचित होतें. हैबती आपल्या घराण्याचा भावी आधार, तोच असा फंदी निघाल्यावर त्या घराण्याची धूळधाण व्हावयास उशीर लागणार नाहीं, अशा दुःखद व चिंताजनक विचारात चूर होऊन म्हातारा निश्चल अवस्थेत तेथेंच बसून राहिला.

कांहीं वेळानें श्याम तेथे येऊन पहातो तो कोर्टाच्या शिपायानें घेलाशेटाच्या मदतीने घरातील बहुतेक जगम माल बाहेर अंगणात काढून ठेविला आहे असें त्यास दिसले. चोरांच्या भयाने अंधाऱ्या कोठडीत ठेविलेल्या मोलवान सामानाच्या पेट्या, पावित्र्याच्या कल्पनेने देवघरांत

जपून ठेविलेलीं पूजेचीं उपकरणीं व इतर साहित्य, विटाळाच्या भीतीनें स्वैपाकघरांत जपून ठेविलेल्या लोणच्याच्या वगैरे बरण्या, परक्यांच्या दृष्टी-पासून दूर ठेविलेल्या खाटा व अथरुणेपांघरुणें या सर्वांना आज मारवाड्या-च्या कृपेमुळे मोकळी हवा खावयास मिळाली होती. त्यांतच धान्याची पोती, स्वैपाकाचीं भांडीं, शेतीचीं आउतें, गुराचा चारा इत्यादि किरकोळ पदार्थांचीही गल्लद झाली होती. घरांतील नायका व मुली हे अवचित आलेलें संकट पाहून स्फुदस्फुदून रडत होत्या, आणि अजाण अर्भकें हा काय प्रकार आहे हे न कळल्यामुळे बावरलेल्या दृष्टीनें वडील माणसें व घरांत शिरलेले परके इसम यांच्या चेहऱ्यांकडे आळीपाळीनें पहात होतीं. श्यामनें येतांच "भिण्याचें काहीं कारण नाही." या आश्वासनपर उद्गारांनीं मल्हारीबाबांचें व नायकांमुलांचें समाधान करून त्यांना अंगणांतून घराच्या आतल्या बाजूस पोहोंचविलें, आणि नंतर पंचनामा तयार करण्या-करितां पंचलोक गोळा करण्यास उत्सुक झालेल्या घेलाशेटजवळ जाऊन त्यास म्हटलें, "शेटजी, तुमच्या हातून ही फार वाईट गोष्ट झाली. तुम्ही आज मल्हारीबाबांसारख्या प्रतिष्ठित वृद्ध गृहस्थास विनाकारण कष्ट दिले. तुमचें कर्ज माझ्यासारख्या त्यांच्या आश्रितानेंही फेडून टाकिलें असतें. त्या-करितां या सभावित घराण्याची अब्रू चव्हाट्यावर आणण्याचें कारण नव्हतें. असो. अजून फारसें बिघडलें नाहीं. मी जरा बाहेर जाऊन तुमच्या हुकूम-नाम्याची रक्कम घेऊन येतो. तोपर्यंत मेहेरबानी करून दम खाल तर उपकार होतील. जमादारसाहेब, तुम्हीही जरा सबुरीनें घ्याल तर तुम्हांला अल्लाताल्याचा आणि त्याच्या बच्च्यांबच्च्यांचा दुवा मिळेल." मधुर भाषणाचा प्रभाव द्रव्याच्यापेक्षांही मोठा व तात्कालिक असतो. दोन्ही पक्षकारांकडून लांचलुचपत घेण्यास संवकलेल्या त्या शिपायानें श्यामची विनंति मारवाड्या-च्या कुरकुरीकडे लक्ष्य न देतां ताबडतोब मान्य केली. श्याम घराबाहेर पडला, तो धांवत तडक सहकारी पेढीच्या कार्यालयांत गेला, आणि तिच्यांतून पुरेशी रक्कम काढून धांवतच परत आला. त्यानें हुकूमनाम्याच्या रकमेची पूर्ण भरपाई करून पावती घेतली, बाहेर अस्ताव्यस्त पडलेलें सामान बंदोबस्तानें आंत नेण्यास कुटुंबांतील माणसांस मदत केली, व नंतर तो मल्हारीबाबांच्याजवळ बसून त्यांचें सांत्वन करूं लागला. हैबतीचें व्यसन या-

पूर्वीच सुटले आहे, व आतां तर कर्जातूनही त्याची मुक्तता झालेली असल्या-मुळें यापुढें त्याजबद्दल फिकीर करण्याचें कारण उरलें नाहीं, ही ठोकर बसल्या-मुळे तो पुढे सावधगिरीनेच वागेल असे त्याने त्यांस आश्वासन दिले. मल्हारी-बाबाचा त्याच्या सत्यनिष्ठेवर पूर्ण विश्वास असल्यामुळे त्या आश्वासनानें त्यांच्या मनाचे समाधान झाले. श्यामने ऐन वेळेवर आणिलेल्या पैशाच्या फेडीची त्यांनीं गोष्ट काढिली तेव्हां श्याम त्यांच्या तोंडावर हात ठेवून म्हणाला, "बाबा, तुम्ही मला आपल्या मुलासारखाच मानितां ना ? मग फेडीची गोष्ट कशाला काढितां ? तुम्हीं मजवर केलेल्या अनंत उपकारांची आधी मजकडून फेड होऊं द्या, आणि मग माझ्या उपकारांची गोष्ट बोला. माझें तुमच्यापाशीं फक्त एकच मागणें आहे. या प्रकाराशीं माझा जो संबंध आहे त्याची मुळीच वाच्यता करूं नका. हैबतरावांच्या कानावर तर ही गोष्ट मुळींच जाऊं देऊं नका. त्यांचें मन मजविषयीं कसें आहे हें तुम्हांला माहीतच आहे. त्यांचे कर्ज फेडण्याच्या कामीं माझा थोडाही उपयोग झाल्याचे त्यांना कळले तर ते त्यांना बरे वाटणार नाहीं. तेल जखमेवर लाविलें तर फायदा होईल; पण आगींत ओतले तर भडका मात्र उडेल. मीच मागेंपुढें प्रसंग पाहून त्यांना इत्थंभूत हकीकत सांगेन." त्याने घरां-तल्या इतर जाणत्या माणसांसही तसाच इशारा दिला.

संध्याकाळीं हैबती कामावरून परत आला तेव्हां त्याला शेजाऱ्यांकडून जप्तीच्या हुकुमाबद्दलची सर्व हकीकत कळली. ती ऐकतांच त्याच्या अंगाचा तिळपापड झाला, व तो दांतओंठ खात घेलाशेटच्या दुकानीं गेला. तो त्याच्यावर भडिमार करण्याकरितां तोंड उघडणार तो घेलाशेटच मानभावीपणाने त्याला म्हणाला, "हैबतराव, तुमचींच माणसें जर घर-भेदीं होऊन आम्हांला चिथावणी देऊं लागलीं तर आम्हीं तरी काय करावे, बोला." या वाक्याचा अर्थ न समजल्यामुळे हैबतीनें त्याच्या तोंडा-कडे पाहिलें तेव्हां तो म्हणाला, "हैबतराव, मी आहे सरळ स्वभावाचा माणूस. लावालावी करणे मला मनापासून आवडत नाहीं. मीं जर तुमच्या एखाद्या शेजाऱ्याची तुम्हांजवळ चुगली केली तर तुम्हीच उद्यां मला आगलाव्या म्हणायला कमी करणार नाहीं." हैबतराव मनांत तरकला व खालीं मान घालून घरीं चालता झाला. आपल्या मागें घरीं श्याम

आल्याचें त्यास कळलें तेव्हां तर त्याची खात्रीच झाली. त्यानें सर्व हकीकतीचे धागेदोरे जुळवून त्यांच्या साह्यानें श्यामच्या कपटकारस्थानाची एक सगतवार गोष्ट तयार केली. त्या गोष्टीचा प्रतिनायक अर्थातच श्याम असून त्याने श्वानतुल्य घेलाशेटास छू: करून आपल्या कुटुंबावर सोडिलें, नंतर आयत्या वेळीं येऊन व आपल्या आप्तांच्या कानावर आपल्या व्यसनाची कहाणी घालून त्यांची संकटांतून मुक्तता केली आणि या प्रकारे त्या कुटुंबाच्या बेअब्रूस कारण होऊन उलट त्यावर उपकार केल्याचें श्रेय मिळविले असा तिचा कथाभाग होता. आपल्या गोड भाषणानीं आबालवृद्ध स्त्रीपुरुषांचीं चित्तें आकर्षून त्यांच्या नाशास प्रवृत्त होणाऱ्या या कपटशिरोमणीच्या साऱ्या दुष्कृत्यांचे भयंकर पारिपत्य करण्याचा त्यानें लागलीच निश्चय केला.

श्यामने आपला कांहीं दिवसांकरितां घरीं जाण्याचा संकल्प आपल्या स्नेह्यांस कळविला तेव्हां त्या सर्वांना फार हळहळ वाटली. स्त्रियानीं घातलेल्या बहिष्कारास वैतागूनच तो निघून जात आहे असा त्याचा समज झाला, व तो अल्पांशाने खराही होता. ते म्हणाले, " नाना, बायका म्हणजे महामूर्ख असतात. त्यांना रागावायलाही कारण लागत नाहीं आणि खूष होण्यालाही लागत नाहीं. आज त्या तुम्हांला दूर लोटीत आहेत खऱ्या; पण तुम्ही निघून जाताच त्या आपण होऊन तुम्हांला परतही बोलावतील." श्याम खिन्नपणें हसत म्हणाला, "वाः! तसें असलें तर माझें जाणे त्यांची मर्जी प्रसन्न करण्याकरितां जरूरच म्हटलें पाहिजे." अखेरीस स्नेह्यांनीं मोठ्या कष्टानें त्याच्या प्रयाणास आपली संमति दिली. कोणत्या दिवशीं निघावयाचे याचा मात्र त्याने एकाही गांवकऱ्याला सुगावा लागूं दिला नाहीं. चिमणाताईंस निरोप देतांना गावकऱ्यानीं स्टेशनावर जो टोलेजंग समारंभ केला होता तो त्याच्या आठवणींत होता. ते त्याच्या प्रीत्यर्थही तितकाच, किंबहुना त्याजवरील बहिष्काराचा वचपा काढण्याकरितां त्याहूनही मोठा समारंभ करून त्याजवरील प्रेम व्यक्त करतील याबद्दल त्याची खात्री होती. पण त्यास अशा प्रकारच्या प्रेमप्रदर्शनांचा व गाजावाजाचा मनापासून कंटाळा होता. म्हणून तो कोणासही आपल्या बेताची पूर्व सूचना न देतां एका अमावास्येच्या रात्रीं एकाएकीं आपलें



······त्याच्या मस्तकावर एका मोठ्या सोट्याचा रट्टा बसला, व तो मूर्च्छित होऊन धाडकन् जमिनीवर पडला !

[पृष्ठ १८५.

लहानसें बोचके घेऊन घराबाहेर पडला, व इकडे तिकडे
च्या रस्त्यास लागला. तो निमणपुरास आला त्या वेळे त्या अंगावर उज्ज्वल सूर्यप्रकाश पडला असताही आपणास कोणी ओळखील अशी भीति वाटण्याचे त्यास कारण नव्हते. आज त्याने ते गाव अधाऱ्या रात्री सोडलें असताही त्यास रस्त्याने जाणारा येणारा आपणास ओळखील कीं काय अशी पदोपदीं भीति वाटत होती. गांव बरेंच मागे राहिले तेव्हा त्यास जरा हायसे वाटलें. पण अजून त्याच्या भीतीचें कारण पूर्णपणे नाहींसे झालें नव्हतें. कारण अस्पृश्याच्या वस्तीजवळही त्यास ओळखणारा एखादा इसम भेटण्यासारखा होता. खरोखर त्याच्या गेल्या दोन वर्षांच्या आयुष्यात त्याला भिन्न जातींच्या व विविध स्थितींतल्या जितक्या स्त्रीपुरुषांचा अनुभव आला होता तितक्यांचा अनुभव सामान्य मनुष्यास सबंध जन्मातही येणें दुर्घट असते. त्याने या अल्प अवकाशात जितके उद्योग केले होते तितके सामान्य उद्योगी मा[illegible] एक जन्म पुरून उरण्यासारखे होते. त्याचें शरीर चालण्याची [illegible] क्रिया करीत असतां त्याचे मन चिमणपुरांत आलेल्या असल[illegible] अनुभवाचा धावता चित्रपट पाहण्यांत गुंगून गेलें होतें. यामुळे आपल्या मागाहून कोणी येत आहे कीं काय इकडे त्याचे मुळींच लक्ष नव्हते. इतक्यात त्याच्या पाठीमागे जवळच पावलाची स्पष्ट चाहूल ऐकू आल्यामुळें तो एकदम थबकला. त्यासरशीं तीं पावलेंही थांबलीं. हा केवळ आपल्या मनाचा भ्रम आहे असे समजून तो पुढे चालला; त्याबरोबर मागील पावलेंही चालू झाली. आतां मात्र काहीं तरी दगा आहे अशी त्याची खात्री झाली. बाजूस व महारवाडा होता त्यात शिरल्यास हें संकट टाळिता येईल असे वाटून तो समोरचा रस्ता सोडून बाजूस वळला. दहा वीस पावले चालून जातो तोच त्याच्या मस्तकावर एका मोठ्या सोट्या[illegible] रट्टा बसला, व तो मूर्च्छित होऊन धाडकन् जमिनीवर पडला!

ज्या मनुष्याने हे प्राणघातक कृत्य केलें होतें त्यानें श्यामला फरपटत ओढीत महारवाड्यांतील सर्वांत जवळील घरापर्यंत नेले, व खिशातून एक कुपी काढून तिच्यातील अर्क त्यानें श्यामच्या तोंडावर शिंपडला. गुन्हेगार लोक आपलें स्वरूप बदलण्याकरिता ज्या अर्काचा उपयोग करित[illegible] तोच तो अर्क होता. तो शिंपडतांना त्याच्या तोंडातून खालील

होतेः—" आतां तुझ्या मुखड्यावर कोणती बाई भाळते तें मीच प[illegible]न. तु[illegible] महारांवर मोठें प्रेम आहे ना! येथेच तू त्यांच्या हातचे सरबत मिटक्या मारमारीत प्यालास, नाहीं! आतां जन्मभर मेलेल्या ढोरांचें मांस मनमुराद खात बैस. तुझ्या वाटेस कोणीही जाणार नाहीं." इतकें बोलून व श्याम[illegible]र एक लत्ताप्रहार करून तो मनुष्य तेथून निघाला तो म्हणतां म्हणतां अंधारांत नाहींसा झाला. नाना मराठ्याच्या नांवागांवाचा कोणासही पत्ता लागू नये म्हणून श्यामचे गांठोडें बरोबर नेण्यास तो विसरला नव्हता.

प्रकरण बारावें

## वेषांतर

श्याम काहीं वेळाने शुद्धीवर आला तेव्हां त्याच्या डोक्यांत तीव्र वेदना होत होत्या. तोंडावरील कातडें सोलल्यासारखें झालें असून त्यावर पडलेला अर्क अजून झोंबत होता. अर्क शिपडण्यात आला तेव्हा त्याचे डोळे मिटलेले नसते तर तो दोन्ही डोळ्यांनी अंधळा झाला असता यात शंका नाहीं. डोक्यांतून बराच रक्तस्राव झाल्यामुळे त्याच्या अगीं उठण्याची शक्ति राहिली नव्हती. तो पडल्या जागींच स्वस्थ राहून घडलेला प्रकार आठवण्याचा प्रयत्न करू लागला. आपण बेशुद्ध झालो त्या वेळी हरिणपुरची गाडी साधण्याकरिता स्टेशनाकडे चाललो होतो हें त्यास तावडतोब आठवले. पण ती आठवण होतांच त्याच्या हृदयांत एकदम चर्र झाले. तोंडावरील वेदनांवरून त्यावर भयकर अर्क पडला असून त्याने आपले बहुतेक कार्य उरकले असावे असा त्याने तर्क केला. असे विद्रूप तोंड घेऊन आईकडे गेल्यास ती आपणास मुळीच ओळखणार नाही. किंबहुना आपले दर्शन तिला अपशकुनाप्रमाणेच वाटेल. "मीच तुझा मुलगा श्याम." असे आपण तिला कितीही कंठशोष करून सागितले तरी त्यावर तिचा भरवसाच बसणार नाहीं. जो चेहरा आपले विशिष्ट लक्षण म्हणून ती मानीत आली तो ओळखतां येण्यापलीकडे बदलला असल्यास तिनें तरी पुत्र म्हणून आपला स्वीकार कसा करावा! तिनें आपणास आवाजावरून व इतर खुणांवरून ओळखण्याचा संभव असला तरी तिला हे वेडेविद्रे तोंड दाखवून मरणप्राय दुःख देण्याचा आपणास काय अधिकार आहे! तिला आपण मेल्यासारखेच झालो आहोत. हा विचार मनांत येतांच श्यामच्या डोळ्यांतून झरझर अश्रु वाहू लागले. आपला शोध लावण्याच्या तिच्या भगीरथ प्रयत्नांस अखेर हेंच बक्षीस मिळावें काय? आपला शोध त्वरित लागावा म्हणून ती यापुढे जाहिरातीबरोबर आपला फोटोही देईल. पण त्या फोटोचा उपयोग आपली ओळख पटविण्याच्या कामीं होण्याऐवजीं शोधणाराची दिशाभूल करण्याच्या कामीं

मात्र होईल. या विचारामागोमाग त्याच्या डोक्यात एक आशाजनक विचार येऊन त्यास त्या दुःखांतही किंचित् समाधान वाटले. तिची भेट घेणें जरी शक्य नसले तरी तिला दुरून पहाण्याला काय हरकत आहे? मनुष्य मेल्यावर आपल्या आवडत्या आप्तांस पहाण्याकरिता पिशाचरूपाने परत येत नाहीं का? मग मृत श्यामच्या या पिशाचाला तरी हरिणपुरास जाऊन आपल्या मातृदेवतेचे दर्शन घेण्याला काय प्रत्यवाय आहे? या विचारासरशी त्याची आईला भेटण्याची इच्छा इतकी प्रबळ झाली कीं, तिच्या झटक्यासरसा ताडकन् उठून बसण्याचा त्याने प्रयत्न केला. पण तो सिद्धीस गेला नाही. त्याच्या अंगीं पराकाष्ठेचा अशक्तपणा आलेला असून शिवाय त्याचे अवयव थंडीने गारठूनही गेले होते. घशास इतकी कोरड पडली होती कीं मोठ्याने ओरडून जवळपासच्या लोकांस आपले अस्तित्व जाहीर करणेही त्याला शक्य नव्हते. आतां मात्र आपण येथेच गारठून मरून जाणार अशी त्याची खात्री झाली, आणि मग त्याच्या जिवाची जी कासाविशी झाली तिची योग्य कल्पना त्या स्थितीचा अनुभव घेतलेल्या इसमाशिवाय इतरास होणे शक्य नाही. आईचे दर्शन न होतांच आपणास मरण येणार हा विचार त्यास असह्य झाला. "एक-वार तिचे दर्शन होऊ दे आणि मग मला वाटेल त्या प्रकारच्या हालाचे मरण दे." अशी त्याने देवाची अत्यंत काकुळतीने अनेकवार प्रार्थना केली. पण त्या प्रार्थनेस यश येण्याची त्यास अधुकसुद्धां आशा दिसेना. पहांट लौकर झाल्यास प्रकाशाने तरी आपली दाद लागेल या आशेने त्याने वर आकाशाकडे पाहिले. पण तारका आपला प्रवास नेहमींपेक्षा शतपट मंद गतीने करीत आहेत असे त्यास दिसून आले. असंख्य जीवांचे जननमरण पाहिलेल्या त्या प्रचंड गोलानीं एका क्षुद्र जीवाच्या मातृदर्शनलालसेसाठीं आपले पाऊल लौकर का उचलावे? तो हताश होऊन तसाच पडून राहिला. हळूहळू ग्लानीने त्याचे डोळे मिटले, आणि लौकरच त्यास बाह्य जगाचें भान नाहींसे होऊन तो एका भयंकर मूर्च्छेच्या पूर्णपणें स्वाधीन झाला.

पहांटे भानावर येऊन पहातो तों त्यास आपणाजवळ एक शेकोटी टली असून तिच्या साह्याने आपल्या अंगांत ऊब आणण्याचा एक इसम

प्रयत्न करीत आहे असे दिसून आले. त्या इसमाची दृष्टि कारुण्यपूर्ण असून श्यामवर खिळलेली होती. श्यामने डोळे उघडतांच त्याने म्हटले, "म्हातारेबोवा, झाला सावध एकदांचे? आतां माझा हात धरून धीरेधीरे माझ्या झोपडींत चला. तेथे मी तुम्हाला दूधभाकर खायला देतो, म्हणजे तुम्हाला जरा बरे वाटेल." त्याच्या हाताचा आधार घेऊन श्याम हळूहळू उठला व मंद गतीनें चालत जवळच्या झोपडींत गेला. नंतर त्या इसमाने दुधांत भाकर कुस्करून त्याला खावयास दिली, ती त्याने खाल्ली. पण तिचे चर्वण चालले असतां त्याजकडून "याने मला म्हातारेबोवा का म्हटलें असावे?" या विचाराचेंही चर्वण चाललें होते. दारुण चिंतेनें मनुष्याचे केस एका रात्रींत काळ्याचे पांढरे होतात असें त्यानें पुस्तकांत वाचिलें होतें. त्या नियमाचा प्रभाव आपल्याही केसांवर घडून आला की काय अशी शंका येऊन त्याने जवळ असलेल्या मडक्यांतील पाण्यांत आपलें तोंड न्याहाळून पाहिलें, तो खरोखरच आपले केस सफेत झाले असून आपला चेहराही पूर्णांमुळे ओळखण्यासारखा राहिला नाहीं असें त्यास दिसून आलें. चेहरा इतका बदललेला होता कीं आपण कोण आहोत हें माहीत असताही तो चेहरा आपलाच अशी त्याची खात्री पटेना. एक तर आपले मन तरी आपणास फसवीत असावे किंवा डोळे तरी फसवीत असावेत असें त्यास प्रथम वाटलें. रात्रीं आपले प्राणोत्क्रमण होऊन आपला आत्मा एखाद्या मृत महाराच्या शरीरांत तर शिरला नाहीं ना, अशीही एक वेळ त्यास शंका आली. पण रात्रीं घडलेला प्रकार आठवताच ती दूर झाली. त्या शंकेच्या अनुसंधानानें परकायाप्रवेशाचे विचार त्याच्या मनांत घोळू लागले. त्याने झोपडीच्या मालकास म्हटले, "तुम्हांला परकायाप्रवेशाची विद्या माहीत आहे का?"

झोपडीचा मालक चोखामेळा पंथाचा एक धर्मनिष्ठ व बहुश्रुत महार होता. त्याने म्हटलें, "जादूगाराना आणि योग्याना ती विद्या माहीत असते म्हणतात. खुद्द शंकराचार्यांनीं शृंगारशास्त्राचे रहस्य समजून घेण्या-करितां एका राजाच्या शरीरांत प्रवेश केला होता ही कथा प्रसिद्धच आहे. पण आपणांसारख्या ज्ञान्यांनीं माझ्यासारख्या अज्ञान पामराला हा प्रश्न काय म्हणून करावा याचेंच मला राहून राहून नवल वाटत आहे, महाराज."

"या प्रश्नाचें कारण इतकेंच कीं, आज मला स्वतःलाच परकाया-प्रवेशाचा अनुभव येत आहे."

"त्यांत मला तरी आश्चर्य वाटत नाही, महाराज."

श्यामनें महाराच्या तोंडून इतकी प्रौढ भाषणे कधीं ऐकिली नव्हतीं. तो आश्चर्यचकित होऊन म्हणाला, "तुमचे नांव काय?"

"माझे नांव हऱ्या महार."

"आणि वडिलांचे?"

"रघ्या महार."

"आणि आजोबाचे?"

"नाऱ्या महार."

हरहर! या जातीचा स्वाभिमान वाडवडिलांसही एकेरी नावांनीं संबोधण्याइतका रसातळाला गेला आहे का? ज्या लोकांचा गत काळ इतका अभिमानशून्य त्यांचा भावी काळ तरी आशाजनक कुठून होणार? श्यामनें महारांचीं एकेरी नावे पूर्वीं पुष्कळदा ऐकिली होतीं. पण त्या नांवांचा क्षुद्रपणा आज हऱ्या महाराच्या उच्च संस्कृतीच्या पार्श्वभूमीवर जसा उठून दिसला तसा त्यास आजपर्यंत दिसला नव्हता. तो पुढे म्हणाला, "चांगलीं देवाचीं सुंदर नांवे! तीं अशीं विद्रूप केलीं तर स्वतःचा अपमान झाला नाहीं तरी देवाचा होतो ना?"

"महाराज, आमच्या देवाना तरी कुठें मान आहे? चाभाराच्या देवाला खेटराची पूजा अशी म्हणच आहे मुळीं."

"मग तुम्हाला देवांबद्दलही मुळींच पूज्यभाव नाहीं कीं काय?"

"असे कसे होईल, महाराज? आमचे देव इतर जातींना जरी क्षुद्र वाटले तरी आम्हाला पूज्यच आहेत. मी पंढरीच्या विठोबाचा भक्त आहें. माझी गेल्या वीस वर्षांत एकही वारी चुकली नाहीं. आम्हां पतितांचा देव पंढरीचा विठोबाच. त्याच्या दारीं हा ब्राह्मण, हा शूद्र, हा महार असा भेदभाव नाहीं. जगन्नाथपुरीलाही असाच प्रकार आहे म्हणतात. पण पुरीची यात्रा घडण्याची पुण्याई या जन्मीं तरी माझ्या नशिबीं दिसत नाहीं."

"तुम्ही इतकी प्रौढ भाषा बोलायला कुठें शिकलांत?"

" आपल्यासारख्या साधुपुरुषांच्या सहवासांत कोणती गोष्ट अशक्य आहे, महाराज ? पूर्व जन्मीं जीं अनंत पातकें केली तीं या जन्मीं महार होऊन निस्तरावीं लागताहेत. या जन्मीं आपणासारख्या सत्पुरुषाची सेवा केली तर पुढील जन्मीं तरी थोर जातींत जन्म मिळण्याची आशा !"

" या जन्मात तशी काही आशा नाही म्हणता ? "

" आपल्यासारख्या महात्म्याची कृपा झाली तर या जन्मींही कां नाहीं सद्गति मिळणार ?"

" मला तुम्ही साधुपुरुष व महात्मा समजत आहात असें तुमच्या मघापासूनच्या बोलण्यावरून दिसते. तसें असेल तर ती तुमची मोठी चूक आहे. मी साधुपुरुषही नाहीं व महात्माही नाही."

श्यामचे पहाटेच्या प्रहरीं विलक्षण परिस्थितीत झालेले दर्शन, त्याच्या शुभ्र केसांवरून अनुमीत होणाऱ्या वृद्धावस्थेतही दिसून येणारी त्याच्या शरीराची सुदृढता व कांति, त्याच्या भाषणात आलेला परकायाप्रवेशाचा उल्लेख आणि त्याच्या प्रत्येक वाक्यावरून दिसून येणारे त्याचं सरळ, शुद्ध व दयार्द्र अंतःकरण या लक्षणावरून इन्या महाराने त्याच्या साधुत्वाबद्दल जे अनुमान बांधिले होते त्यास त्याने 'साधुपुरुष' व 'महात्मा' या नावांवर आपला हक्क नसल्याबद्दल दिलेल्या कबुलीनें पुष्टिच मिळाली. अनुमितिशास्त्रात व पुराव्याच्या कायद्यांत मनुष्याने स्वतःच्या हिताविरुद्ध दिलेल्या कबूलीवरून खुशाल त्याजविरुद्ध अनुमान काढावे असा नियम आहे. त्याच्या उलट नियम श्रद्धाशास्त्रांत दिसून येतो. मनुष्याची कीर्तीविषयीं जितकी जितकी अधिक बेपर्वाई तितका तितका त्याचा त्या कीर्तीवरील हक्क अबाधित, व जो जो त्याचा तिजविषयीं अधिक लोभ तो तो त्याची तिजसंबंधाने अपात्रताही अधिक असे श्रद्धाळूंकडून समजण्यांत येते. श्यामच्या विनयावरून काय निष्कर्ष काढावयाचा हे इन्याने आपणाशीं पक्कें ठरविले होते; पण साधुबोवांची आपणावर इतराजी होऊं नये म्हणून तो म्हणाला, " महाराजाची तशी इच्छा असेल तर मी त्यांना साधु किंवा महात्मा म्हणणार नाहीं पाहिजे तर. पण माझ्या मनावर माझा ताबा थोडाच आहे ! आपल्या चरणीं त्याची निष्ठा बसली आहे ती मी कशी दूर सारणार ! "

श्यामने आणखीही एकदोनदां त्याचा चुकीचा ग्रह दूर करण्याचा प्रयत्न केला. पण त्यामुळें खुटा अधिकच बळकट होत चाललेला पाहून त्याने तो नाद सोडून दिला. त्याने ह्यापासून महार समाजाबद्दल बरीच माहिती काढिली. तिजवरून तो समाज बुद्धिमान् व कुशल असतांही स्वाभिमानाच्या व शिक्षणाच्या अभावीं अत्यंत निकृष्ट दशेस पोंचल्याचें त्यास दिसून आलें. इतर अस्पृश्य समाजांचीही कमीअधिक मानाने तीच अवस्था असली पाहिजे असा त्याने कयास केला. या वर्गाची वरिष्ठ जातीकडून उन्नति घडून येण्याची तूर्त तरी त्यास आशा दिसेना. अस्पृश्यांना स्पृश्य वस्तीत रहावयास जागा देण्याची किंवा घरीं नोकर ठेवण्याची सूचना पुढें येतांच ज्या समाजाकडून तिला एकजात विरोध होतो, महाराच्या हातचें पेय घेतल्याबरोबर ज्या समाजांत तें घेणाराविरुद्ध भयंकर काहूर उठतें तो समाज या वर्गांत प्रेमानें मिसळून त्याच्या संस्कृतींत परिवर्तन घडवून आणील अशी अपेक्षा करण्यास तूर्त तरी कारण नाहीं. अस्पृश्यांनीं स्वच्छतेसंबंधानें सुधारणा केल्यास त्यांना स्पृश्य समजण्याचा चिमणपुरकरांनी ठराव केला आहे खरा; पण तो अगदीं अव्यवहार्य आहे. कारण संघट्टनाशिवाय ती सुधारणा शक्य नाहीं, व त्या सुधारणेशिवाय ठरावांत गोंविलेलें संघट्टनही अर्थातच शक्य नाहीं. अस्पृश्य वर्गांनीं आपली सुधारणा स्वतंत्र रीतीनेंच घडवून आणिली पाहिजे. पण ती घडविण्याला जी तयारी असावी लागते ती यांच्यांत मुळींच नाहीं. स्पृश्य जातींतीलच एखादा इसम याच्यांत राहिल्याशिवाय ती तयारी यांच्या अंगीं येणारही नाहीं. आपण एका विलक्षण योगायोगानें या अनाथ समाजांत येऊन पडलों यांत आपणाकडून या समाजाची सेवा व्हावी असा तर ईश्वरी संकेत नसेल ना ? आपलें अध्ययन ब्राह्मणांच्या मानानें जरी निकृष्ट प्रतीचें असलें तरी शूद्र समाजांत शिक्षणप्रसार करण्यास तें समर्थ झालें. तसें या समाजांतही उपयोगीं पडण्यास हरकत नाहीं. आपल्या स्थानांत व स्वरूपांत झालेल्या बदलामुळें आपली कोणासही ओळख पटण्याचें भय बाळगावयास नको. अस्पृश्यांना सुधारण्यांत आपण सारा जन्म जरी घालविला तरी त्याची वर्दी चिमणपुरास लागण्याचें कारण नाहीं. स्पृश्यप्रदेश व अस्पृश्यप्रदेश दोन डोळ्यांप्रमाणें एकमेकांच्या जवळ असले

तरी त्यांस त्याच्याप्रमाणेच परस्पराची ओळख नसते. स्वर्ग व नरक या लोकाप्रमाणेच ते परस्परांपासून पूर्णपणे पृथक् असतात. स्पृश्य गुन्हेगारांस राजदंडापासून स्वतःचा बचाव करण्याचे अस्पृश्य वस्तींतील वास हे जितके खात्रीचे साधन आहे तितके देशांतर किंवा लोकांतर हेही नाही. पवित्र देवालयाचा आश्रय केला असता राजदंडापासून रक्षण होत असल्याची अनेक देशांत उदाहरणे सापडतील. पण अपवित्र स्थानाच्या आश्रयाने तसे रक्षण होण्याची सोय हिंदुस्थानातच काय ती आहे. आपले काळे तोंड आईबापांना न दाखविण्याचा आपला हेतुही येथे जसा तडीस जाईल तसा दुसरीकडे जाणार नाही. असा अनेक दृष्टींनी विचार करून श्यामने महारवाडा हेच आपले वसतिस्थान कायम करण्याचे ठरविले.

आपली कोणास ओळख पटू नये म्हणून केवळ बदललेल्या स्वरूपावर विसंबून न राहतां विशेष खबरदारी घेण्याचा त्याने संकल्प केला. डोईच व दाढीचे केस वाढविणे आणि शक्य तेथपर्यंत संभाषणाचे प्रसंग टाळणे किंवा तसे प्रसंग आल्यास आपला खरा स्वर लपवून कृत्रिम स्वर काढणे हीच ती खबरदारी होय. पण या प्रकारानी त्याच्या साधुत्वाच्या कीर्तीत अनपेक्षितपणे भरच पडली. लवकरच त्याच्या मस्तकावरील केसांच्या जटा झाल्या, व त्याच्या हनुवटीपासून छातीवर लांब दाढी लोंबू लागली. त्याजकडे दर्शनार्थ येणाराची संख्या सपाट्याने वाढू लागली. त्याने धारण केलेले मौन संदिग्ध असले तरी त्याच्या साऱ्या भोळ्या भक्ताच्या मनांतील अर्थ एकदम व असंदिग्धपणे व्यक्त करण्यास पूर्णपणे समर्थ असे. 'मौन सर्वार्थसाधनम्' या वाक्याची सत्यता श्यामला अगदी निराळ्याच अर्थाने पटू लागली. साधुसंतांच्या आचरणाचा किंवा उद्गाराचा अर्थ ज्याच्या त्याच्या अपेक्षेप्रमाणे किंवा इच्छेप्रमाणे लावण्यात येतो हा श्रद्धाशास्त्राचा आणखीही एक नियम आहे. पापी लोक श्यामचे मौन कोपाचे तर निष्पाप लोक प्रसन्नतेचे लक्षण समजत. त्याच्या तोंडून एखादे वेळी एखादे वाक्य निघाले की त्याचेही अर्थ अनेकांकडून अनेक करण्यांत येत. चमत्कार असा की ते सारे खरे ठरत. अर्थ करणें हेच जेथे श्रोत्यांच्या मर्जीवर तेथे ते अर्थ खोटे ठरण्याचे कारणच नसे. श्यामने एखाद्याच्या प्रश्नास दिलेलें उत्तर खोटे जरी ठरले तरी त्या उत्तराचा अर्थ लाक्षणिक

करावयाचा असतां आपण शब्दशः केला याबद्दल तो स्वतःसच दोषी ठरवी. याप्रमाणे वाटेल त्या शब्दावर मनाप्रमाणे वाटेल तो अर्थ बसविण्याचें आणि पुढे तो वाटेल तेव्हां वाटेल तसा फिरविण्याचे, अशा भाविकाच्या दुहेरी स्वातंत्र्याच्या जोरावर श्यामचा प्रत्येक शब्द खरा ठरू लागला, आणि महान् साधु म्हणून त्याची चोहोकडे कीर्ति पसरू लागली. त्याजविषयीं प्रत्यहीं अनेक अद्‌भुत कथा निर्माण होऊं लागल्या. सांगणाराची जीभ जितकी लवचिक व ऐकणाराचें वास्तव्य चिमणपुरापासून जितकें दूर तितके त्या कथेतील अद्‌भुततेचें प्रमाण असे. त्याच्या व हऱ्या महाराच्या पहिल्या भेटीच्या हकीकतीचें रूपांतर होत होत तिला शेवटीं याप्रमाणें स्वरूप प्राप्त झालें:—हऱ्या महार पहांटे तुकारामाचे अभंग म्हणत शेकोटीवर भाकरी भाजीत बसला होता. पण त्याचें तिकडे चित्त नसल्यामुळे त्यापैकी एक भाकरी जळून गेली. त्याबरोबर शेकोटींतून एक दिव्य मूर्ति उत्पन्न होऊन त्याजपुढे उभी राहिली. ती मूर्ति अग्निनारायणाचीच होती. "तूं अर्पण केलेल्या भाकरीवर मी संतुष्ट झालो आहे. वाटेल तो वर माग." असें तिनें म्हणताच हऱ्यानें हात जोडून "आपण मनुष्यदेह धारण करून माझ्या गरिबाच्या झोपडींत वास्तव्य करावें." अशी इच्छा प्रगट केली. "तथास्तु" म्हणून त्या मूर्तीनें जवळ पडलेल्या एका प्रेताच्या शरीरांत प्रवेश केला. तो चमत्कार पाहून हऱ्या गर्भगळित झाला. त्यास परकायाप्रविष्ट अग्निनारायणाने हात देऊन झोपडींत आणिलें. तेच हे साधुबोवा होत. शेकोटी, भाकरी, श्यामची अशक्तता व परकायाप्रवेशचा उल्लेख यावर येवढें मोठें अद्‌भुतरामायण रचण्यांत आलें. त्यांतील कांहीं गोष्टी अगदीं असंभवनीय असून कांहीं गोष्टी घडलेल्या प्रकाराशीं पूर्णपणे विसंगत होत्या, व त्यांचा खोटेपणा थोड्या चौकशीअंतीं उघड होण्यासारखा होता. परंतु त्या दिशेने चौकशी केल्यास साधूचें सत्त्व पहाण्याचा घोर अपराध घडावयाचा या भीतीनें त्या साऱ्या गोष्टी निमूटपणें गिळून पचविण्यांत आल्या. नवीन साधूचें नांव त्याच्या मुख्य गुणावरून 'मौनी बुवा' ठेवण्यांत आलें; पण निकटवर्ती शब्दांच्या आद्याक्षरांचा अनुप्रास साधण्याची जी आवड मनुष्यांत स्वाभाविक असून अलीकडे महाराष्ट्रीयां-

मध्यें विशेष जोरावली होती तिला अनुसरून त्या नावाचें लवकरच 'मौनी महाराज' असें रूपांतर झालें.

आपण कितीही प्रतिकूलता दाखविली तरी आपल्या अंगीं नसतें साधुत्व चिकटण्याचें टळत नाहीं अशी खात्री होताच श्यामनें त्या साधुत्वाचा आपल्या इष्ट कार्यासाठीं उपयोग करण्याचें ठरविलें. तीं कार्यें अर्थात्च शिक्षणप्रसार व जातिभेदाचा बीमोड हीं होतीं. पहिल्या कार्याच्या सिद्ध्यर्थ त्यानें झोंपडीजवळच्या खुल्या जागेवर अस्पृश्य मुलामुलींसाठीं दिवसाची व प्रौढ स्त्रीपुरुषांकरितां रात्रीची अशा दोन शाळा सुरू करण्याची ह्न्या महारास आज्ञा केली. महार समाजात ह्न्याशिवाय विशेष साक्षर लोक नसल्यामुळें दोन्ही शाळांतील अध्यापनाचें काम प्रथम ह्न्यासच करावें लागे. त्या कामांतून मुक्तता होऊन साधुमहाराजाची अखंड सेवा करण्यास लौकर मोकळीक मिळावी म्हणून ह्न्यानें जिवापाड खपून लौकरच चार हुशार शिष्य तयार केले, आणि त्यांपैकीं दोघांकडे दिवसाच्या व दोघांकडे रात्रीच्या शाळेचें काम सोपवून दिलें. शाळेंतील पाट्या, पुस्तकें इत्यादि शिक्षणोपयोगी साहित्याचा खर्च साधुमहाराजापुढें भेटीदाखल ठेवण्यांत येणाऱ्या द्रव्यांतूनच होत असे. लौकरच साधुमहाराजांनीं साक्षर मनुष्याशिवाय कोणाचीही भेट न घेण्याचा आपला निश्चय जाहीर केला. हा नियम त्यांनीं जनसमर्दापासून होणारा त्रास चुकविण्याकरिताच केला आहे असा दर्शनेच्छु लोकांचा साहजिकच समज झाला. पण ते लोक इतके वस्ताद कीं महाराजाच्या दर्शनास अंतरण्यापेक्षां ती अट पार पाडणेंच त्यांना पसंत पडलें. सत्पुरुष भक्ताची कसोटी पाहण्याकरितां नेहमीं कांहीं तरी जबर अट ठेवीत असतात, तशांतलीच ही अट आहे असा त्यांचा समज झाला. हळूहळू महाराच्या शाळांतून विद्यार्थ्यांची भरती सपाट्यानें होऊं लागली. शिक्षणपरिषदांकडून किंवा कायदेमंडळाकडून शिक्षणप्रसाराचें जें काम होण्यास भगीरथ प्रयत्न व दीर्घ अवधि लागतो तें काम केवळ एका साधूच्या आज्ञेनें कसें चुटकीसरसें होतें याचा श्यामला चांगलाच अनुभव आला. त्यानें भक्तांची साक्षरतेची परीक्षा घेण्याकरितां तुकारामाच्या अभंगांची गाथा जवळ ठेविली होती. कोणी त्याच्या पायां पडावयास आलें कीं प्रथम गाथा उघडून तिच्यांतील

एखादा अभंग त्यास वाचावयास देण्यांत येई; व त्याने तो घडाघड वाचिला म्हणजे त्यास चरणस्पर्शाचा हक्क प्राप्त होई. हा चरणस्पर्शाचा सोहळा करून घेण्याचा श्यामला नेहमी कंटाळा असे, व तो बरेच दिवस "मी साधु नाहीं." या मंत्राचा उच्चार आपणापेक्षा वडील माणसांपुढे तरी करण्यास चुकत नसे. पण त्याचा इष्ट परिणामाहून अगदीं निराळा परिणाम होतो हे पाहून त्यानं आस्ते आस्ते आपला आग्रह सोडून दिला.

एके दिवशी मांगवाड्यातील लोकांकडून ह्न्या महारामार्फत मौनी महाराजांपुढे एक गाऱ्हाणे मांडण्यात आले. महाराच्या शाळेत चांभारांना घेण्यात येत, पण मांगाना घेण्यात येत नाहीं अशा अर्थाचे ते गाऱ्हाणं होतं. ते ऐकून श्यामला अत्यंत खेद झाला. "हरहर! हिंदुस्थानात जातिभेद नाहीं असं एकही ठिकाण सापडणार नाहीं का? इंग्रज लोक गोरे व काळे असा भेद करितात म्हणून आम्हांला राग येतो. पण गोऱ्यांनी बहिष्कृत मानिलेल्या आम्हा काळे लोकात तरी तसे भेद कमी आहेत का? अस्पृश्य लोकावर ते काळे म्हणून गोऱ्या लोकांचा व ते घाणेरडे धंदे करणारे म्हणून स्पृश्य हिंदूंचा असा दुहेरी बहिष्कार आहे. पण म्हणून अस्पृश्यांना अशा बहिष्कारांचा तिटकारा आहे असा कोणी ग्रह केला तर तो चुकीचा ठरेल. वरिष्ठ जातीत उच्चतेच्या आधिक्यावर श्रेष्ठतेची उभारणी आहे व कनिष्ठ जातीत नीचतेच्या न्यूनतेवर आहे, इतकाच काय तो फरक! सुस्थितीच्या शिखरावर बसलेल्यांनाच उच्चनीचतेच्या या बारकाया काढण्याची फुरसद असते असें नाही, तर दुःस्थितीच्या पंकांत लोळणारां-नाही असते! चांभार, महार व मांग या तिन्ही जाती घाणेरडे धंदे करितात. पण मेलेल्या जनावरांच्या कातड्याशी संबंध ठेवणारे चांभार तशा जनावरांचें मांस खाणाऱ्या महारमांगांना बहिष्कृत समजतात, व महारमांग परस्परांना समजतात. पुन्हा ते दोघे हलालखोरांना नीच समजण्यापुरते परस्परवैर विसरून एक होतात! पण या बिचाऱ्याना तरी दोष कसा द्यावयाचा! शहाणेसुरते व शिकलेसवरलेले लोक जें करितात त्याचेंच अनुकरण हे करणार!" असे विचार त्याच्या मनांत बराच वेळ घोळत होते.

दुसऱ्या दिवशीं ह्न्या महाराच्या मुखाने साधुमहाराजांच्या आणखीही कांहीं अटी जाहीर करण्यांत आल्या. त्या याः—"यापुढें जो इसम मेलेल्या

जनावराचे मांस खाईल त्याला त्यांच्या दर्शनाचा अधिकार रहाणार नाही. महारवाड्यातील शाळा महाराजांच्या आज्ञेने सर्व अंत्यजांच्या फायद्याकरिता काढिल्या असल्यामुळे तेथे स्पर्शास्पर्शविचार करील त्याजवर महाराजांची अवकृपा होईल. खुद्द महाराजांच्या मठींत तसा कोणताच विचार करण्यात येणार नाही. यापुढे दर्शनास येणाऱ्या इसमास साधा प्रसाद न मिळता शुचिर्भूत मांगानीं तयार केलेल्या भाकरींचे तुकडे मिळत जातील.तो प्रसाद महाराजादेखत भक्षण न केल्यास त्याचा अपमान होईल."

या छादिष्टपणाच्या अटींनी लोकांचा मौनी महाराजावरील विश्वास उडण्याऐवजीं दृढमूल मात्र झाला. छादिष्टपणा, अचरटपणा, तिरसटपणा हीं महान् साधु ओळखण्याचीं साधनें होत. त्यांचा मौनी महाराजांच्या ठायीं प्रादुर्भाव होऊं लागला तसतशी समाजातील शकेखोर लोकांचीही त्याजवर श्रद्धा बसू लागली. अजून महाराजांनीं दर्शनास येणारावर शिव्यांचा व माराचा प्रयोग करण्याची सुरवात केली नव्हती. तशी सुरवात ते लवकरच करितील अशी भाविकांना प्रबल आशा वाटूं लागली. त्यांच्या तोंडचा व हातचा पहिला प्रसाद आपणास मिळावा अशी एक चोरटी आशाही त्यांच्या असस्सल भक्तांच्या मनात एखादे वेळी डोकावत असल्यास आश्चर्य मानण्याचे कारण नाही.

भाकरीच्या प्रसादास सर्व भक्तांची तयारी होती. साक्षरतेची अट अमलात आणणें मात्र तितकें सोपें नव्हतें. पण ती ज्या मानानें कठिण त्या मानानें ती पार पाडिता येण्याकरिता निरक्षरांचे प्रयत्नही जारीचे असत. यामुळे अस्पृश्यांच्या वस्तींतून चार सहा महिन्यातच निरक्षरतेची हकालपट्टी झाली. त्यांची साक्षरता अल्पकालिक न ठरता चिरस्थायी व्हावी म्हणून स्वामींच्या आज्ञेने एक वाचनालय काढण्यात आले. त्याचा उपयोग करण्याची अस्पृश्यांना तर मोकळीक असेच; पण महाराजांचें दर्शन घेण्याकरिता स्पृश्य वर्गाचे जे लोक अधिकाधिक प्रमाणात येऊं लागले होते त्यासही तें खुलें असे. महाराजांच्या मठींत गर्दी असल्यास दर्शनेच्छु स्पृश्य व अस्पृश्य वाचनालयात परस्परास खेटून पुस्तकें व वृत्तपत्रें वाचितांना अनेकदां दिसून येत.

साक्षरतेची शर्त मुलांच्या व प्रौढांच्या बाबतीत जरी कडकपणानें

अमलांत येत असे तरी लिहिणेवाचणे शिकण्यास पूर्णपणे असमर्थ अशा वृद्धांकरितां व दुर्बलांकरितां ती बरीच सैल सोडण्यांत येई. चिमणपुरच्या मांगवाडयाची वाजन्त्र्यांकरितां फार ख्याति होती. त्यामधील कांही वादन-कुशल मांग आपल्या कामांत गांवांतील गुरवांपेक्षाही तरबेज होते. त्यांपैकीं कांही वृद्ध सनईवाले महाराजांची आपणाकडून अल्प सेवा घडावी म्हणून एक दिवस त्यांच्या मठीबाहेर बसून वाजवूं लागले. त्यांचे मधुर वादन श्यामला इतके आवडले कीं त्याने त्यास आत बोलावून त्यांची त्यांच्या कौशल्याबद्दल प्रशंसा केली, व ते आपल्या अंगचा गुण इतरांस शिकविण्यास तयार आहेत का असा त्यांस प्रश्न केला. ते आपल्या कलेचे खरे अभिमानी होते, यामुळे त्यांनी त्या गोष्टीस तावडतोब आपला रुकार दिला. दुसऱ्या दिवसापासून महारवाडयांतील शाळास गायनवादनाचे वर्ग जोडण्यात आले.

साक्षरतेची अट शिथिल करण्याचे असे एखादे दुसरें अपवादरूप उदाहरण घडले तरी प्रसादाचा नियम मात्र अत्यंत निष्ठुरतेनें अमलांत येई. प्रसादाच्या भाकरी तयार करण्याचे काम मातंग समाजातील पधरां-पासून वीस बावीस वर्षांच्या स्वच्छ मुलांमुलींकडे नेमून दिलें होतें. त्याज-कडून ते रोज प्रातःकाळीं स्नानें झाल्यावर शुचिर्भूतपणें उरकण्यात येई. त्यांपैकी एक एक मुलगा आळीपाळीनें मठीत भाकरींची चळत घेऊन बसे व भक्तांस भाकरीचे तुकडे करून वाटी. त्या मुलाचा पोषाख इतका स्वच्छ ठेवण्यांत येत असे कीं तो पाहून अनेकदां दर्शन घेणारास आपल्या कपड्यांची लाज वाटे, व त्यास तेथे मानसिक शुद्धतेबरोबर शारीरिक निर्मळपणाचाही धडा मिळे.

मौनी महाराजांची कीर्ति चिमणपुरच्या खास वस्तीत जाऊन पोहोचण्यास फार उशीर लागला नाहीं. त्यांच्या अद्भुत कथा त्या पसरविणारांच्या हातचे तिखटमीठ लागून व खमंग होऊन भाविकांच्या बुभुक्षित कर्णांस रोजच्या रोज चाखावयास मिळू लागल्या, आणि त्यांवरून ते अवतारी पुरुष असल्याबद्दल त्यांची खात्री होत चालली. प्रसादादाखल मिळणाऱ्या भाकरी शेकोटींत जळलेल्या भाकरीचीच अपत्ये असून त्या केवळ महा-राजांच्या श्वासोच्छ्वासांपासून रात्रींतल्या रात्रींत निर्माण होतात, महाराज

निद्रावस्थेंत असले म्हणजे त्यांच्या ठायीं अग्निनारायणाचे 'चत्वारि शृंगा त्रयोऽस्य पादा द्वे शीर्षे सप्तहस्तां' असे रूप स्पष्टपणे दिसते अशा कांहीं गोष्टींची त्या कथांत भर पडून महाराजांचे चरित्र आतां एखादें स्वतंत्र पुराण लिहिण्याच्या योग्यतेचें झाले होते. त्याचे दर्शन घेण्याची एक अट तर चिमणपुरातील बहुतेक स्त्रीपुरुषांकडून पार पडण्यासारखी होती. दुसरी जरा जांचण्यासारखी होती. पण तिचे वैलक्षण्य साधुसताच्याच चरित्रांतले दाखले घेऊन दूर करितां येण्याजोगें होते. "अनेक साधुसंत स्वतः अमंगळ पदार्थ खाऊन भक्ताकडूनही सत्त्वपरीक्षेसाठीं खाववीत असतात. रामदासस्वामीनीं कल्याणशिष्याकडून आपले गळू चोखविले व ते आंब्याप्रमाणे मधुर असल्याचा त्यास प्रत्यय आणून दिला. मौनी महाराजाच्या भाकरीचाही तसाच प्रभाव असला पाहिजे. त्याशिवाय ते आपल्या भक्ताना त्या चारीत नसावेत." असा कोटिक्रम चिमणपुरात वारवार ऐकू येऊ लागला. त्यांचे दर्शन घेण्याची पहिली उठावणी ऐक्यवर्धक संस्थेच्या पुरुषसभासदास त्यांच्या बायकांकडून मिळाली. त्या बायकांचा श्यामवरील राग हा वेळपर्यंत पार निवून गेला होता. आपल्या इतराजीमुळे खिन्न होऊनच श्यामने चिमणपुरांतून पाय काढिला व इतके दिवस होऊनही पुन्हां त्यांत पाय ठेविला नाहीं हे पाहून त्यांची कोमल अंत:करणे कळवळून गेली होती. आपल्या नवऱ्यांवर व लेकरावर त्याचे किती अकृत्रिम प्रेम होते व त्या प्रेमाची फेड प्रेमानें करण्याऐवजीं आपण त्यास किती निष्ठुरतेने वागविले याची आठवण होऊन त्यांस कृत कर्मांचा तीव्र पश्चात्ताप होऊ लागला होता. श्याम रस्त्याने जात असतां त्याजकडे हंसऱ्या चेहऱ्याने पाहिल्याबद्दल ज्या स्त्रिया आपल्या अर्भकांना रागे भरत असत त्याच आतां आपण होऊन त्यांच्यासमोर त्याचे नांव उच्चारू लागल्या, व तीं अर्भकें गोरीं-मोरीं तोंडें करून रस्त्याकडे आशाळभूत नजरेने पाहू लागतांच त्यांची समजावणी करण्याकरितां त्यांस पोटाशीं धरू लागल्या. मौनी महाराजांचा भाकरीच्या प्रसादाबद्दलचा आग्रह कळल्यापासून त्यांस आपल्या वर्तनाची लाजही वाटू लागली होती. श्यामचा आकर्षक चेहरा पहाण्याची व मधुर भाषण ऐकण्याची त्यांची उत्कंठा वाढू लागली, आणि तो आपल्या

गांवीं कांहीं दिवसांकरितांच गेला असतां अजून परत का येत नाहीं याची चौकशी करण्याची त्यांनीं आपल्या पतीच्या मागे निकड लाविली. वायकांच्या मनांत याप्रमाणें इष्ट प्रकारचा फरक पडलेला पाहून नवऱ्यांना साहजिकच आनंद झाला. पण त्यांचा इष्ट पुरविण्याचे साधन त्यांच्या हातीं मुळींच नव्हते. नाना मराठे हरिणपुर स्टेशनावर गाडींत बसला यापलीकडची माहिती मल्हारीबाबांनाही नव्हती. श्यामने दगडूस लिहिलेलें पत्र मुंबईहून हरिणपुरास रवाना करण्याकरितां स्टेशनावरील एका अधिकाऱ्यापाशीं दिलें होतें ही गोष्ट एकाही ग्रामस्थास माहीत नसून त्या अधिकाऱ्याची चिमणपुराहून बदली झालेली असल्यामुळे ती पुढेंही माहीत होण्याचा संभव नव्हता. यामुळे श्यामच्या परत येण्याची वाट पहात हात जोडून स्वस्थ बसण्यापलीकडे कोणासही कांही करितां येण्यासारखें नव्हतें. अशा स्थितींत गांवकऱ्यांचीं चित्तें आकर्षून त्यास श्यामचा विसर पाडण्यासारखा एखादा नवीन विषय पाहिजेच होता; व तो मौनी महाराजांच्या लोकोत्तर चमत्काराच्या रूपानें आयताच सांपडला.

ऐक्यवर्धक समाजाचे वरेच पुरुषसभासद अंशतः स्वतःच्या व अंशतः स्त्रियांच्या प्रेरणेनें महाराजांचे दर्शन घेण्याकरितां महारवाड्यांत गेले तेव्हां त्यांना त्यांत फारच सुधारणा झाल्यासारखी दिसली. बहुतेक सर्व महारांचे पोषाख स्वच्छ व नीटनेटके दिसले. त्यांच्या तोंडांवर साक्षरतेचें तेज चमकत होतें, व त्यांच्या वागणुकींत शिष्टपणाची झांक दिसत होती. पूर्वीं त्यांच्या ठिकाणीं वरिष्ठांबद्दल फाजील नम्रपणा व कनिष्ठांबद्दल फाजील तुच्छता दिसत असे, त्याबद्दल आतां निर्भयपणा व सहिष्णुता यांचें योग्य मिश्रण दिसून येत होतें. त्यांना शिक्षणाचें दार खुलें झाल्यामुळें तद्द्वारा प्राप्त होणारा ज्ञानसंग्रह, कलाकौशल्य, संपत्ति व सत्ता यांच्या वाटाही मोकळ्या झाल्या होत्या. परंतु त्याजप्रमाणें इतरांसही साक्षरतेचा लाभ झाल्यामुळे त्यांजमध्ये अहंकाराचा व तत्संबद्ध दुर्गुणांचा प्रादुर्भाव झाला नव्हता. त्यांपैकीं एकास चिमणपुरकरांनीं मौनी महाराजांचें ठिकाण विचारलें असतां त्याच्या चेहऱ्यावर बरेंच आश्चर्य दिसून आलें. पण तें आवरून त्यानें त्यांचें मार्गदर्शकत्व पत्करिलें, व तो त्यांस महाराजांच्या मठीकडे घेऊन गेला. मठींत बरीच गर्दी असल्यामुळे

त्यानें त्यापैकीं कित्येकास जवळच्या वाचनालयात बसावयास सांगितलें व इतरास शाळा दाखविण्यास नेले. शाळा उघड्या जागेत भरलेली असून तिच्यात सर्व अस्पृश्य जातीची मुले जवळजवळ बसलेली होतीं, व त्याना शिक्षक दक्षतेनें शिकवीत होते. सर्वांचे पोषाख निर्मळ व टापटिपीचे होते. चर्या व स्वच्छता यावरून मुले व शिक्षक वरिष्ठ जातीतील नाहींत असें कोणासही म्हणता आलें नसतें. मुलांच्या अभ्यासाची चाचणी पहाता तेही समाधानकारक दिसून आले. अलीकडे महारवाड्यावरून पक्षिणीची कांडी फिरली की काय असा स्वतःस प्रश्न करीत चिमणपुरकर मंडळी बुचकळ्यात पडली. इतक्यात महाराजाच्या दर्शनास जाण्याची सूचना आली. त्याबरोबर शाळेतील व वाचनालयातील चिमणपुरकर मंडळी मठीकडे गेली. दर्शनेच्छूंच्या सोयीकरिता मठी बरीच विस्तृत करण्यात आली होती. तिच्यात सर्व चिमणपुरकराचा एकदम समावेश होण्यास अडचण पडली नाहीं. आपले सहकारी मित्र आपणासमोर अदबीनें उभे राहिलेले पाहून श्यामला गहिंवर आला. पण त्यानें तो दाबून त्याना बसण्याची खूण केली. नंतर इऱ्या महारानें त्याजकडून क्रमानें गाथेतील अभंग वाचून घेतले. सर्वांचे वाचन झाल्यावर श्याम त्याना म्हणाला, "तुम्ही सारेच कांहीं ब्राह्मण नाहीं. असें असता तुम्हांपैकीं ब्राह्मणेतरांचे वाचन ब्राह्मणांच्याइतकेंच अस्खलित आहे ही आश्चर्याची गोष्ट आहे" गोपाळराव देशमुखानी प्रश्न केला, "आम्हांपैकीं ब्राह्मणेतर कोण हे आपण ओळखिलें ? बाकी ओळखिलें असल्यास नवल नाहीं. भगवतापासून कोणती गोष्ट लपून रहाणार ?" श्याम म्हणाला, "तुमच्या जातीच केवळ नाहीत, तर नावेंही मला सांगता येतील." इतके बोलून त्यानें चिमणपुरकरांपैकी कांहीं कुणब्यामाळ्याकडे बोट दाखवून त्याची नांवे लागोपाठ सांगितलीं. ते पाहून ते सर्व आश्चर्यानें एकमेकांकडे पहात राहिले. नंतर त्याना आपण कोण आहोंत याचा संशय येऊ नये म्हणून श्यामनें म्हटलें, "माझी जात कोणती असावी असें तुम्हांला वाटते ! मी महारवाड्यात रहातो यावरून मी अस्पृश्य जातीचा आहे अशी तुमची समजूत झाल्यास ती चुकीची ठरेल. मी शुचिर्भूत ब्राह्मण आहे. मजकडून लहानपणी ब्रह्मकर्मांचे बरेंच अध्य-

यन झालें आहे." असें म्हणून त्याने संध्या, पुरुषसूक्त इत्यादिकांतील कांहीं ऋचा घडाघड म्हणून दाखविल्या. त्या ऐकून त्याच्या श्रोत्यांची त्याच्या ब्राह्मणत्वाबद्दल इतकी खात्री झाली कीं त्यांस जरी कोणी "नाना मराठे तो हाच." असें सांगितलें असतें तरी त्यावर त्याचा विश्वास बसला नसता. नतर श्याम म्हणाला, "मी ब्राह्मण आहे हे ज्याप्रमाणे सहसा कोणास खरे वाटत नाहीं त्याप्रमाणे आमच्या शाळेतील मुलें अस्पृश्यांची आहेत हे देखील त्यांच्या रहाणीवरून खरे वाटणार नाहीं. फार दूर कशाला! हा प्रसाद वांटणारा मुलगा मांगाचा आहे हे तरी कुणास खरे वाटेल का?" सर्वांनीं मुलाकडे पाहिले तो तो मुलगा श्यामवर्णाचाच पण मोहक व पाणीदार चेहऱ्याचा आणि ब्राह्मणाइतकाच स्वच्छ दिसून आला. सौंदर्य व स्वच्छता याचें बहुधा नेहमी साहचर्य दिसून येते. सुदर मनुष्य कुरूप मनुष्यापेक्षां स्वच्छतेविषयीं नेहमीं अधिक दक्ष असते. ज्या अपवादात्मक उदाहरणांत सौंदर्य असून स्वच्छता नसते तेथेही सौंदर्यास व स्वच्छतेस साधारण असणाऱ्या निरामयत्व, हास्य, लकाकी, टवटवीतपणा, मार्दव इत्यादि गुणावरून सौंदर्याबरोबर स्वच्छतेचेही वास्तव्य असल्याबद्दल प्रेक्षकाचा ग्रह होतो. यामुळें सुदर मनुष्याच्या हातचे खातांना स्वच्छतेबद्दल चिकित्सा करितांना फारसें कोणी दिसत नाहीं. श्यामने दाखविलेल्या मांग छोकऱ्याच्या हातून भाकरी खाण्यास आपणास कांहींच विधिनिषेध वाटणार नाहीं असें चिमणपुरकरांनीं तावडतोब कबूल केलें. त्यानतर त्यांजमध्ये आणखीही कांहीं वेळ सवाद झाला. तो असा:—

गोपाळरावः—अस्पृश्य जातींत इतकी सुधारणा घडवून आणणे महाराजांस करतलामलकवत् आहे. आमच्यापैकीं एका सुशिक्षित शूद्रानें कांहीं दिवसांपूर्वीं हा सुधारणेचा प्रयोग शूद्र जातीवर करून पाहिला, व त्यास यशही बरेच आले. हल्लीं तो आपल्या गावीं निघून गेल्यामुळें आमचा सुधारणेचा गाडा थांबल्यासारखाच झाला आहे. महाराज अंतर्ज्ञानी आहेत. त्यांनीं आम्हांला त्या इसमाचा पत्ता सांगितल्यास आम्ही त्यास परत आणण्याची व्यवस्था करू.

श्यामः—( किंचित् विचार केल्यासारखे दाखवून ) त्याचा पत्ता मला

माहीत आहे; पण तूर्त सांगतां येत नाहीं. तो कांहीं काळानें तुम्हांस भेटेल येवढेंच सांगण्यास मी तूर्त मोकळा आहे.

गोपाळ०:—मग तोपर्यंत महाराजानीं तरी आम्हांवर अनुग्रह करून आमच्या वस्तींत रहाण्यास यावें अशी चरणांपाशी विनंति आहे. आम्ही आपणाकडून आपली सर्व व्यवस्था उत्तम ठेवण्याची खटपट करूं.

श्याम:—मी येथें येऊन राहिलों आहे तो स्वतःच्या सोयीसाठीं असा तुमचा समज आहे काय?

गोपाळ०:—असें कसें होईल! सताच्या विभूति जगाच्या कल्याणाकरितांच अवतरावयाच्या. पण आपण आमच्यांत आल्यानेंही आपणांकडून जगाचें कल्याण होण्यांत अंतराय येणार नाहीं.

श्याम:—तुम्ही समजतां त्याप्रमाणें माझ्यांत जगाचें कल्याण करण्यासारखें मुळींच सामर्थ्य नाहीं ही गोष्ट मी इतरांपाशीं स्पष्ट केली आहे तशी तुमच्यापाशींही मला केली पाहिजे. पण माझें जे कांहीं अल्पस्वल्प सामर्थ्य आहे त्याची जरूर तुमच्यापेक्षां अस्पृश्यांनाच आहे.

गोपाळ०:—आमच्यांतही एक मागसलेला वर्ग आहे, आणि त्यास आपल्या सानिध्याची तितकीच जरूर आहे.

श्याम:—तो वर्ग कोणता?

गोपाळ०:—आमच्या स्त्रियांचा. मी नुक्तेंच ज्या सुशिक्षित शूद्राबद्दल बोललों तो एका मागाकडे जेवल्यामुळें आमच्या स्त्रियांनीं त्याजवर गहजब करून सोडिला; तो इतका कीं त्यामुळें वैतागून तो आमच्या गांवांतून निघून गेला असावा असा आमचा तर्क आहे. या एकाच गोष्टीवरून आमच्या स्त्रियांची दृष्टि अजून किती कोती आहे हें दिसून येईल.

श्याम:—असें असेल तर मी तिकडे येऊन रहाण्यापेक्षां तुमच्या स्त्रियांनीच महारवाड्याला आपल्या भेटीचा लाभ देत जावा हें बरें. त्यानें तुमच्या स्त्रियांची दृष्टिही विस्तृत होईल, आणि त्यांचे आचार पाहून आमच्या अस्पृश्य भगिनींचे आचारही सुधारतील.

गोपाळ०:—महाराजांची आज्ञा आम्हांला शिरसावंद्य आहे. पण महाराजांचा आम्हांकडे रहाण्यास येण्याचा अनुग्रह होत नाहीं हें पाहून आमची फार निराशा होत आहे.

श्यामः—निराशा होण्याचे कांहीं कारण नाहीं. एखादे वेळीं तुमच्या-ही वस्तीत रहाण्याचा योग येईल. ज्या दिवशीं तो शूद्र इसम येईल त्याच दिवशी मीही तुमच्या वस्तींत येईन इतकें आश्वासन तूर्त तुम्हाला पुरें होईल असें वाटते.

गोपाळ०:—इतकें आश्वासन मिळालें हीमुद्धा आम्ही मोठीच कृपा समजतो. महाराज आपल्या नेहमींचा नियम मोडून आमच्याशी इतक्या मोकळ्या मनानें बोलले हाही आम्हावर महाराजाचा मोठाच प्रसाद झाला.

यानतर भाकरीचा प्रसाद घेऊन चिमणपुरकर मडळी आपल्या वस्ती-कडे जाण्यास परतली.

दुसऱ्याच दिवशीं चिमणपुरच्या ब्राह्मण व शूद्र स्त्रिया महाराजाच्या दर्शनाकरिता आल्या. महाराज त्याच्याशींही फार मोकळ्या मनाने बोलले. नाना मराठ्यावर बहिष्कार टाकिल्याचा त्याना पूर्ण पश्चात्ताप झाल्याचे जेव्हा त्याच्या उद्गारावरून व वर्तनावरून दिसून आलें तेव्हा महाराजास त्यांची फार दया आली. त्यानीं पुरुषाप्रमाणेंच त्यानाही नानाच्या पुन-र्दर्शनाबद्दल आश्वासन दिले तेव्हा त्याचे समाधान झाल्यासारखं दिसले. त्यांनीं आपलीं मुले महाराजांच्या पायावर घातली तेव्हा त्यानी त्याना वर उचलून जवळ घेतलं व प्रेमानें कुरवाळिले. मुलांसही महाराजा-च्या जवळ असता परिचित ठिकाणींच असल्यासारखें वाटलें, आणि तीं महाराजाची दाढी ओढून व इतरही सलगी करून त्याच्याशीं मोकळे-पणाने वागली. [illegible]ठकुरवाळ्या नायकाचें दुसऱ्याविषयींचे मत त्याचें आपल्या अपत्याशीं व अपत्याचें त्याच्याशी जे वर्तन होते त्यावरून बनत असते.) आपली अपत्यें महाराजाना व महाराज अपत्याना आवडले हें पाहून त्यांचा अपत्याबद्दलचा अभिमान व महाराजांबद्दलचा पूज्यभाव बरोबरीनेच द्विगुणित झाला. प्रसादाची भाकरी खाताना त्याना मुळीच किंतु वाटला नाहीं. त्यांनीं भाकरीचे तुकडे आपल्या मुलांस खावयास दिले, व त्याच्या मुखाचे मुके घेऊन पर्यायाने प्रसादाचे दुसऱ्यांदा भक्षण केलें. त्या वेळीं आपण नाना मराठ्याशीं किती अन्यायानें वागलो याची त्यांना तीव्र जाणीव होत असावी असें दिसत होतें.

त्यांनीं महाराजांचा निरोप घेतला तेव्हां त्यानीं आपल्या अस्पृश्य बहिणींना

उपदेश करून व स्वतः कित्ता घालून देऊन त्याच्या रीतीभाती सुधाराव्या अशी महाराजांनीं त्यांजपाशीं इच्छा व्यक्त केली. त्या इच्छेची पूर्तता त्यांनीं कशी केली असेल याचा अजमास ब्राह्मण स्त्रियांनी शूद्र स्त्रियांना सुधारतांना ज्या उपायांचा अवलंब केल्याचे मागें वर्णिले आहे त्यावरून करितां येईल. सबब त्याचे येथे निराळे वर्णन देत नाही. येथे इतकेच सांगितले असतां पुरे होईल, कीं भाषेशिवाय इतर बाबतींत अस्पृश्य स्त्रियांमध्ये कांही महिन्यांच्या अवधींतच विलक्षण सुधारणा झाली. भाषेतही जरा मंद गतीने पण निश्चितपणे सुधारणा होऊं लागली. स्त्रियांबरोबर त्यांचे पुरुष आतही अस्पृश्यांच्या घरीं जाऊं येऊं लागल्यामुळे अस्पृश्य पुरुषांच्याही रहाणींत अनायासे इष्ट दिशेने फरक पडूं लागला. नाटकमंडळीने स्त्रियांकरिता अर्धा दर ठेविल्यास पुरुषांचीही तिकिटे आपोआप खपून तिला भरपूर उत्पन्न होते हा अनुभव माहीत असल्यामुळेच कदाचित् मौनी महाराजांनी ऐक्यवर्धक मंडळाच्या पुरुषसभासदास अस्पृश्य पुरुषांच्या बाबतींत स्वतंत्र सूचना केली नसावी. पण तशी सूचना केली असता जितका कार्यभाग झाला असता तितकाच तिच्या अभावींही झाला.

ऐक्यवर्धक मंडळाच्या स्त्रीपुरुषसभासदास एका ठिकाणीं मात्र चांगलाच विरोध करण्यात आला. ते मांगवाड्यांतील आपल्या कामगिरीस नाइकाच्या घरापासूनच सुरवात करण्याचा विचार करून प्रथम त्या घराकडे गेले. दारांतच नाईक उभा होता. त्याने त्यांस आंत जाण्यास अटकाव करून मगरुरीच्या स्वराने म्हटले, "माझ्या वेटाळांत कोणाही परक्या इसमानं यायचे काम नाहीं. मी आणि माझे नातलग मागसलेले आहों तेच बरे आहोत. आमच्या हातचे जेवण ज्यांना गोड वाटत नाहीं, फार काय पण आमच्या बसकरावर बसणेही ज्यांच्या जिवावर येते अशांच्या मदतीची आम्हांला मुळीच जरूर नाहीं. आमचें आम्ही पाहून घेऊं." हे बोलत असतां नाईक गोपाळरावांकडे खुनशी नजरेने पहात होता. सभासद मंडळी खट्टू होऊन मांगवाड्यातील इतर भागांत गेली. त्या दिवसाचे काम उरकल्यावर त्यांनी घडलेली हकीगत महाराजांस सांगितली. ती ऐकून महाराज एक दीर्घ निश्वास टाकून म्हणाले, "अजून या हतभागी देशाचे नष्टचर्य पुरतें संपले नाहीं असे दिसतें."

ज्या दिवशीं श्यामने नाइकाच्या घरीं प्रथम भोजन केले त्या दिवशीं त्याजबरोबरच्या गोपाळराव वगैरे इतर मंडळींनीं भोजनाबद्दल तर राहोच, पण बिछायतीवर बसण्याबद्दलही जी किळस दाखविली होती ती नाइकाच्या मनात तेव्हांपासून सारखी डाचत होती. त्या प्रकारापूर्वी महारवाड्यांत त्याच मंडळींनीं महाराच्या हातचें सरबत पिताना जी तत्परता दाखविली होती तिच्या तुलनेने त्यांचे ते वर्तन त्यास फारच अपमानास्पद वाटत होते. महारवाड्यांत सुद्धां हैबतीप्रभृति 'ब्राह्मणेतर' पक्षीय मंडळींनीं समोर सरबत दिसतांच कसे हातपाय गाळले होते हें कळल्यापासून हैबतीवरही तो सारखा जळत होता. हैबती व गोपाळराव यांवर सूड कसा उगवावयाचा हा विचार रात्रदिवस त्याच्या मनात घोळत होता. त्याने आता गोपाळराव वगैरे मंडळींशी जे तिरसटपणाचें वर्तन केलें त्यावरून त्याची प्रत्यपकारबुद्धि चांगलीच दिसून आली. मांगाची जात क्रूर व खुनशी असते तशी कृतज्ञ व इमानीही असते. श्यामनें नाइकाशी जाहीरपणें जेवण्याचें जे औदार्य दाखविलें होतें तेंही तो विसरला नव्हता. भाऊबिजेच्या दिवशीं श्यामने त्याच्या घरीं फराळ करून व त्याच्या बायकोस बहीण मानून तिजकडून ओवाळून घेतलें तेव्हा त्याची कृतज्ञता वज्रलेप झाली. त्याच्या उपकारातून आपणास उत्तीर्ण कसे होता येईल याचाही तो विचार करू लागला. श्याम निघून गेल्याचें त्यास कळलें तेव्हां त्याचा फार हिरमोड झाला, व तो परत येण्याची आशा जों जों मावळू लागली तों तों त्याची तळमळही वाढत चालली. अखेरीस त्यासबधाने त्याची पूर्ण निराशा झाली तेव्हां त्याच्या तुंबून अनावर झालेल्या प्रत्युपकारबुद्धीचा पुढील मार्ग खुंटल्यामुळें ती उपरिनिर्दिष्ट प्रत्यपकारबुद्धीचे स्वरूप धारण करून तिच्या मार्गाने वाहू लागली, व त्यांचा एक प्रचंड ओघ बनून तो आपल्या हतभागी भक्ष्यांचा ग्रास करण्याच्या निमित्ताचीच वाट पहात राहिला. गोपाळराव व हैबती यांच्या बेपर्वाईबद्दल सूड उगवणें म्हणजे पर्यायाने श्यामच्या आपलेपणाची फेडच होय असें त्यानें आपल्या मनाचे समाधान करून घेतले, आणि श्यामनें आपल्या कृतज्ञतेस अवसर न दिल्यामुळे जशी आपली निराशा केली तशी आपल्या तावडींतून सुटून जाऊन करण्याची आपल्या वैऱ्यांस संधिच न देण्याचा त्यानें निर्धार केला. अर्थात् त्यास आपलें काम सावधगिरीनें, गुप्तपणें व तांतडीनें करणें भाग होतें.

प्रकरण तेरावें

## सूड व पश्चात्ताप

शारदाबाईचा नवरा चिमणराव देशपांडे हा अत्यंत बुद्धिमान् पुरुष होता. विद्यालयांत शिकत असतां त्याची प्रत्येक परीक्षा चांगल्या प्रकारें उत्तीर्ण झाली असून त्यानें इंग्रजी भाषा, तर्कशास्त्र, तत्त्वज्ञान इत्यादि विषयांतील प्रावीण्याबद्दल बक्षिसेंही मिळविलीं होतीं. विद्यार्थ्यांच्या साप्ताहिक सभांतून तो प्रमुखपणें भाग घेत असून आपल्या वादविवाद-कुशलतेनें प्रतिपक्ष्यावर चांगलीच छाप पाडीत असे. सामाजिक सुधारणा हा त्याचा आवडीचा विषय असे. तिचें मंडन करितांना तो प्रतिपक्ष्यास कुंठित करण्याकरितां जो बिनतोड युक्तिवाद करी त्यावरून हा पुढें सुधारकचमूचा धुरंधर नायक होणार याबद्दल कोणासही संशय रहात नसे. घरींसुद्धां सामाजिक विषयाची चर्चा निघाली असतां तो सुधारणेचाच कैवार घेई. त्याच्या पत्नीच्या विचारांत, उच्चारांत व आचारांत समाज-सुधारणेची कळकळ इतक्या जाज्वल्यपणें दिसून येई याचें कारण त्याची शिकवणच होय. विद्यार्थिदशा संपवून वकिलीच्या धंद्यांत शिरल्यावर तेथेंही त्यानें थोड्या अवकाशांत आपल्या बुद्धिमत्तेनें, वादकौशल्यानें व धीट-पणानें पुढें येऊन यशस्वी वकिलांत आपली गणना करून घेतली. स्वार्थ-साधनाबरोबर थोडीबहुत देशसेवा करण्याचाही त्याचा विचार होता. पण ती समाजसुधारणेच्या द्वारानें करण्यापेक्षां राजकारणाच्या द्वारें करणेंच लोक-प्रियतेच्या व द्रव्यसंपादनाच्याही दृष्टीनें श्रेयस्कर आहे असा अनुभव येऊं लागल्यामुळें त्याचें सुकाणू सामाजिक सुधारणेकडून राजकीय सुधारणेकडे वळूं लागलें. राजकारणांतही प्रागतिक व राष्ट्रीय असे दोन तट आहेतच. प्रागतिक पक्षास समाजांतील जातिभेदादि वैगुण्याची पूर्ण जाणीव असल्यामुळें ऐक्याच्या जोरावर राजकीय हक्क मिळविणें तूर्त तरी अशक्य वाटतें, व यामुळें सरकाराशीं सहकार्य करून आपलें राजकीय ध्येय गांठणें हाच त्यांचा मार्ग असतो. त्या मार्गाशीं समाजसुधारणेचा अर्थातच विरोध

नसतो. किंबहुना समाजांतील कृत्रिम भेद नाहींसे करून त्याच्या घटकावयवांमध्ये पूर्ण ऐक्य स्थापित करणे हेच अंतिम राजकीय ध्येय गांठण्याचें खरे साधन आहे असा त्यांचा विश्वास असतो. हा मार्ग युक्तिसिद्ध व व्यवहार्य असला तरी त्यांत स्वदोषाबद्दल गर्भित कबूली असल्यामुळें तो मार्ग अभिमानी व भावनावश समाजास पटण्यासारखा नसतो. राष्ट्रीय पक्षाचा मार्ग सरकारास विरोध करून वठणीस आणणे हा असतो. समाजाकडून एकजात विरोध व्हावयास त्यांत एकोपा पाहिजे; व हा एकोपा समाजापुढे त्यांतील घटकावयवांमधील वैमनस्ये उगाळीत न बसता स्वराज्याभावामुळे होणारी हानि, स्वराज्यप्राप्तीमुळे व्हावयाचा लाभ इत्यादि त्या घटकावयवास समान असणाऱ्या गोष्टींची चर्चा करूनच उत्पन्न करण्यासारखा आहे असे त्या पक्षास प्रामाणिकपणे वाटते. राष्ट्राचा गत इतिहास प्रागतिक पक्ष सुधारणेच्या दृष्टीने स्वराज्यहानीचीं कारणे शोधून काढण्याकरिता चाळितो तर राष्ट्रीय पक्ष त्यांतील आदर्शभूत व्यक्तींच्या व संस्थांच्या उदाहरणांनीं राष्ट्राचा स्वाभिमान जागृत करण्याच्या हेतूने चाळितो. अर्थातच भावनावश बहुजनसमाज या पक्षाचा अभिमानी असतो. या दोन पक्षाचे विशिष्ट सद्गुण अनुक्रमे दुसऱ्यांविषयी आदर व स्वाभिमान हे समजण्यास हरकत नाही. या सद्गुणाचा अतिरेक झाला म्हणजे त्यांस अनुक्रमे नेभळेपणाचें व हेकडपणाचें स्वरूप येते. त्यांपैकीं पहिल्याचे दुसऱ्यापेक्षां व दुसऱ्याचे पहिल्यापेक्षा किंचित् आधिक्य ज्या पुरुषांत दिसून येते ते अनुक्रमे आदर्शभूत प्रागतिक व राष्ट्रीय असून परस्परास व राष्ट्रास आदरणीय वाटतात. असो. तर याप्रमाणे सामान्य प्रागतिक बहुधा समाजसुधारकही असतो, व सामान्य राष्ट्रीय समाजसुधारणेसंबधानें प्रतिकूल नसला तरी उदासीन तरी खास असतो. चिमणरावाचे मन राष्ट्रीय पक्षाकडे झुकू लागले तसतसे ते स्वाभाविकपणें सामाजिक सुधारणेपासून परावृत्त होऊं लागले. त्याने मनासारखे पैसे मिळू लागतांच पूर्व संकेताप्रमाणे शारदाबाईस आपल्या गावीं आणविले, त्या वेळीं त्याच्या मनांत पूर्ण परिवर्तन झाले होते.

शारदाबाईनें चिमणपुरांत घडून आलेल्या सामाजिक क्रांतीचें पतीपाशीं इत्थंभूत वर्णन केलें. तें ऐकून त्यास फार आनंद होईल व ती क्रांति पर्यायानें

आपल्या उपदेशाचेच फळ असल्याबद्दल अभिमानही वाटेल अशी तिची अटकळ होती. पण त्या बाबतींत तिची पूर्ण निराशा झाली. ती हकीकत ऐकून त्यास आनंद होण्याऐवजी त्रास मात्र जराच झाल्यासारखा दिसला. त्याने तिरसटपणाने तिला विचारले, "पण तुला इतक्या उठाठेवी करायला कोणी सांगितले होते ?"

शारदाबाई मृदुपणाने म्हणाली, "मी जे काही अल्पस्वल्प केले ते इकडच्याच प्रेरणेने आणि उपदेशाने ना ?"

"उपदेश करणे निराळे आणि तो आचरणात उतरविणे निराळे."

"उपदेश तरी आचरणात उतरविण्यासाठीच असतो ना ?"

"आचरणात उतरावयाचा असला तरी तो तावडतोब नाही. त्यास काळ जावा लागतो. प्रथम विचार, नंतर उच्चार व शेवटी आचार अशी सुधारणेची सोपानपरंपरा आहे. सुधारणेचे शिखर गाठण्यास पायरीपायरीनेच गेले पाहिजे. 'चिनली मुरी आणि घातली उरी' असे करून कसे चालेल ? आपण त्या शिडीतील उपदेशाची दुसरी पायरी गाठली आहे, व तितके आपल्या पिढीला बस आहे. आचाराची तिसरी पायरी पुढील पिढीकरिता आहे. तिचे ती पाहून घेईल."

"त्या तीन पायऱ्या क्रमाक्रमाने चढावयास पाहिजेत हे मलाही कबूल आहे. पण दोन पायऱ्यामध्ये ठराविक काळ गेलाच पाहिजे असे नाही. स्वराज्याचेच उदाहरण घ्याना ! आकाशातल्या चांदोबाप्रमाणे त्याचे दुरूनच कौतुक केले पाहिजे असे एका प्रागतिक मताच्या इंग्रज मुत्सद्द्याने म्हणून एक तपही झाले नाही तोच प्रत्यक्ष स्वराज्याचा पहिला हप्ता आमच्या पदरात पडतो; आणि तो पडून किंचित् काळ जातो न जातो तोच संपूर्ण स्वराज्याची मागणी नेमस्त व जहाल मिळून एकोप्याने लौकरच करण्याची चिन्हे दिसत आहेत."

"जहाल नव्हे, राष्ट्रीय. मवाळ व राष्ट्रीय हे शब्द तू योजायला पाहिजे होते."

"बरे तर, मवाळ व राष्ट्रीय. शब्द बदलून त्यांच्या गुणावगुणात फरक थोडाच पडणार आहे ! शिवाय त्यांच्यात मतभेदाच्या बाबी कितीही असल्या तरी संपूर्ण स्वराज्याची मागणी करण्यांत त्यांचे एकमतच रहाणार आहे ना ?"

"राजकीय सुधारणाचा प्रश्न सामाजिक सुधारणेच्या प्रश्नाहून अगदी निराळा आहे. स्वराज्य लौकर मिळू द्या, म्हणजे सामाजिक सुधारणा चुटकीसरशी करितां येईल. सामाजिक सुधारणा आमची आम्हांलाच करावयाची आहे. ती आम्ही पाहून घेऊ."

"पुरुषाना व वरिष्ठ जातींना सामाजिक सुधारणेसंबंधाने जितकी सबूरी वाटते तितकी नायकाना व कनिष्ठ जातींना साहजिकच वाटत नाही. त्याना त्या सुधारणेचें स्वराज्यप्राप्तीइतकेंच महत्त्व वाटतें. आपण म्हणतां की तो प्रश्न आपसांतला असल्यामुळे सोडवायला सोपा आहे. मी म्हणतें, तो आपसातला आहे म्हणूनच तो सोडविणें कठिण जाणार आहे. फार कशाला ? परकीय राज्यकर्त्यांनी आपणास स्वराज्याचा पहिला हप्ता तरी दिला आहे. पण आपण ब्राह्मणांनी अस्पृश्याना सडकेवरून पडवीत तरी देण्याची मोकळीक ठेविली आहे का ? आम्ही स्वराज्यप्राप्तीनंतर त्याना सामाजिक हक्क चुटकीसरसे देऊन टाकू या आपल्या म्हणण्यावर त्याचा विश्वास तरी कसा बसावा ? त्याना आपल्यापेक्षां परकीय राज्यकर्त्यांचाच विश्वास अधिक वाटला तर त्याना आपण दोष कसा देणार ? "

"स्त्रियाना स्वातंत्र्य मिळण्यापूर्वीच तू आज आपल्या जिभेला पूर्ण स्वातंत्र्य दिल्यासारखे दिसते."

"मीं आपणापाशी मन मोकळे करूं नये तर कोणापाशीं करावें ?"

"कां बरे ! त्या नाना मराठ्यापाशीं तू काय कमी पोटउकला केला असशील ?"

"भावाची गोष्ट निराळी आणि पतीची निराळी. स्त्री आपली लज्जाच पतीच्या स्वाधीन करीत असते. ती भावाशी कितीही मोकळेपणे वागली तरी त्याजमध्यें थोडा तरी पडदा असावयाचाच."

"मला त्या नानाला पहाण्याची फार उत्कंठा वाटत आहे. तुझ्या सांगण्यावरून त्याने चिमणपुरकरांच्या, विशेषतः स्त्रियांच्या अंतःकरणांत बराच प्रवेश केल्यासारखा दिसतो."

"आपण त्याला पाहिले तर आपणांलाही तो आवडेल. मोठ्या माणसांचें तर राहोच, पण लहान लहान लेकरे सुद्धां त्याला पाहिलें की त्याच्या कडेवर जाण्याला झांपटा कितात."

"बायकांना नाहीं ना तशी कांहीं इच्छा होत!"

"इश्श! कांहीं तरीच म्हणायचे झाले!"

तो संवाद इतक्यावरच थांबला. पण आपल्या पतीच्या मनात आपणाविषयीं कांही तरी विकल्प आला आहे असे वाटून शारदाबाईचे मन तेव्हापासून फार अस्वस्थ झाले. चिमणराव तिच्यापाशीं नीट वागेनासे झाले. पूर्वी गावात एखादी सभा झाल्यास ते त्या सभेस तिला आपल्याबरोबर घेऊन जात. पण अलीकडे त्यानी तो प्रघात अजीबात सोडून दिला. शारदाबाईने सभेस जाण्याची गोष्ट काढिल्यास ते कपाळाला आठ्या घालून "बायकाना येवढेही स्वातंत्र्य देण्याला मी तयार नाही." असे म्हणून तिला निरुत्तर करीत. त्यांनीं राष्ट्रीय पक्षाच्या कार्यक्रमात अलीकडे बरेच लक्ष्य घातले होते. त्या पक्षाचे पुढारी नागपुर येथील राष्ट्रीय सभेच्या ठरावातील तत्त्वांचा प्रसार करण्याकरिता जे दौरे काढीत त्यात चिमणराव प्रमुख भाग घेत. त्याना सामाजिक सुधारणेच्या तत्त्वाप्रमाणे राजकीय सुधारणेचीं तत्त्वेही अमलात आणण्याची फारशी आवश्यकता भासत नसे. ते स्वतः तलम विलायती कापड वापरीत असतां खादी वापरण्याचा व स्वतः वकीली करीत असता वकीली सोडण्याचा उपदेश करीत. ज्या बाबींशीं त्याचा संबंध नसे त्यात परस्पर असहकारिता घडवून आणण्याकरिता ते प्रतिपक्षावर वाग्बाणांचा चागलाच भडिमार करीत. ते स्वतःस अपत्य नसतां सरकारी शाळात मुले पाठविणारास नामर्द ठरवीत, देशातील एक गुंठाभरही जमीन स्वतःच्या मालकीची नसतां सरकारी सारा देणारास देशद्रोही म्हणत, कायदेमंडळांत स्वतः निवडून येण्याचा संभव नसता त्याकरिता उमेदवार म्हणून उभे रहाणारास 'सरकारचे बगलबच्चे', 'सरकारच्या ताटाखालचीं माजरे', 'पदव्यांसाठीं हपापलेले' अशा शेलक्या पदव्या बहाल करीत. त्यांचा उत्तरोत्तर होणारा नैतिक अधःपात पाहून शारदाबाईस अत्यंत खेद होई. पण तिने त्यासंबंधानें ब्र काढिल्यास चिमणराव तिला तिरस्कारानें "तुला उपदेश करावयाचा असल्यास चिमणपुरकराना कर. मला करून न करून सारखाच." असें म्हणत.

एके दिवशीं डांकेनें चिमणरावाच्या नांवचा एक लिफापा आला, व तो

तिनें टपालाच्या शिपायाच्या हातून घेऊन पतीस नेऊन दिला. पाकिटावर चिमणपुरचा शिक्का होता. पत्त्याच्या अक्षरांचे वळण ओबडधोबड होते. चिमणपुराहून येणारीं पत्रें नेहमीं गोपाळरावांचीच असत. आजचें पत्र त्यांच्या हातचें नसून अगदीं अपरिचित अक्षराचें आहे हें पाहून शारदाबाई दचकली, व त्यांतील मजकूर कळण्याच्या उत्कंठेनें तेथेंच जवळ उभी राहिली. पत्र वाचतां वाचतां चिमणरावाचा चेहरा सपाट्यानें बदलत गेला. ते संपतांच तो रागानें लाल झाला. पत्र बायकोसमोर कांपऱ्या हातानें हलवीत तो चढत्या आवाजानें म्हणाला, "तूं चिमणपुराला जे गुण उधळलेस त्याचा हा पाहिलास का पुरावा ! तूं आणि नाना मराठे मिळून तेथें जो धुडगूस घातला त्याचें एक भलें मोठें रामायणच झालें म्हणायचें! पण अगोदर सांग, ही कानातली कुडी तुला कुणीं दिली ?"

भाऊबिजेच्या ओंवाळणीसारख्या साध्या गोष्टीवर आपल्या व श्यामच्या एखाद्या वैऱ्याकडून एक कुतर्काचें गुंतागुंतीचें जाळें विणण्यांत आलें असून त्यांत आपणास पकडण्याचें त्याचें दीर्घसूत्री कारस्थान सुरू झालें आहे हें पाहून शारदाबाई मनांत फार भ्याली. हैबतीच्या मनांत श्यामबद्दल धुमसत असलेल्या वैराग्नीची श्यामनें वाच्यता केलेली नसल्यामुळें त्याची तिला कल्पना नव्हती. निरक्षर हैबती पत्र लिहितां येण्याइतका शिकला असेल याचेंही तिला स्वप्न पडलें नव्हतें. श्यामला ती अजातशत्रु समजत होती. श्यामच्या व आपल्या अब्रूवर घाला घालणारा कसाब कोण असावा याचा विचार करण्यांत ती गढून गेली. इतक्यांत चिमणरावच्या तोंडांतून निघालेले जळजळीत शब्द तिच्या कानांवर आले, "आतां कां दांतखिळी बसली ! या रामायणाला तोंड देण्याकरितां एखादें भारत रचायचें असेल ! हं, बोल. ही कुडी कुणीं आणि कशाकरितां दिली ! "

"ही नाना मराठ्यांनीं मला भाऊबिजेस दिली."

"आणि तो धंदा काय करितो ?"

"हमालीचा !"

"बराच किफायतशीर धंदा आहे म्हणायचा ! आणि हा नाना हमाल वकीलीणबाईसाहेबांचा भाऊ बनून केवळ ओंवाळणी म्हणून शेंकडों रुपयांची कुडी तिला बहाल करितो ! मला तुम्हीं दोघांनीं अगदीं

मोळा सांब किंवा त्याच्याही पलीकडचा—साम्बाच्या पुढचा नंदीच—वनविलें म्हणायचें ! बरें, त्यानें तुझ्याशीं लगट करून तुला बहीण मानिली हें त्याच्या शीलाला योग्यच झालें; पण तूं येवढी कुलशीलवान् म्हणवीत असतां त्याला ओंवाळायला कशी तयार झालीस ! ”

“ त्याला भाऊ म्हणायला मला मुळींच लाज वाटत नाहीं.”

“ तें का म्हणून ! ”

“ तें रहस्य सांगण्याला मी मोकळी नाहीं.”

“ असें ! उभयतांमध्ये एक रहस्यही आहे तर ! हें पत्र तरी तेंच म्हणतें.”

“ कुणीं लिहिलें आहे तें घाणेरडें पत्र ? ”

“ कुणीं का लिहिलें असेना ! आपणाला मजकुराशीं गरज. तो खरा आहे ना ? ”

“ अगदीं खोटा आहे. पत्र पाठवणाराची आणि माझी रुजवात करून द्यावी.”

“ पत्राखालीं सहीच नाहीं तर रुजवात कशी करायची ? ”

“ आणि ज्या नीचाला सही करण्याचें धैर्य नाहीं त्याचा कुत्सित आरोप आपण खरा मानिता ? ”

“ तुझ्या वर्तनाशीं जितका जुळेल तितकाच खरा मानायचा.”

“ माझें असें संशयास्पद वर्तन काय दिसलें आपणाला ? ”

“ दिसायला काय शिंगें असतात ! कुड्याबद्दल सवाल केला असतां तूं प्रथम स्वीकारलेली मुग्धता, नंतर दिलेल्या स्पष्टीकरणाचा अप्रयोजकपणा, आणि सर्वांवर कडी म्हटली म्हणजे दोघांमधील रहस्य.”

“ आपल्या प्रश्नाचा रोंख ओळखून पुढें येणाऱ्या संकटाच्या कल्पनेनें मी जरा गांगरलें यांत अस्वाभाविक असें काय झालें ? दुसऱ्या आणि तिसऱ्या बाबींसंबंधानें मला आपणाला हात जोडून इतकीच विनंति करायची आहे, कीं आपण माझी जशी उलट तपासणी केली तशी नाना मराठ्यांची करा; आणि मग आपल्या मनाला वाटेल तसें करा. नानांनीं मला तें रहस्य सांगण्याची परवानगी दिली तर त्या दोन्ही बाबींचा मी समाधानकारक खुलासा करीन.”

"तूं तरी अशा अटी घालतेस कीं त्या कधीं पुन्याच व्हावयाला नकोत. तुझा नाना मराठे गांवांतल्या बायकांना नादीं लावून जो एकदम नापत्ता झाला तो अजून परत आला नाहीं."

"हायरे दैवा!"

"त्याच्या वियोगाबद्दल माझ्यादेखत इतका आक्रोश करतेस ना! शाबास तुझी! आणि इतकेंही होऊन तुझें वर्तन संशयास्पद आहे हें शाबीत करण्याचा बोजा माझ्याच डोक्यावर! खाशी सोय!"

"माझा निरपराधीपणा शाबीत करण्याचें एक मोठें साधन नाहींसें झालें याबद्दल मीं आक्रोश करूं नको तर काय करूं!"

"शाबास! कशी पण गोष्ट फिरविलीस! वकिलाची बायको शोभतेस खरी! या बोटाची थुंकी त्या बोटावर कशी म्हणतां म्हणतां नेतेस!"

"एकदां मन संशयानें घेरलें म्हणजे मनुष्य प्रत्येक गोष्टीकडे संशयी दृष्टीनेच पाहूं लागतें. कृपा करा आणि हा संशय सोडून द्या; म्हणजे प्रत्येक गोष्ट आपणांस सरळ दिसून येईल. आपणच जर माझा न्याय करणार नाहीं तर मीं तो मागूं तरी कोणाकडे!"

"नाहीं, नाहीं. मी अन्याय कधीं करणार नाहीं. तुझा अपराध सिद्ध होईपर्यंत मी तुला संशयाचा फायदा जरूर देईन."

पत्नीस संशयाचा फायदा न दिल्यास फौजदारी कायद्याचें अज्ञान दिसेल या भीतीनेच कीं काय, चिमणरावांनीं तिला तसें आश्वासन दिलें खरें; पण ते पार पाडण्याचें त्यांना स्मरण राहिलें नाहीं. ते येतां जातां तिला दुरुत्तरें बोलूं लागले. तिला दिवस गेले असल्यामुळें तिची प्रकृति बरीच क्षीण झाली होती; आणि तशांत या वाग्बाणांचा मार! शारीरिक व मानसिक पीडेच्या दुहेरी माऱ्यापुढें तिचा निभाव लागेना. तिच्या अंगावर पांडुरता आली, व तिला चालतांना आयास वाटूं लागले. पण तो गर्भावस्थेचा परिणाम असावा अशी चिमणरावानें मनाची समजूत करून घेतली. ती समजूत दूर करण्याचा शारदाबाईनें अणुमात्रही यत्न केला नाहीं. ती एकटी असली म्हणजे आपल्या दैवास बोल लावीत अश्रु गाळी; पण नवरा समोर असला म्हणजे आपल्या यातनांचा त्याला उपसर्ग पोहोचूं नये म्हणून तोंडावर उसनें हास्य आणून आपलें दुःख गिळण्याचा

प्रयत्न करी. हळूहळू तिची स्थिति चिंताजनक होऊं लागली. डाक्तरानीं तिची प्रकृति तपासली तेव्हां त्यांनीं हवा बदलण्याचा सल्ला दिला. इतक्यांत तिला बाळंतपणाकरितां चिमणपुरास पाठवून देण्याबद्दल गोपाळरावांचे पत्र आले. चिमणरावानें पडत्या फळाची आज्ञा घेऊन तिला माहेरीं पाठविण्याचा बेत केला. तो त्याजकडून तिला कळला तेव्हां तिनें "मला माहेरीं जायचेंच नाहीं मुळीं !" असें उत्तर दिलें. तिचा आतांपर्यंत झालेला छळ अपुरा वाटूनच कीं काय, चिमणराव म्हणाला, "खरेंच, नाना मराठे तेथून निघून गेल्यावर आतां तेथें काय मौज राहिली !" पाठीवर चाबकाचे कोरडे ओढल्याप्रमाणें वेदना होत असतांही त्या दाबून शारदाबाई स्थिर स्वरानें म्हणाली, "खरी गोष्ट बाहेर आल्यावर आपणाला या वाक्याबद्दल पश्चात्ताप होईल याचेंच मला वाईट वाटतें. आम्हा बायकांचा जन्म दुःख भोगण्याकरितांच आहे; तेव्हां त्याचें मला कांहीं वाटण्याचें कारण नाहीं. असो म्हणा. आपली इच्छाच मला दूर करण्याची असली तर ती मला कितीही अवघड वाटली तरी निमूटपणें मान्य केली पाहिजे."

यानंतर लौकरच तिची माहेरास रवानगी झाली. ती चिमणपुरास रात्रीचे प्रहरीं पोंचावी अशा बेतानेंच तिला गाडींत बसविल्यामुळें व तिची चर्या आधिव्याधींनीं पालटून गेलेली असल्यामुळें तिला स्टेशनावर कोणींही ओळखिलें नाहीं.

तिचे आईबाप तिचें स्वागत करण्याकरितां उत्कंठेनें तिला सामोरे गेले, पण तिच्या सुकलेल्या शरीराकडे व चेहऱ्याकडे पहातांच त्यांच्या पोटांत धस्स झालें. सासरीं झालेला प्रकार त्यांना मुळींच माहीत नव्हता. राधाबाई तिला पोटाशीं धरून तिच्या पाठीवरून हात फिरवीत तिच्या स्थितीचें कारण विचारूं लागली. त्याबरोबर चिमणाताईनें हा वेळपर्यंत कष्टानें दाबून ठेविलेलें दुःख स्फोट पावून हुदक्यांच्या रूपानें बाहेर पडलें. "माझ्या बाळीला कोणीं त्रास दिला का !" असा प्रेमळ प्रश्न कानीं पडतांच तिच्या दुःखाला अधिकच भरतें आलें, व ती आईच्या पोटांत तोंड खुपसून रडूं लागली. इतक्यांत "ज्या मेल्यानें माझ्या लाडकीला छळिलें असेल त्याचें निसंतान होईल." ही आईच्या तोंडची शापवाणी ऐकून ती एकदम गंभीर झाली व आईच्या तोंडावर हात ठेवीत

म्हणाली, "आई, हा शाप तुझ्याच नातवडाला भोवेल बरे!" राधाबाई चमकून म्हणाली, "हें काय? जावईबुवांनी का तुझा छळ मांडिला आहे? आणि तो काय म्हणून?" उत्तरादाखल चिमणाताईने पुनः आईच्या पोटांत तोंड दडविलं. त्या वेळीं ती तिच्या उदरात प्रवेश करण्याची इच्छा करीत होती कीं काय कोण जाणे! तिला तशा स्थितीत अधिक प्रश्न विचारणे योग्य होणार नाहीं हे जाणून राधाबाईनें तो विषय तेथेंच सोडून दिला. पण मुलीला धीर यावा म्हणून "बाळ, सगळं काही नीट होईल बरें! तू मुळींसुद्धा काळजी करू नकोस." असं म्हणण्याला ती प्रेमळ माउली विसरली नाही.

राधाबाईंनें काळजीपूर्वक केलेल्या शुश्रूषेने व सतत वर्षिलेल्या प्रेमामृताने चिमणाताईच्या तोंडावर पुन्हा टवटवी दिसू लागली. तिचं चित्त सारखे दुःखात मग्न होऊन राहू नये म्हणून गोपाळराव अनेक विषय काढून त्याची तिजबरोबर चर्चा करीत. पण तिच्या मनाची टवटवी व स्थितिस्थापकता कायमची निघून गेल्याचे त्याच्या नजरेस आलें. ती चिमणपुरास आल्याचे वर्तमान दुसऱ्या दिवशी साऱ्या गावभर पसरलें, व तिची भेट घेण्याकरितां गावकरी लोक गोपाळरावाच्या घरीं लोटूं लागले. पण आजाराच्या सबबीवर तिनें कोणाचीही भेट न घेता सर्वांस खट्टू करून परत पाठविलें.

एके दिवशी गोपाळराव रात्रींचं जेवण आटोपून आपल्या बायकोबरोबर व मुलीबरोबर माडीवर शिळोप्याच्या गप्पा करीत बसले असता त्यांच्या ओघात मौनी महाराजांचा विषय निघाला. उभयता पतिपत्नींनीं त्याच्या चमत्काराचें चटकदार वर्णन केले; ते ऐकून चिमणाताईनें त्याचें दर्शन घेण्याची इच्छा दर्शविली. दुसरेच दिवशीं दर्शनास जाण्याचा तात्रडतोब बेत ठरला. तो ठरतो न ठरतो तोच एकाएकी खिडक्यातून कांहीं काळेकभिन्न व क्रूर दिसणारे इसम आंत आले. तिघांपैकीं एकासही ओरडण्याचा अवसर मिळण्यापूर्वींच त्याच्या तोंडांत बोळे कोंबण्यांत आले व हातपाय दोरांनीं घट्ट बाधण्यात आले. खिडक्यांतून कोणी आंत येऊं नये म्हणून त्या एका निमिषांत बंद करण्यांत आल्या. गोपाळराव सुटका करून घेण्याकरितां धडपड करूं लागले

तोंच त्या इसमाच्या पुढाऱ्याने त्याजवर बंदुकीची नळी रोखून "हलाल किंवा बोलाल तर प्राणासच मुकाल." अशा अर्थाचा त्यास इशारा दिला. नंतर त्याने हलक्या स्वराने खालील आशयाचे भाषण केलेः—"घरातले एकूण एक नोकर दारूडूर घोरत पडले आहेत. तुम्ही गडबड केली तर तिचा फायदा न होता तुम्ही मात्र जीव गमावून बसाल. मी येथें तुमच्या तिजोरीवर डल्ला मारण्याकरिता अगर तुम्हाला मुखामुखीं जिवें मारण्याकरिता आलो नाहीं. तुम्ही त्या दिवशीं मागवाड्यात आलात आणि माझ्या बसकरावर बसण्याला सुद्धा अनमान करू लागलात याची तुम्हाला आठवण असेलच. आम्ही माग लोक तुमच्या नजरेने इतके नीच आहोत कीं आमच्या अन्नाला मुर्दाड मासाचे हात लागले असतील या धास्तीनें तुम्ही त्या अन्नाला तर शिवला नाहींच, पण ते हात आमच्या बसकराला लागले असतील असा अदेशा घेऊन तुम्ही त्यावर टेकण्यालासुद्धा मागे-पुढे पाहू लागलात. तो देवमाणूस जर तुमच्याबरोबर नसता तर तुम्ही लाजेकाजेस्तव सुद्धा त्या बसकराचा विटाळ आपल्या अंगाना होऊ दिला नसता. तुम्ही निघून गेल्यावर मीं विचार करून असे ठरविलें की, तुमच्या चढेलपणाचे एकच कारण आहे, आणि ते कारण म्हटले म्हणजे तुम्हाला अजून मुर्दाड मासाची लज्जत कळली नाहीं हे होय. आम्ही स्वतः मौनी महाराजाच्या गुर्वतीखातर अलीकडे तसे मास खाण्याचे अजीबात सोडून दिले आहे. पण तुमच्याकरिता मुद्दाम ते मोठ्या मेहनतीनं पैदा करून आज आमच्याबरोबर थाळीत आणिलें आहे. ते तुमच्या तोंडात घातलें म्हणजे आम्ही सुटलो. तुमच्या तोंडातील बोळे काढिल्यावर न ओरडतां मुकाट्यानं हे मास खाण्याचे तुम्ही कबूल कराल तर तुमच्या जिवाला धक्का न लावण्याचे मी कबूल करितों. ती गोष्ट तुम्हाला कबूल नसेल तर प्रथम तुमच्यादेखत या बायकांचे हालहाल करून प्राण घेऊ आणि मागाहून तुम्हालाही त्यांच्या भेटीला पाठवूं."

त्या काळस्वरूप पुरुषाच्या तोंडचे हे भयकर भाषण ऐकतांच तिघांच्याही हृदयांचा थरकाप झाला. राधाबाईने दगडासही पाझर फुटेल अशीं केविलवाण्या दृष्टीने त्या पुरुषाकडे पाहिले. पण त्याला द्रव येण्याचे थोडेही चिन्ह त्याच्या तोंडावर दिसेना. उलट उशीर होत चाललेला पाहून तो

थवताळू लागल्याचे त्याच्या मुद्रेवरून स्पष्ट दिसत होते. राधाबाईला या दारुण प्रसगींसुद्धां मुलीच्या नाजूक स्थितीची आठवण होऊन तिनें चिंतातुर मुद्रेनें तिजकडे पाहिले, तों ती मरणास तयार असल्याचें तिला दिसून आले. तिचा जीव खालीं पडल्यासारखा झाला. तिने निराशेनें निश्चल झालेली आपली दृष्टि गोपाळरावांकडे लाविली. त्यांचाही नीचपणाच्या जिण्यापेक्षां वीरवृत्तीचें मरण पत्करण्याचा निर्धार त्यांच्या स्थिर व निष्ठुर चर्येवर स्पष्टपणे उमटलेला तिला दिसला. अशी शूर कन्या व असा शूर पति दिल्याबद्दल तिनें आकाशाकडे डोळे लावून ईश्वराचे मनांतल्या मनात आभार मानिले, आणि भवितव्याची शांतपणे वाट पहात ती स्वस्थ पडून राहिली. त्रिवर्गांचीही मरणाला तयारी असलेली पाहून मांगांच्या नाइकानें "ठीक आहे तर. तुमची तशी मर्जी असेल तर माझीही त्याला तयारीच आहे." असें पुटपुटत आपल्या अनुयायांस "पुढे व्हा आणि तुमचे काम करा." असें फर्माविले. त्याबरोबर त्यांपैकीं दोघे इसम पुढे झाले, व चिमणाताईच्या अंगाचें कातडे सोलून काढण्यासाठी त्यांनीं आपल्या सुऱ्या परजल्या. तें पाहून गोपाळरावांच्या व राधाबाईच्या डोळ्यांतून घळघळा अश्रु वाहू लागले. त्यांनी आपले डोळे मिटून घेतले, आणि चिमणाताईस क्षणांत व्हावयाच्या मर्मांतिक वेदना सहन करण्याचें तिला धैर्य देण्याबद्दल तीं उभयतां देवाची मनांत प्रार्थना करू लागलीं. इतक्यांत बंद असलेल्या खिडक्यांतील सर्वांत मोठीचा कडीकोयंडा स्थानभ्रष्ट होऊन खालीं पडला, व ती खिडकी एकदम उघडून तिच्यांत एक गंभीर मूर्ति प्रकट झाली. ती तेथें चौकटींतल्या तसबिरीप्रमाणे एक क्षणभर निश्चल उभी राहिली, आणि चौकटींतून पिशाचसंचारामुळे बाहेर पडणाऱ्या तसबिरीतल्या प्रतिमेप्रमाणें तिनें डोळ्याचें पातें लवतें न लवतें तोंच खोलींत प्रवेश केला. तिजकडे पाहतांच सारे मांग आश्चर्यचकित होऊन जागच्या जागीं खिळल्यासारखे झाले. नाईक इतरांच्या आधी भानावर आला व पुढे होऊन बेगुमानपणे म्हणाला, "महाराज, आपण येथे अचानक येऊन माझ्या बेतांत अडथळा आणिला आहे. दुसऱ्या वेळीं मी जरी आपला बंदा गुलाम असलों तरी या वेळी मी आपलें मुळींच ऐकणार नाहीं. आपली अपमान करून घेण्याची इच्छा असली तर मी आपला सूड आपणांदेखत उरकण्यालाही कमी करणार नाहीं."

महाराज म्हणाले, " नाईक, मी कोणतीही गोष्ट तुमच्या इच्छेविरुद्ध करणार नाहीं. तुम्ही जरा एकीकडे याल तर तुमची समजूत घालण्याचा मी प्रयत्न करितो. तुमची समजूत पटली नाहीं तर तुम्ही आपला हेतु सिद्धीस न्यायला मोकळे आहातच."

" तुम्ही ब्राह्मणब्राह्मण मिळून माझा बेत हाणून पाडायला बघतां आहांत. पण मी साफ तुमचें ऐकणार नाहीं." असे पुटपुटत नाईक महाराजामागोमाग माडीच्या एका बाजूस गेला. महाराज त्याच्या कानांत म्हणाले, " नाईक, तुम्ही नाना मराठ्याला दिलेलें वचन तुमच्या स्मरणांत आहे ना ? "

" त्याचा येथे काय संबंध ? "

" ते वचन पुरें करून मागायला मी आलों आहे."

" त्याचें माप त्यांच्या स्वतःच्या पदरांत घालायला मी केव्हांही तयार आहे. दुसऱ्या कोणालाही त्याची भरपाई करून मागतां येणार नाहीं."

" मीच नाना मराठे आहे ! "

" अगदीं खोटी गोष्ट ! "

" मग वचनाची गोष्ट मला कशी माहीत झाली ? "

" मी जे त्यांच्या कानांत पुटपुटलों ते दुसऱ्या एखाद्याला ऐकूंही गेलें असेल अगर त्याचा तर्कही करितां आला असेल. दुसरी एखादी खूण सांगा."

" त्यानंतरच्या पुढच्याच भाऊबिजेस नाना तुमच्या घरीं आला होता, आणि तेथे फराळ करून त्यानें तुमच्या बायकोकडून ओवाळून घेतलें."

" माझी खात्री झाली. पण आपल्या चेहऱ्यांत इतका फरक कसा झाला ? "

श्यामनें त्याला थोडक्यांत सारी हकीकत सांगितली. ती ऐकल्यावर त्यानें खिन्नपणें म्हटलें, " मी आपले उपकार विसरलों नाहीं व जन्मभर विसरणारही नाहीं. पण आपण अशा वेळीं येऊन माझा फार हिरमोड केला आहे. बरें, मीं आपलें वचन कशा रीतीनें पार पाडूं ? "

" या घरच्या व हैबतरावांच्या घरच्या साऱ्या माणसांची ताबडतोब सुटका करा आणि पुन्हां त्यांच्या वाटेस न जाण्याचें कबूल करा."

"आपण मजपासून केवढे मोठे मागणे करीत आहात याची आपणांस कल्पना नाहीं. हा सूड उगवण्यावरच माझे जन्माचे सारे सुख होते. पण त्या सुखावर लाथ मारून मांगाची जात दुसऱ्या कोणत्याही गुणांत नसली तरी इमान राखण्यांत तरी बाकीच्या सगळ्या जातींहून वरचढ आहे हे मी दाखवितो."

इतके बोलून तो मृत्यूची क्षणोक्षणीं वाट पहात असलेल्या त्या कुटुंबाकडे वळला, आणि त्यानें तिघांची तावडतोब बंधनापासून मुक्तता केली. त्याच्या तोंडांतील बोळे निघाल्यावर तीं श्यामच्या पायां पडलीं. गोपाळराव म्हणाले, "महाराज, उद्या आम्हीच आपले दर्शन घेण्याला येणार होतो. पण आमचें संकट ओळखून आपणच दर्शन देऊन आम्हाला त्यातून सोडविले. आपली आमच्यावर फारच मोठी कृपा झाली."

श्याम म्हणाला, "गोपाळराव, ही बोलण्याची वेळ नाहीं. मला दुसऱ्याही एका कुटुंबाची सोडवणूक करावयाची आहे. या प्रकाराची कोणींही वाच्यता करावयाची नाहीं हे लक्ष्यात ठेवा." इतकें म्हणून तो मांगाबरोबर तांतडीनें घराबाहेर निघून गेला.

इकडे मल्हारीबाबाच्या घरीं नाइकाचीं माणसे कुटुंबातील जागे असलेल्या साऱ्या स्त्रीपुरुषांची जखडबंदी व मुसकटदाबी करून नाईक येण्याचीच वाट पहात होतीं. इतक्यात नाईक मौनी महाराजांसह येऊन त्याने त्या साऱ्यांस मुक्त करण्याचा हुकूम केला. त्यांची सुटका झाल्यावर महाराजांनी त्यानाही त्या गोष्टीचा परिस्फोट न करण्याबद्दल बजाविलें, व आलेली सारी मंडळी परत चालती झाली.

त्या अचानक पडलेल्या डाक्याच्या कारणाचे स्पष्टीकरण गोपाळरावाच्या घरीं जसे झाले होते तसे मल्हारीबाबाच्या घरीं झालेलें नसल्यामुळे त्याना आलेलें संकट व त्यातून झालेली मुक्तता यांचे एक कोडेंच पडले. मौनी महाराजाच्या अनेक चमत्कारांपैकीं हा एक गूढ चमत्कार आहे असे त्यांनी आपल्या मनाचे समाधान करून घेतलें. त्यांजप्रमाणें वाचकास त्या प्रकाराचें फारसे कोडे पडण्याचे कारण नाहीं. ज्या दिवशीं ऐक्यवर्धक मंडळाच्या सभासदांस नाइकाकडून अडथळा झाला त्या दिवसापासून मौनी महाराजानीं त्याच्या हालचालींवर आपल्या महार

हस्तकांकडून पाळत ठेवविली. ते हस्तक मांगवाड्यांतून बाहेर पडण्याचे जे रस्ते होते ते रोखून रोज रात्रीं डोळ्यांत तेल घालून पहारा करीत. आज रात्रीं नाईक आपल्या परिवारासह बाहेर पडतांच त्यांनी महाराजांस त्या गोष्टीची वर्दी दिली. महाराज तयारीतच होते. ते बरोबर जरूरीचें साहित्य घेऊन त्या हस्तकासह मांगाच्या मागोमागच गेले. मल्हारी-बाबाच्या घरापाशीं येताच मांगापैकीं कांहीं इसम मुख्य टोळीतून निघून त्या घरांत शिरले. त्यांजवर नजर ठेवण्यास दोन हस्तक मागें ठेवून महाराज नाइकाचा पाठलाग करीत गोपाळरावांच्या घरापर्यंत गेले. तेथें नाइकानें परिवारासह माडीवर चढून तिच्या खिडक्या बंद करितांच त्यांनीं आपले उरलेले हस्तक खालीं उभे केले आणि स्वतः एकटेच वर चढून व त्यापैकीं एका खिडकीच्या कडीकोयंड्याचे आंकडे बरोबर आणिलेल्या साहित्याच्या साह्यानें काढून त्यांत प्रवेश केला. जरूर पडती तर युक्तीच्या जोडीस शक्तीचाही उपयोग करण्याची त्यांची तयारी होती. पण नाइकाच्या लोकोत्तर इमानीपणामुळें तो प्रसंग टळला.

दुसऱ्या दिवशीं रात्रीं महाराज आपल्या मठींत झोपावयाच्या तयारीनें एकटेच बसले असतां एकाएकीं एक इसम आंत येऊन त्यांच्या पायांवर पडला व स्फुंदस्फुंदून रडूं लागला. तो इसम हैबती आहे हें ओळखून महाराज त्यास प्रेमानें उठवीत म्हणाले, "हैबतराव, इतक्या रात्रीं इकडे येण्यासारखें तुमच्यावर कोणतें संकट आलें आहे?"

हैबती पश्चात्तापाच्या स्वरानें म्हणाला, "नाना, मीं आजपर्यंत तुम्हांवर आणिलेली सारी संकटें विसरून तुम्ही माझ्याच संकटाची चौकशी करितां हा तुमचा केवढा तरी थोरपणा आहे! कालच्या संकटांतून सुद्धां तुम्ही होतां म्हणूनच आम्ही जिवानिशीं आणि अब्रूनिशीं निभावलों. तुमच्या चेहऱ्यावर पडलेल्या डागांवरून मीं तुम्हांला ताबडतोब ओळखिलें. कालची रात्र मी जागून काढिली. आज सकाळीं उठतांच पहिल्या प्रथम जमीनीच्या दिवशीं घडलेल्या प्रकाराबद्दल घरांत चौकशी केली, तों त्यांत तुमचा कांहीं अपराध नसून उलट बाबांच्या बोलावण्यावरूनच तुम्ही आमच्या साह्याला धांवत आल्याचें कळलें. त्या लुच्च्या मारवाड्याच्या

मानभावी बोलण्यावर विश्वास ठेवून मी फसलों. नाना, मीं तुमचे मोठे अपराध केले आहेत. कोणत्या तोंडाने तुमची क्षमा मागूं ?"

श्याम म्हणाला, ' हैबतराव, क्षमा करणार तो परमेश्वर आहे. मी कोण क्षमा करणार ? झाल्या गेल्या गोष्टीबद्दल तुम्ही वाईट वाटूं देऊं नका. तसे पाहू गेले तर तुमच्या कृत्याने माझे नुकसान तरी कोणतें झाले ? मला येथे काय कमी आहे ? तुम्ही ज्या कृत्याला मोठा अपराध म्हणतां त्याने झाले असेल तर कल्याणच झाले आहे. या गरीब अस्पृश्याची इतकी सुधारणा झाली याला कारण तुम्हीच झालात या विचारानें तुम्हाला समाधान मानून घेता येण्यासारखे आहे."

" येवढ्यानेंच माझ्या अपराधाचे माप कुठे पुरे होते आहे ? नाना, मी तुमच्या शाळेत लिहावाचायला शिकलों, त्याचा मी कोणता उपयोग केला असेल असे तुम्हाला वाटते ? मी शिकलो ते दुसऱ्याना शिकविलें असेल असेच तुमच्यासारख्या सरळ मनाच्या थोर माणसाना वाटणार. नाहीं नाहीं. नाना, मी त्याचा उपयोग एका अब्रूदार कुटुंबाच्या सुखाची राखरांगोळी करण्याच्या कामी केला. हजारो लोकाचे कल्याण करणाऱ्या एका निष्पाप माउलीच्या संसारसुखांत बिब्बा घातला."

खऱ्या प्रकाराची अधुक कल्पना येऊन श्यामने घाबऱ्या घाबऱ्या विचारले, " हैबतराव, तुम्ही चिमणाताईसंबधानेच बोलत आहात ना ?"

" होय. मला सांगावयाला शरम वाटते—कारण ते कृत्य तसेच राक्षसी आहे—मी चिमणाताईच्या नवऱ्याला एक निनांवी पत्र पाठवून त्याचे मन तुम्ही तिला दिलेल्या कुड्यांच्या आधारे तुम्हां उभयताविरुद्ध बिथरवून टाकण्याचा हलकटपणाचा प्रयत्न केला."

चिमणाताईबरोबर हैबतीचीही दया येऊन श्याम म्हणाला, "अरेरे ! हैबतराव, हें काय केलेत तुम्हीं ?"

काहीं वेळ थांबून हैबती म्हणाला, "हातून होऊ नये ते झाले. तें निस्तरायचे कसें हें मला अगोदर सांगा. मी पश्चात्तापानें जळतो आहे."

त्याजकडे करुणापूर्ण दृष्टीने पहात श्याम म्हणाला, " तिच्या नवऱ्याच्या मनांत शिरलेलें संशयपिशाच दुसरे पत्र पाठवून काढिलें पाहिजे."

" मीं स्वतःच्या सहीचें पत्र पाठवूं ?"

" मीं तसा सल्ला तुम्हांला दिला असता. पण मला त्याची तादृश जरूर दिसत नाहीं. निनावी पत्र लिहूनही भागण्यासारखें आहे. हेतु निर्मळ असला म्हणजे निनावी पत्र पाठविण्यांत कांहीं दोष नाहीं. शिवाय मला चिमणाताईच्या नवऱ्याचा स्वभाव माहीत नाहीं. तुमच्याच पत्राच्या आधारानें त्याने तुमच्यावर फौजदारी खटला भरला तर ?"

" माझ्या दुष्टपणाचे परिणाम भोगण्याला माझी तयारी आहे."

" तुम्ही भोगाल. पण आम्ही भोगू दिले पाहिजेत ना ? ते परिणाम तुमच्यापुरतेच मर्यादित राहिले असते तर निराळी गोष्ट होती. पण तुमच्या कुटुंबास, कच्च्याबच्च्यास आणि वडिलासही ते भोवल्यावाचून रहाणार नाहींत; त्याची वाट काय ?"

दोन्ही हातानी आपले तोंड झाकून हैबती रुद्ध कंठाने व सद्गदित स्वरानें म्हणाला. " नाना, मीं आपल्या कुळाच्या आणि बाबाच्या नावाना काळोखी फांसली." श्याम त्याचें सांत्वन करण्याकरितां म्हणाला, " अजून कांहीं झालें नाहीं. तुमचं कृत्य निस्तरण्याला अजून सवड आहे. आज रात्रीच चिमणाताईच्या नवऱ्याला धाडायचं पत्र लिहून ठेवा आणि उद्या पहाटे तं टपालात टाका."

" तुमच्या सल्ल्याप्रमाणें अक्षरशः वागतो. पण तुम्ही आता आमच्यात पुन्हा रहायला केव्हां येणार ?"

" मला यावयाला अजून अवकाश आहे. तोपर्यंत माझें रहस्य अगदीं गुप्त ठेवा."

हैबती श्यामचा निरोप घेऊन निघून गेला, व श्याम विचारांत गढून गेला. चिमणाताई गावीं आल्याचें वर्तमान त्यास गावकऱ्याच्या तोंडून नुकतेच कळले होते. ती दुखण्यामुळे अत्यंत क्षीण झाली आहे हेही त्या-बरोबरच कळून त्याला तिच्या प्रकृतीबद्दल काळजी वाटत होती. तिला गोपाळराव लौकरच आपल्या दर्शनाकरितां आणतील अशी त्यास खात्री होती. पण तिची भेट अशा विलक्षण प्रसंगाच्या निमित्ताने होईल याचें त्यास स्वप्न पडणेही शक्य नव्हते; मग कल्पना कुठून येणार ? आदल्या रात्रीं त्यानें गोपाळरावांच्या कुटुंबाची सुटका केल्यावरही त्यास तिच्या चेहऱ्यावर जी उदासीनतेची छाया कायमचे ठाणे देऊन बसल्या-

प्रमाणे दिसली होती तिचा खरा अर्थ श्याम आज रात्रीं हैवतीपासून कळला. हरहर! नवऱ्याच्या पांडित्याच्या जोरावर जिनें मोठमोठ्या समाजधुरीणांसही अशक्य अशा सुधारणा धैर्यानें हातीं घेऊन थोड्याच अवधींत घडवूनही आणिल्या होत्या. तिनें त्या पांडित्याच्या अभावीं गोगलगाय बनून जावें ना! स्त्रीस्वातंत्र्याच्या कट्टया पुरस्कर्तीला स्वतःचेंच स्वातंत्र्य गमावून बसण्यास लागावें याहून दैवाची विपरीत लीला कोणती असू शकणार! हिंदु स्त्री कितीही स्वतंत्र असली तरी तिच्या भवितव्याचीं सूत्रें तिच्या नवऱ्याच्या हातीं असतात हेंच खरें. या व अशाच दुसऱ्या विचारांची सळबळ डोक्यांत सारखी चालू राहिल्यामुळे श्यामची सारी रात्र झोंपेवांचूनच गेली. हैवतीच्या पत्राचा परिणाम न झाल्यास चिमणा-ताईंच्या नवऱ्याच्या मनांतील संशयाचें निराकरण करण्याचें काम स्वतः अंगावर घेण्याचा त्यानें पहाटेच्या सुमारास निश्चय केला. तेव्हांच कोठें त्यास निद्रा येण्यापुरती स्वस्थता मिळाली.

प्रकरण चवदावें

# अंत्यजोद्धार

नाना मराठे म्हणजेच मौनी महाराज हें कळल्यापासून नाइकाचा त्यांजबद्दलचा आदर जरी नाहींसा झाला तरी त्याची जागा प्रेमानें घेतली, व तें प्रेम दिवसेंदिवस वृद्धिंगत होऊं लागलें. इतर स्पृश्य जगानें आपणावर पाठ फिरविली असतां एकटा नानाच काय तो आपल्या देशबंधुत्वाच्या व धर्मबंधुत्वाच्या नात्यास इमानेइतबारें जागला होता ही गोष्ट तो कधीं विसरला नाहीं. नानानें स्वतःस त्याचा बंधु म्हणून जसें म्हणविलें होतें तसें त्याच्या कुटुंबाचा बंधु म्हणूनही म्हणविलें होतें. यामुळें त्याचें त्याच्याशीं असलेलें प्रेमबंधन दुहेरी असून त्या मानानें खंबीरही होतें. सत्यसृष्टींत भावास मेव्हणा होतां येत नाहीं; पण त्या प्रतिबंधास कल्पनासृष्टींत जागा नाहीं. तेथें दोन किंवा अधिक नातीं एकत्र होऊं शकतात, व यामुळें सख्ख्या भावांतही सहसा न दिसून येणारें प्रेम पुष्कळदां मानीव भावांत दिसून येतें. नाईक आतां मौनी महाराजांच्या मठींत त्यांच्या मुखाकडे पहात व मुखावाटे निघणारा उपदेश ऐकत प्रहर प्रहर बसूं लागला. त्यांच्या मुखास आलेल्या विशोभितपणाचा व त्यांनीं स्वतःचें स्वरूप लपविण्याकरितां धारण केलेल्या कृत्रिम स्वराचा उगम त्या दिवशीं नाना मराठ्यानें दाखविलेल्या असामान्य धैर्यांत व लोकोत्तर स्वार्थत्यागांत आहे हें ओळखून तो विशोभित चेहरा व तो घोगरा स्वरसुद्धां त्यास प्रिय वाटूं लागला. जातीजातींमधील वैमनस्यामुळें देशाचें किती नुकसान झालें आहे याचें महाराज जें वर्णन करीत तें तो लक्ष्य देऊन ऐके, व देशाच्या कल्याणाकरितां साऱ्या जातींनीं एक होण्याची ते जी आवश्यकता प्रतिपादीत तीही त्याच्या मनावर ठसल्यावांचून रहात नसे.

एके दिवशीं नाईक नित्याप्रमाणें मठींत येऊन महाराजांजवळ बसला असतां त्यांच्या गंभीर मुद्रेवरून आज कांहीं तरी विशेष प्रकार घडला

असावा असे ताडून महाराज त्यास म्हणाले, "का नाईक, सारें ठीक आहे ना ?"

"आज एक नवीनच प्रश्न उपस्थित झाला आहे. ब्राह्मणानीं कुणब्यां-माळ्यांशीं जसा सरसकट रोटीव्यवहार सुरू केला आहे तसा ते अजून आमच्याशीं कां करीत नाहींत ?"

"कां बरें ? तुमच्या हातची भाकरी खाल्ल्याशिवाय एक तरी ब्राह्मण या मठीच्या बाहेर पडतांना तुम्हीं पाहिला आहे काय ?"

"हा केवळ आपल्या कृपेचा परिणाम आहे. या ठिकाणीं सारेंच पवित्र आहे. पण ब्राह्मणांनीं येथें आमच्या हातची भाकरी खाल्ली म्हणून ते प्रयोजनाचें जेवण आमच्या पक्तीला किंवा आमच्या हातचें जेवायला तयार होतील असें नाहीं मला वाटत."

"तुमचें म्हणणें खरें आहे. पण अंगावर तुमची सांवली पडतांच जे ब्राह्मण सचैल स्नान करीत ते आतां तुमच्याशीं खेटून बसतात, तुमच्या घरीं येऊन मोकळ्या मनाने वागतात ही काय लहान गोष्ट समजतां तुम्ही ? हजारो वर्षांची रूढि एका वर्षांत झुगारून देण्यांत त्यांनीं राष्ट्रा-करितां केवढा तरी स्वार्थत्याग केला आहे! जो जो राष्ट्रीय भावना अधिकाधिक जागृत होईल तो तो ते याच्याही पुढची मजल गांठतील याबद्दल मला संशय वाटत नाहीं."

"ही चिमणपुरची स्थिति झाली. इतर ठिकाणीं ब्राह्मण लोक आम्हां-पासून पूर्वींइतकेच फटकून वागत नाहींत का ?"

"वागत असतील. पण जी गोष्ट चिमणपुरास शक्य झाली ती इतर ठिकाणींही होण्यास काय हरकत आहे ? ती घडवून आणण्याकरितां राष्ट्र-प्रेमी धुरीणांनीं पुढें आलें पाहिजे."

"पण त्यांचीच तर हिंदु समाजांत मोठी वाण आहे. ब्राह्मण पुढाऱ्यां-च्या क्षुद्रबुद्धीला त्रासून आमच्या जातींतील किती तरी लोक भराभर धर्मांतर करीत आहेत. ते पुढारी त्यांना नुसते स्पृश्य करून घ्यायला तयार झाले असते तरी सुद्धां ही स्थिति खास टळली असती."

"असें ! आणि ही धर्मांतराची लाट येथवर येऊन पोहोंचली आहे

म्हणता ? पण येथील ब्राह्मण तर तुम्हांला यापूर्वींच स्पृश्य लेखीत आहेत; मग तुमची कुरकुर कां असावी ?"

" आमची स्थिति इतर ठिकाणच्या अस्पृश्यांच्या मानाने जितकी श्रेष्ठ आहे त्या मानानें आमच्या आकांक्षाही वाढल्या आहेत. आम्ही आतां पूर्वींच्या कुणब्यांमाळ्यांइतके तरी सुधारलेले आहोत. मग त्यांना जसें ब्राह्मणांनीं पतितपावन करून घेतलें तसें आम्हांला कां करून घेऊं नये ? कुणब्यांमाळ्यांच्या बायकांच्या हातचा स्वयंपाक जर त्यांना चालतो तर आमच्या बायकांच्या हातचा कां चालू नये ? आमच्या बायका आतां आचारांत त्यांच्याइतक्याच स्वच्छ झाल्या आहेत. मग असा पंक्तिप्रपंच कां ? तो ब्राह्मणांना दूर करायचा नसेल तर आम्ही ख्रिस्ती व्हायला तयार आहोत. ख्रिस्ती लोक आमच्या हातचें खायला केव्हांही तयार आहेत."

" हो, त्यांना थोड्या पगारांवर बबर्जी पाहिजेच आहेत. मग त्यांनीं तयार कां असू नये ?"

" आम्ही ब्राह्मणांपाशींही लहान पगारावर आचारी म्हणून रहायला तयार आहोंत."

" हिंदु धर्म आणि ख्रिस्ती धर्म यांमध्ये संग्राहकत्वासंबंधानें पहिल्या-पासूनच मोठा फरक आहे. हिंदु धर्माची प्रवृत्ति स्वतःचें रक्षण करण्याकडे आहे तर ख्रिस्ती धर्माची इतर धर्मांचे प्रदेश काबीज करण्याकडे आहे."

" या बाबतीतही आपणामध्यें सुधारणा व्हावयास नको का ?"

" त्या दिशेनेंही अल्पस्वल्प प्रयत्न चालू आहेत. ते प्रयत्न मोठ्या प्रमाणावर व्हावयास जितकी राष्ट्रजागृति व्हावयास पाहिजे तितकी अजून झालेली नाहीं."

" ही जागृति होणार तरी कधीं ! आमचा स्वाभिमान रसातळाला गेला तरी या वरिष्ठ जातींना महानिद्राच लागलेली आहे. अशा स्थितीत आमच्या मनांत धर्मांतराचा विचार आला तर आमची काय चूक झाली ?"

" त्या दिवशीं गोपाळरावांनीं धर्मरक्षणाकरितां सकुटुंब प्राण देण्याची जी तयारी दाखविली तिजवरून कांहींच बोध निघत नाहीं का ?"

" वरिष्ठ जातींचें धर्मरक्षण म्हणजे स्वतःचें श्रेष्ठ पद चिरस्थायि करणें

आणि कनिष्ठ जातींचें धर्मरक्षण म्हणजे स्वतःची पशूंच्यापेक्षांही नीच असलेली स्थिति वज्रलेप करणें; असा उभयतांच्या धर्मरक्षणाच्या अर्थांतच फरक आहे. त्यांनीं धर्मांतर करणें म्हणजे आपलें उच्च स्थान सोडून सामान्य जनांत सामील होणे. त्याला त्यांची अर्थात्‌च तयारी नसणार. आम्हीं धर्मांतर करणे म्हणजे आपल्या नीच अवस्थेंतून उच्च स्थितीत बढती करून घेणे. त्यास आमची साहजिकच अनुकूलता रहाणार. आम्हीं धर्मांतरासारखा भ्रष्टाचार केला तर वरिष्ठ जातीच्या स्पर्शास तरी पात्र होतों; जर धर्मरक्षणाचे पुण्य कर्म केले तर त्या हक्कास जन्मभर पारखेच रहातो. महाराज, मीं आणि माझ्या जातभाईनीं जर धर्मांतर केले तर आपला आमच्यावर राग होईल का ! ”

“ नाहीं, मुळींच नाहीं. आली तर कींवच येईल; आणि तीही तुमची नाहीं, तर तुम्हाला केवळ अंध दुराग्रहामुळे आपल्या धर्मातून हुसकावून लावणाऱ्या अदूरदृष्टि लोकांची. तुमचा राग का यावा ? शिवाय तुमच्या धर्मांतरानें राजकीय दृष्ट्या आमचें मुळींच अकल्याण होण्यासारखे नाहीं. आमचे हल्लींचे राष्ट्र हिंदु नसून हिंदी आहे. त्यांत हिंदूंप्रमाणें पारशी, मुसलमान, यहुदी, ख्रिस्ती या सर्वांना स्थान आहे. परतु मला हिंदी राष्ट्राप्रमाणे हिंदु धर्माबद्दलही फार प्रेम वाटतें. ज्या धर्मांत वेदांतासारखें तत्त्वज्ञान, रामायणमहाभारतांसारखे इतिहास, उपनिषदें, भगवद्गीता यांसारखे धर्मग्रंथ, शंकराचार्यरामानुजाचार्यांसारखे धर्मप्रवर्तक झाले त्या धर्माचा ऱ्हास होत चाललेला पाहून मला बरे कसे वाटेल ! ”

“ आपण आतां जीं नांवे घेतलीं तीं मीं जन्मांत ऐकिलीही नाहीत; मग त्यांबद्दल मला अभिमान कसा वाटावा ? ”

“ निदान हिंदुधर्मसंरक्षक शिवाजीमहाराजांचे नांव तरी तुमच्या कानांवरून गेले असले पाहिजे. ज्या धर्मापासून त्यांना प्रेरणा मिळाली तो धर्म तुम्हालाही प्रिय वाटायला हरकत नाही. ”

“ सर्व जातींशीं समतेनें व ममतेनें वागणाऱ्या त्या महात्म्याचें नांव ऐकिले नाहीं असा आमच्यामध्येंही एखादाच अभागी प्राणी असेल. शिवाजीमहाराजांच्या पुण्याईनेंच आम्ही आजपर्यंत आपल्या धर्मास चिकटून राहिलों. पण त्यांची पुण्याईही आतां संपत आल्याचीं चिन्हें

दिसत आहेत. कारण धर्मांतरावर एखादा रामबाण उपाय तावडतोब करण्यांत आला नाहीं तर आमचा समाज लवकरच खिस्ती झाल्या-शिवाय रहात नाहीं."

" मी आज गोपाळरावांपाशीं ही गोष्ट काढितों. आम्ही सर्व मिळून कांहीं तरी तोड काढितोंच. तुम्हीं मात्र आणखी चार पांच दिवस दम धरिला पाहिजे."

" ज्यांनीं चार पांच हजार वर्षें दम धरिला त्यांना चार पांच दिवस दम धरणें मोठीशी गोष्ट नाहीं." इतकें म्हणून नाइकानें महाराजाचा निरोप घेतला.

महाराजांनीं गोपाळरावांची मांगांपासून सकुटुंब मुक्तता केली त्या दिवसापासून चिमणाताईची त्यांच्यावर अत्यत निष्ठा बसली. ती गोपाळ-रावांबरोबर एक दोन दिवसांआड त्यांच्या दर्शनास येत असे. त्यांच्या चेहऱ्याकडे पहात असता आपण यांना पूर्वीं कधीं तरी पाहिले असावें असा तिला भास होई, व त्यांच्या सान्निध्यांत तिला पराकाष्ठेच्या शांतीचा लाभ होत असे. नाईक वर लिहिल्याप्रमाणे मठांतून निघून गेला त्याच दिवशीं गोपाळराव आपल्या मुलीसह मठींत आले, त्याजपाशीं महाराजांनीं नाइकानें उपस्थित केलेल्या प्रश्नाचा विषय काढिला. त्या प्रश्नाचा कांहीं तरी लौकर निकाल लावणे प्रत्येक हिंदुधर्माभिमान्याचें कर्तव्य आहे असें महाराजांनीं म्हणतांच गोपाळरावांनीं त्यास तावडतोब अनुमति दिली. जातिद्वेषाची मजल कोणत्या पल्ल्यापर्यंत जाऊन पोहोचली आहे याचा त्यांस नुक्ताच अनुभव आलेला असल्यामुळें त्या प्रश्नाचा ऊहापोह करण्याचें त्यांस कारण दिसलें नाहीं. या निमित्तानें चिमणीच्या नवऱ्यास बोलाविल्यास पतिपत्नींचा समेट करण्याची एक उत्तम संधि मिळणार आहे असा विचार करून त्यांनीं त्याचा या कामीं सल्ला घेतल्यास बरें होईल अशी महाराजांस सूचना केली, व महाराजांनीं तिला आनंदानें मान्यता दर्शविली. त्यावर चिमणाताई " कांहीं नको बोलवायला ! येऊन फारसा फायदा होईलसा मला नाहीं वाटत." असें म्हणाली. परंतु महाराज स्वतःच जेव्हां " चिमणाताई, येऊ द्या त्यांना. सगळें सुरळीत पार पडण्याची मी हमी घेतों. मला स्वतःस त्यांना पहाण्याची फार उत्कंठा आहे." असें

म्हणाले तेव्हा तिचा निरुपाय झाला. चिमणरावाकडून गोपाळरावांस नुकतेंच जें पत्र आले होते त्यावरून त्याचे मन बरेच निवळल्यासारखें दिसत होते. बायकोची भेट घेण्यास आपण फार आतुर आहोंत असेही त्याने जरा आडपडद्याने ध्वनित केलें होते. अर्थातच चिमणाताईस त्याच्या भेटीच्या परिणामाची धास्ती बाळगण्याचें मुळींच कारण नव्हते.

हैवतीने श्यामपाशीं कबूल केल्याप्रमाणे चिमणरावास दुसरे निनांवी पत्र पाठविले होते. त्यात त्याने श्याम व चिमणाताई यांजवर पहिल्या पत्रांत केलेला आरोप परत घेतला असून तो आरोप मत्सराने केल्याबद्दल योग्य शब्दात दिलगिरी दाखविली होती. पत्र वाचतांच चिमणरावास प्रथम असा संशय आला कीं, आपल्या पत्नीनेंच माहेरीं गेल्यावर पत्र लिहिणाराचा पत्ता लावून व त्यास लालूच दाखवून किंवा धमकी देऊन हे अनुतापदर्शक पत्र लिहिण्यास भाग पाडले असावे. पण विचारातीं त्यास तो संशय निराधार वाटला. आपल्या पत्नीस पत्र लिहिणाराचा पत्ता हुडकून काढण्यांत विशेष साह्य नाना मराठ्याचेच व्हावयाचे. पण तो इसम अजून परत आला नसल्याबद्दल याच पत्रांत मजकूर असून तो खोटा मानण्याचे आपणास तूर्त तरी कारण नाहीं. दुसरे असे कीं आपल्या पत्नीच्या प्रेरणेने जर हे पत्र लिहिलें गेलें असतें तर ते निनांवी आले नसते. निनांवी पत्राबद्दल तिने जो तिरस्कार व्यक्त केला होता त्यावरून ती स्वतःच्या निरपराधत्वाच्या शाबितीचें पत्र बिन-सहीचें धाडण्यास लावील हे संभवनीय नाहीं. पत्राखालीं सही दिल्यास बेअब्रूचा खटला होईल या भीतीनेंच लेखकानें सही केली नसावी. त्यांत आपल्या स्त्रीचे अंग असते तर तिने खटला न होण्याची हमी घेऊन त्यास सही करावयास लाविले असतें. याप्रमाणे साधकबाधक प्रमाणांचा विचार करून चिमणरावानें ते पत्र लेखकाने स्वयंप्रेरणेनेच लिहिले असलें पाहिजे असा निष्कर्ष काढिला. आपलें धद्यांतील प्रावीण्य त्याच्या कानांवर जाऊनच त्याने सही करण्याला माघार घेतली असली पाहिजे हा विचार त्याच्या आत्मप्रौढीस पोषक असल्यामुळें त्याला तावडतोब पटला. पत्नीचे निरपराधत्व सिद्ध होण्यांत पर्यायाने पतीचे अद्वितीय-त्वही ओघानेच सिद्ध होते; तेव्हां तीही त्यास इष्टापत्तिच वाटली.

शारदाबाई माहेरीं गेल्याला आतां बरेच दिवस झाले होते. तिच्या चारित्र्यावरील डाग नाहींसा झाल्यावर तिचे दर्शन घेणे त्यास चद्रग्रहणा-नंतर चद्रदर्शन घडण्याइतकेच आनदप्रद वाटत होतें. घडलेल्या प्रकारा-बद्दल क्षमायाचनार्थ तिच्या पायास स्पर्श करण्यास जरी मिळाला तरी त्या अल्प स्पर्शसुखातही आनद मानण्यास तो तयार होता. तेजस्वी स्त्रीची मर्जी प्रसन्न करण्याकरितां पायधरणी करण्यात नवऱ्यास कोणता कमीपणा येणार आहे ? याप्रमाणे तो काल्पनिक आनदसमुद्रांत मनमुराद गटगळ्या खात असतां त्याच्या श्वशुरांचे तातडीने निघून येण्याबद्दल पत्र आले. चिमणरावाला तरी तेच पाहिजे होतं. त्याने पडत्या फळाची आज्ञा घेऊन चिमणपुरास जाणारी पहिलीच गाडी पकडली. निनावी पत्राच्या लेखकाचा पत्ता लावण्यास उपयोगी पडावीं म्हणून तीं पत्रें बरोबर घेण्यास तो विसरला नाही. पत्ता लागल्यास त्याज-वर खटला भरण्याचाही त्याचा विचार होता.

जावईबुवाची मर्जी सुप्रसन्न पाहून गोपाळरावांस व राधाबाईस फार समाधान वाटले. त्यांचे पत्नीशी होणारे वर्तन तर कित्ता घेण्यासारखे होते. त्यानी तिजपाशीं दुसऱ्या निनांवी पत्राची गोष्ट काढिताच तिच्या चर्येवर अकृत्रिम आश्चर्य प्रकट झाले. ते पाहून त्याची उरलीसुरली शकाही नष्ट झाली व त्यांनीं तिची अतःकरणपूर्वक क्षमा मागितली. फौजदारी खटला उभा करण्यास तिची प्रतिकूलता दिसून येतांच त्यांच्या मनातील सशयपिशाचानं पुन्हा डोकं किंचित् वर केले. "ही जर निर्दोष आहे तर हिला खटल्याची भीति कां वाटावी !" पण तिच्या प्रतिकूलतेचे खरे कारण "आपली अब्रू आपणच चव्हाट्यावर आणिल्यास कुटाळ लोकाना चांगलेच फावेल." हे असून ते सयुक्तिकही आहे अशी खात्री पटतांच त्यांनीं त्या पिशाचास मनांतल्या मनांतच गाडून टाकिले. पण त्यास अजून पुरती गति मिळालेली नव्हती.

याप्रमाणे चिमणरावांच्या आगमनाच्या वास्तविक कारणाची समाधान-कारक रीतीने विल्हेवाट लागल्यावर निमित्तकारणाची वाटाघाट सुरू झाली. मांगांच्या पंक्तीस बसण्याला चिमणरावांची फारशी प्रतिकूलता नव्हती. त्यांच्या गांवांतील 'क्रीडाभुवनां'त होणाऱ्या मेजवान्यांत मुसलमान,

पारशी, खिस्ती, महार इत्यादि अन्यजातीय सभासदांशीं सहभोजन करण्याचे त्यांना अनेक प्रसग आले होते, व त्यामुळें सहभोजनाचे बाबतींत त्यांची नजर मेली होती. आगगाडीच्या डब्यांत महारमांगांशीं खेंटून फराळाचा फन्ना उडविण्याचेंही त्यांच्या अंगवळणीं पडलें होतें. पण मांगांच्या हातचें अन्न त्यांनीं आजपर्यंत खाल्लें नव्हतें. अर्थात् त्यांच्या स्वतःच्या रुढीच्या दृष्टीनें तें महापातकांत गणण्यासारखें होते. मौनी महाराजाच्या मठींतील प्रसाद भक्षण केल्यावर त्यांचा विरोध नाहींसा होईल या आशेनें गोपाळरावांनीं त्याच्या दर्शनास जाण्याची सूचना केली. पण त्यांची प्रसादाची अट कळताच चिमणरावांनीं "मी जोगड्यांच्या मतास फारशी किंमत देत नाहीं." असे म्हणून ती सूचना हातोहात फेटाळून लाविली. वकिलीच्या धंद्यांत पुष्कळदा ज्या पक्षाकडून अधिक लाभ त्याजतर्फे उभें रहावे लागत असल्यामुळें वकिलाची तत्त्वनिष्ठा बरीच लवचिक स्वरूपाची असते. चिमणरावाच्या मताचे सुकाणू गैरसोयीच्या सामाजिक सुधारणेकडून सोइस्कर राजकीय सुधारणेकडे कसे वळले होतें हें आपणास माहीतच आहे. याप्रमाणें वकिलाची तत्त्वनिष्ठा खिळखिळी झालेली असली तरी एकदा एकाचा पक्ष घेतला म्हणजे तो खोटा व कमजोर असला तरी त्यास तडीस पोचवावा लागत असल्यामुळें त्याच्या अंगीं आग्रहीपणाही उत्पन्न होत असतो. दोन्ही पक्षांकडून उभे रहाण्याची कायद्यानें मोकळीक ठेविली असती तर कदाचित् त्याच्या अंगीं अधिक निःपक्षपातत्व दिसून आलें असतें. चिमणराव सामान्य नियमास अपवाद नव्हतेच. हिंदु धर्मावर आलेला प्रसग आणीबाणीचा असून त्याकरिता वरिष्ठ जातींनीं 'सर्वनाशे समुत्पन्ने अर्धं त्यजति पंडितः' या न्यायानें देवाण घेवाण करण्यास तत्परता दाखविली पाहिजे असे गोपाळरावांनीं त्यांस परोपरीने समजावून सांगितलें. पण चिमणराव आपले 'मेरी मुरगीकी एकही टांग' घेऊन बसले होते. अखेरीस असे ठरलें कीं एक सार्वजनिक सभा भरवण्यांत यावी, चिमणरावांनीं तिजपुढें आपली बाजू उत्कृष्टपणे मांडून तिचे समाधान करावें आणि सर्वानुमते ठरेल तो निर्णय मातंगसमाजास कळवावा. त्याप्रमाणें दुसऱ्याच दिवशीं नाटकगृहांत गांवकऱ्याची सार्वजनिक सभा बोलावण्यांत आली. मातंग समाजानें आपलें म्हणणें सभेपुढें मांडण्याची परवानगी मागितल्यावरून त्यास सभेंत हजर रहाण्याची मोकळीक देण्यांत आली होती.

प्रकरण पंधरावें

## जाहीर सभा

सभास्थान श्रोत्यांनीं अगदीं चिकार भरून गेले होते. उच्च स्थानावर भिक्षुक व गृहस्थ, कारखानदार व मजूर, सावकार व शेतकरी, सरकारी अधिकारी व खाजगी नोकर, वकील व वैद्य इत्यादि भिन्नभिन्न व्यवसायांचे व भिन्नभिन्न स्पृश्य जातींचे प्रमुख गृहस्थ त्यांच्या त्यांच्या वयांप्रमाणें व योग्यतेप्रमाणे पुढील अगर मागील रांगांत बसले होते. अगदीं पुढील रांगेवर आपल्या परिचितांपैकीं गोपाळराव, चिमणराव, मल्हारीबाबा हे दिसत होते. चिमणरावांनीं प्रेक्षकावर छाप पाडण्याकरितां मुद्दाम उची तऱ्हेचा पोषाख केला होता. त्यांच्या अंगावर कडक इस्तरीचे कपडे असून डोक्यावर झिरमिळ्या लोंबत असलेली रेशमी पगडी होती. ते बारीक सुताचें रेशीमकाठी धोतर नेसले असून त्यांनीं अंगावर जरीकाठी उपरणें घेतलें होतें. त्यांच्या कानात टपोऱ्या मोत्याची भिगबाळी व बोटांत मौल्यवान हिऱ्याची अंगठी असून मनगटावर सोन्याचे घड्याळ होते. त्यांच्या पायांत प्रत्येक हालचालीबरोबर करकर वाजणारा विलायती बूट होता. उच्चासनाच्या खालच्या बाजूस पुढील रांगातील बाकावर चिमणपुरांतील मध्यम प्रतीचे व त्याच्या मागे ओट्यावर खालच्या प्रतीचे स्पृश्य लोक बसले होते. सर्वांत मागील जागा चांभार, महार व मांग इत्यादि अस्पृश्याकरिता ठेविली होती. महारांमध्यें हऱ्या महार व त्याच्याजवळ घोंगडीने सर्वांग आच्छादिलेली एक मूर्ति बसली होती. ती बहुधा मौनी महाराजांची असावी. त्यांच्या मागील रांगेत मांगांचा नाईक बसला होता. वरील सज्जात पुढील बाजूस गावातील सर्व स्पृश्य जातींच्या प्रमुख स्त्रिया व मागील बाजूस अस्पृश्यांच्या स्त्रिया बसल्या होत्या. सर्वांत पुढील रांगेंत आपल्या परिचयाच्या राधाबाई व चिमणाताई सभेत काय काय प्रकार होतात याची वाट पहात सचिंत मुद्रांनीं बसल्या होत्या. मागील एका रांगेंत नाइकाची बायको बसली होती.

सभेस रीतसर सुरवात अध्यक्षांच्या निवडणुकीपासून झाली. गोपाळ-राव देशमुख हे गांवांतील सर्वांत वजनदार गृहस्थ असल्यामुळे त्यांचेच नांव अध्यक्षस्थानाकरितां सुचविण्यात व मजूर करण्यांत आले. त्यानीं तें स्थान घेतल्यावर प्रथम सभा बोलावण्याचा हेतु थोडक्यांत पण स्पष्ट-पणे सांगून त्यासंबधाने खुल्या मनाने चर्चा करण्यास सभासदास आव्हान केले. त्यानंतर अस्पृश्यांशिवाय इतर सर्व जातींतर्फे अनेक वक्त्यांनीं थोडक्यांत भाषणें केलीं. त्यामध्यें थोडा थोडा मतभेद जरी दिसून आला तरी मांगांशीं व इतर अस्पृश्यांशीं तडजोड करण्यासंबधाने सर्वांची एकवाक्यता दिसून आली. अस्पृश्यास स्पृश्य वसतींत रहावयास जागा देऊन पूर्वीं कुणब्यामाळ्यास जसे लेखण्यात येत असे तसें समजण्यांत यावें, व कुणब्यांमाळ्यांस जसे आस्ते आस्ते सुधारीत अखेरीस रोटीव्यवहारांत ब्राह्मणाच्या बरोबरीने बसविण्यांत आले तसा प्रकार अस्पृश्यासंबंधाने सुद्धां करण्यात यावा असें बहुमत दिसले. इतक्यांत उच्चासनाच्या खालच्या बाजूस बांकावर बसलेला हैबती उच्चासनावर चढला व त्याने अध्यक्षांच्या परवानगीने एक लहानसें भाषण केलें. तो म्हणाला, “ आम्हां कुणब्यामाळ्यांत अवघ्या दोन वर्षांच्या अवधींत जी सुधारणा घडून आली तिला सौ० चिमणाताई व नाना मराठे ( येथे अस्पृश्यांशिवाय सर्व श्रोत्यांनीं टाळ्यांचा प्रचड गजर केला.) या दोन देवमाणसांचेच प्रयत्न कारणीभूत झाले. ( येथे चिमणराव कान टवकारून वक्त्याकडे पाहू लागले.) त्यांच्या थोर योग्यतेबद्दल संशय घेणारा येथील ब्राह्मण व शूद्र समाजांत एखादाच चांडाळ दिसून येईल. ( येथें वक्त्यानेंच निनांवी पत्रे पाठविलीं असल्यावद्दल चिमण-रावांस पुसट सशय उत्पन्न झाला.) ‘चांडाळ’ हा शब्द वापरल्या-बद्दल मला माझ्या चांडाळ बधूंनीं क्षमा करावी. ते रीती-भातीत वरिष्ठ जातीइतकेच शुचिर्भूत होत चालले असून नीतीच्या बाबतींत ते त्यांजपेक्षां कोणत्याही रीतीने कमी ठरणार नाहींत. आम्हां कुणब्यांमाळ्यांस नाना मराठे या महात्म्यानें जितक्या थोड्या अवकाशांत सुधारले तितक्याच थोड्या अवकाशांत अस्पृश्यांना मौनी महाराज या साधुपुरुषाने सुधारिलें आहे. दुर्दैवानें नाना मराठे

आम्हास तूर्त तरी सोडून गेले असून त्याच्या जाण्याने आमच्या समाजाची प्रगति खुटल्यासारखी झाली आहे. तसा प्रकार अस्पृश्यांचा नाहीं. त्यांच्यात अजून महाराजासारखी विभूति वास करीत आहे. आम्हा वरिष्ठ वर्गातील स्त्रीपुरुषानीं महारवाड्यांत हजारो वर्षांत एकदाही पाय ठेविला नव्हता. पण नाना मराठ्यांचे उदाहरण पाहून येथील ऐक्यवर्धक समाजाच्या सभासदानीं महारवाड्यात नुसता प्रवेशच केला असं नाहीं, तर तेथें महारांनीं तयार केलेले पेय राजरोस रीतीने प्राशन केले. त्याबद्दल माझ्यासारख्या हलक्या मनाच्या माणसांनी नानाचा बराच छळ केला, पण तो त्यांनीं शांतपणे सहन केला. ते असामान्य कोटींतील पुरुष ! त्यानीं पूर्वीच्या साधुसताप्रमाणे एका अस्पृश्याच्या घरीं प्रेमाने भोजन केले. पण येवढे मोठें धाडस करण्याची समाजाची तयारी नव्हती. माझ्यासारख्या क्षुद्र दृष्टीच्या लोकांनी तर सूड उगविण्याकरिता त्याजवर नाना प्रकारचे कुत्सित आरोप केले. (येथे चिमणरावाच्या सहायास खात्रीचे स्वरूप येऊ लागले.) आमच्या स्त्रिया वास्तविक पहाता अत्यत कनवाळू. पण त्यांनाही नानाकडे पाठ फिरविण्याची बुद्धि झाली ! (येथे वरील सज्जांतील प्रेक्षक पदराने डोळे पुसत असल्याचा देखावा दिसू लागला.) आता आम्हां सर्वांना पूर्ण पश्चात्ताप झाला असून गत अपराधाचे क्षालन करण्याचा आमचा कृतनिश्चय झाला आहे. ते क्षालन करण्याचा एकच मार्ग आहे. स्पृश्य व अस्पृश्य वर्गांचे एकीकरण करण्याच्या कामीं आम्हीं नानांचे सर्वथा अनुकरण केले पाहिजे. मौनी महाराजानी मांगाच्या हातची भाकरी खाणे आमच्या नित्यक्रमातले करून सोडिले आहे. जे आपण धार्मिक भावनेनें करीत आलो आहोत तेच सामाजिक भावनेने केले म्हणजे मातगसमाजाने केलेली मागणी निराळी पुरविण्याचे कारण नाहीं. महाराजासारखा साधुपुरुष आपल्या भक्तास जी आज्ञा करितो ती त्यांचे कल्याण करण्याच्या हेतूनेच करितो. ती आज्ञा त्यांच्या मठीत त्याच्यासमोरच काय ती पाळिली आणि मठीबाहेर येतांच मोडिली, तर त्याचा हेतु विफळ करण्यासारखे होणार नाही का ! महाराजांचे वास्तव्य मठीत आहे तसे चिमणपुरासही आहे. तुम्हीं आपल्या सबंध गांवाला महाराजांची मठी समजल्यास गांवांतील कोणत्याही ठिकाणीं शुचिर्भूत मांगाच्या हातची भाकरी खाण्याला

तुम्हांस दिक्कत वाटणार नाहीं; उलट महाराजांच्या आज्ञेचें तात्पर्यतः पालन करण्याचें पुण्य कर्म आपण करीत आहोंत असेंच वाटेल. पण या विस्तीर्ण गांवास या प्रकारें मठीचें मर्यादित स्वरूप देण्यापूर्वी तुम्हांला आपलीं हृदयें अस्पृश्यांच्या वस्तीइतकीं विस्तीर्ण केलीं पाहिजेत. तुमचें जर त्यांच्याशीं असें उदार वर्तन होत जाईल तर ते आमचा धर्म सोडून कधींही परधर्माचा स्वीकार करणार नाहींत, व आज आपल्या प्रिय हिंदु धर्मावर आलेले सकट पुन्हा उद्भवण्याची भीति रहाणार नाहीं."

हें भाषण वर दिलेल्या शब्दांत न होतां ब्राह्मणाच्या संसर्गानें सुधारलेल्या कुणबाऊ भाषेतच झालें. पण तें श्रोत्यांस इतके पटलें कीं तें चालू असतां हैबतीवर चोहोंकडून " शाबास ! शाबास !" अशा उत्तेजन-पर शब्दांचा वर्षाव होत होता. आपणासमोर इतके उदार विचार निर्भीडपणें प्रकट करणारा इसम गांवढळ, क्षुद्र दृष्टीचा, खुनशी हैबतीच कीं काय असा संशय वाटून अनेक श्रोते डोळे चोळचोळून त्याजकडे पाहू लागले. मल्हारीबाबांच्या डोळ्यांत आनंदाश्रु उभे राहिले. भाषणाच्या शेवटीं महार श्रोत्यांमधून घोगऱ्या आवाजांत "शाबास हैबतराव !" अशी एक आरोळी आली. ती ऐकून हैबतीस मूठभर मास आल्यासारखे वाटलें. त्यानें त्या आरोळीच्या दिशेस पाहून नम्रपणें प्रणाम केला. तो आपल्या जागीं बसल्यावर टाळ्यांचा जो कडकडाट झाला तो किती तरी वेळ चालला होता.

हैबतीच्या भाषणावर विरजण टाकणें फार दुर्घट आहे हे ओळखून चिमणराव चिंतातुर झाले. श्रोतृवृंद अनुकूल असला म्हणजे वक्तयास प्रोत्साहन येऊन त्याचें भाषण आपोआप उत्तम वठतें असा त्यांचा अनुभव होता. पण चिमणपुरचें मानसिक वातावरण हैबतीच्या मतांस अनुकूल व आपल्या मतांस प्रतिकूल असावें असा त्यांनीं हैबतीच्या भाषणाचें श्रोत्याकडून जें स्वागत झालें त्यावरून तर्क केला. इतर ठिकाणीं आपण चातुर्वर्ण्याचे गोडवे गायिले म्हणजे आपणास टाळ्या मिळतात; पण येथें त्या धोपट मार्गानें गेल्यास श्रोत्याकडून प्रोत्साहनपर टाळ्या मिळणे तर दूरच, पण उलट तिरस्कारव्यंजक किंवा उपहासपर वर्तन न झालें म्हणजे गंगेंत घोडे न्हाले; असे नाउमेदीचे विचार त्यांच्या

मनांत घोळू लागले. त्यांची तत्त्वनिष्ठा प्रखर नसल्यामुळें हैबतीने प्रतिपादिलेल्या मार्गास पाठिंबा देऊनही त्याना त्या प्रसंगांतून निसटून जातां येण्यासारखे होतें, व तसें करण्याचा विचार त्यांच्या मनांत क्षणभर आलाही. तसें केलें असतें म्हणजे त्यांचे भाषण हैबतीच्या परिणामकारक भाषणावर मिळमिळीत वाटलें असतें तरी त्यास विरोध होण्याचा संभव नव्हता. पण मांगांची मागणी हाणून पाडण्याचा चंग बांधून घरून निघाल्यावर एका गांवढळाच्या भाषणानें आपलें मतपरिवर्तन झालें असें कबूल करणें त्याना अत्यंत लाजिरवाणें वाटलें. तशांत प्रतिपक्षाच्या प्रत्येक विधानास विरोध करण्याच्या, किंबहुना प्रतिपक्षी नसल्यास वाऱ्याशींच भांडण्याच्या त्यांच्या वकीली बाण्यानें याच वेळेस उचल खाल्ली, व त्यांच्या खेडवळ सामनेवाल्यापुढें हार न जातां त्याजवर चढाई करण्याची त्यास सल्ला दिली. आपण अंगावर इतके झगझगीत कपडे चढविण्याची, डोक्यावर जरीमिळ्याची रेशमी पगडी ठेवून देण्याची, मनगटावर घड्याळ अडकविण्याची जी यातायात केली ती या 'निरस्तपादप देशां'तील एरंडापुढें, या 'गांवढ्या गावातील गावढ्या सवाष्णी'पुढें लोटांगण घालण्याकरितां की काय? छेः, ते कदापि व्हायचें नाही. असा निश्चय करून ते तिरकीच मुद्दे खोडून काढण्याकरितां उठले. त्याना विरोध टोळवणारे जे दहा बारा ब्राह्मण गृहस्थ सभेंत होते त्यानी त्यांचें टाळ्यांनीं स्वागत केलें. पण त्या टाळ्या एकंदर गर्दीच्या मानानें इतक्या कमी व मागील भाषणानंतर सुरू झालेल्या गागाटाच्या मानानें इतक्या हलक्या स्वरांत पडल्या की त्या पडल्या नसत्या तर बरें झालें असतें असें खुद्द चिमणरावासच वाटलें. त्यांनीं श्रोत्याचा आपणाबद्दल अनुकूल ग्रह करून घेण्याकरिता हात जोडून व आकाशाकडे डोळे लावून आरंभी एक ईशवचनपर संस्कृत श्लोक म्हटला. त्या वातावणीचा श्रोतृवृंदावर बराच परिणाम झाला असला पाहिजे असा त्यांनीं कयास बांधिला. त्या गांवढळांना श्लोकांतील संस्कृत शब्द कितपत कळले असतील याची त्यांना शंकाच होती. पण हात जोडणें, डोळे वर चढविणें व श्लोकाचे संस्कृत शब्द यांवरून आपण आस्तिकच केवळ नाही तर भगवद्भक्तही आहोंत याबद्दल त्यांना शंका राहिली नसावी असा त्यांनी तर्क केला. नंतर त्यांनीं

प्रसिद्ध देशभक्ताच्या नांवांचा उच्चार करणे हे जे श्रोत्याची अनुकूलता संपादण्याचें दुसरे अमोघ साधन त्याचा अवलंब केला. ते म्हणाले, "मी महात्मा गांधींचा एक क्षुद्र पण कट्टा अनुयायी आहे." 'महात्मा गांधी' या शब्दांच्या उच्चाराबरोबर टाळ्यांचा कडकडाट झाला. गांधींच्या नावानंतर टाळ्या वाजविण्याइतके प्रचलित राजकारणाचे ज्ञान चिमणपुर-करांना असेल कीं काय याबद्दल वक्त्यांचे मन साशंक होतें. पण टाळ्यांच्या कडकडाटाने त्यांची शंका दूर झाली. मात्र त्या कडकडाटात 'क्षुद्र' व 'कट्टा' हे शब्द लोपून गेल्यामुळे आपला विनय व कळकळ श्रोत्यांच्या नजरेस आली नाहीं याबद्दल त्यास जरा वाईटही वाटलें. म्हणून ते पुढे म्हणाले, "मी पुन्हा ठासून सांगतो कीं मी महात्मा गांधींचा एक यःकश्चित् भक्त आहें." हे वाक्य त्यांनीं जरी ठांसून व मोठ्याने उच्चारिले तरी महात्मा गांधींनी पुन्हां टाळ्या घेऊन येथेही घाण केली. म्हणून आपलें क्षुद्रत्व कठरवाने जाहीर करण्याकरिता चिमणराव ओरडून म्हणाले, "माझी योग्यता खरोखरीच अत्यंत कमी आहे." वक्त्यानें इतक्या कळकळीनें केलेले हे विधान श्रोत्यास पूर्णपणे पटल्यासारखे दिसले. कारण ते त्यांनीं टाळ्या न वाजवितां निमूटपणें ऐकून घेतले. पण ते त्यास फाजील खरे वाटल्यास सारेच मुसळ केरात जाईल या भीतीनें चिमणराव जरा घाईनें म्हणाले, "मी जरी विश्वविद्यालयाच्या प्रत्येक परीक्षेत पहिल्या वर्गांत पास झालेला व अनेक बक्षिसे मिळविलेला बुद्धिमान् विद्यार्थी आणि थोडक्याच दिवसांत शेंकडों रुपये मिळवूं लागलेला हुशार वकील असलो (येथे वक्त्यांनीं आपल्या बुद्धिमत्तेचें व हुशारीचें तेज वाढविण्याकरितां श्रोत्यांचे चित्त आकर्षून घेण्याच्या निमित्ताने तर्जनीबद्दल अगठी असलेली अनामिकाच पुढें केली.) तरी त्यापेक्षां भगवान् गांधींचा भक्त म्हणवून घेण्यांतच मला भूषण वाटतें. (येथें काव्यप्रिय श्रोत्यांची तलफ भागविण्याकरितां वक्त्यांनीं 'भक्त' व 'भूषण' या शब्दांतील भकाराचा आद्यानुप्रास साधून त्याचें आणखीही एका तशाच शब्दानें पोषण करण्याच्या हेतूने गांधींची 'महात्मा' ही पदवी हिसकावून तिजबद्दल त्यास 'भगवान्' ही पदवी बहाल केली.) मी असहकारितेचा कट्टा पुरस्कर्ता आहें. कायदेमंडळांवर,

न्यायमंदिरांवर, सरकारी शाळावर (या तीन सस्थांपैकीं मधल्या सस्थेचें नाव वक्त्यांनीं श्रोत्यांस ऐकू जाईल न जाईल अशा नेताने हलकेंच उच्चारिले. मात्र त्याचा वचपा काढण्याकरिता इतर दोन सस्थांचीं नावें उच्चारिताना त्यानीं त्यांजवर चागलाच जोर दिला.) पूर्ण बहिष्कार घालावा असें माझें मत आहे. मी गिरण्यांचा द्वेष्टा असून खादीचा चहाता आहे. (या विधानाची वक्त्याच्या विलायती कपड्यांशीं सगति कशी लावावयाची याबद्दल भोळेभाबडे विमणपुरकर श्रोते किंचित् बुचकळ्यांत पडले. पण विलायती कपडे इतराच्या हाती लागू नयेत व खादी महाग होऊ नये याच उदात्त हेतूनी वक्त्यांनी खादी न घेतां विलायती कपडे घेतले असले पाहिजेत असें त्यानी स्वतःचे समाधान करून घेतलें.) महात्मा गाधीचा सरकाराशीं असहकारिता करण्यावर जसा कटाक्ष आहे तसा स्पृश्यांशीं सहकारिता करण्यावरही आहे. अस्पृश्यतेचे हिंदु [illegible]तून पूर्ण उच्चाटन झाले पाहिजे याबद्दल मवाळ, राष्ट्रीय व असहकारितावादी यांचे पूर्ण मतैक्य आहे. मी अस्पृश्याचा कट्टा कैवारी असल्यामुळे त्याच्या सहानुभूतीवर माझा पूर्ण हक्क आहे. सबब त्यांनीं माझें भाषण शांतपणें ऐकून घ्यावें अशी माझी त्याना विनति आहे."

इतकी प्रस्तावना करून वक्ते मुख्य विषयाकडे वळले. ते म्हणाले, "अस्पृश्यतानिवारण करण्याची महात्मा गांधींची आज्ञा आहे खरी; पण ती आज्ञा अमलांत आणण्यापूर्वी अस्पृश्यता म्हणजे काय हे आपण पाहिले पाहिजे. 'अस्पृश्यता' हा शब्द 'अ', 'स्पृश्य' व 'ता' हीं तीन पदे मिळून झालेला आहे. 'अ' म्हणजे 'नाहीं' व 'ता' हा भाववाचक प्रत्यय. याप्रमाणे आद्य व अंत्य पदाची वाट लागली. आतां 'स्पृश्य' हा एकच शब्द उरला, व तोच सर्वांत महत्त्वाचा आहे. तो शब्द 'स्पृश्' या धातूस 'य' हा योग्यतार्थी प्रत्यय लागून बनलेला आहे. 'स्पृश्य' म्हणजे 'स्पर्श करण्यास योग्य.' अर्थात्च 'अस्पृश्य' या सपूर्ण शब्दाचा अर्थ 'जे स्पर्श करण्यास योग्य नाहींत' असा आहे. म्हणजे या शब्दांतच आमचे अंत्यज बंधु आमच्या स्पर्शास योग्य नाहींत असा अर्थ गर्भित आहे. गेलीं हजारों वर्षें आम्हीं आर्यांनीं अंत्यजांस स्पर्श तर केला नाहींच, पण त्यांच्या सांवलीवरही बहिष्कार घातला.

पण हल्लीं आपलें नैसर्गिक सामर्थ्य गारठून टाकणारी परकीय सत्तेची जी अजस्र छाया आपणा सर्वांवर पडली आहे तिजपुढें अस्पृश्यांची छाया फारच फिक्की वाटावयास लागून आम्हीं वरिष्ठ जातींनीं देशाच्या शाश्वत कल्याणाच्या दृष्टीनें त्या छायेवरील बहिष्कार दूर केला. महात्मा गांधी तर आमच्याही पुढे गेले. त्यांनीं अंत्यजांच्या छायेसच केवळ नाहीं, तर खुद्द अत्यजानाही स्पर्शपावन करण्याची आज्ञा केली. यापुढें आम्ही त्यांची सांवली अंगावर निमूटपणे पडू दिली पाहिजे इतकेच नाहीं, तर त्यांनीं आम्हांस स्पर्श केला तरी हू कीं चू करितां कामा नये. आपल्यापैकीं एखाद्या धाडसी पुरुषाने त्याना ? ापण होऊनही स्पर्श केला तरी त्यानें महात्मा गांधींची आज्ञा मोडली असें म्हणतां येणार नाहीं. पण त्या आज्ञेची मर्यादा येथेंच सपते हे आपण लक्ष्यांत ठेविले पाहिजे. खुद्द महात्मा गांधींचा वर्णाश्रमधर्माबद्दर ी आदर आहे हे मीं तुम्हांला सांगितले पाहिजे असें नाहीं. पुढील । ्र महात्मा गांधीं-पेक्षांही एखादा श्रेष्ठ महात्मा उत्पन्न होऊन अंत्यजांस पंक्तिपावन करून घेण्याची आज्ञा करील तर ती अमलांत आणणे त्या पिढीचे कर्तव्य होईल. तिच्या पुढील पिढींत एखादा श्रेष्ठतम महात्मा अत्यजांच्या हातचे खाण्याचे तिला फर्मान सोडील तर ते शिरसामान्य करणे त्या पिढीचें पवित्र कर्तव्य होईल. फार काय; पण ेथून शंभराव्या पिढींतील महात्मा गांधींच्या शंभरपट श्रेष्ठ अशा एखाद्या महात्म्याने अत्यजांशी अनुलोम बेटीव्यवहार सुरू करण्याचा वटहुकूम सोडिला नर गोम्या महाराची किंवा सोम्या मांगाची मुलगी स्पृश्य मानण्यास आम्हां ब्राह्मणांची तयारीच राहील. (येथें " तोंड बद करा !", " खालीं बसा ! " अशा चोहोंकडून आरोळ्या ऐकू येऊ लागल्या. त्यामुळें वक्त्यांनीं जरा नमतें घेण्याचें ठरविलें.) कोणाचाही अपमान करण्याचा माझा इरादा नाहीं. माझ्या बोलण्याचा मतलब म्हणून इतकाच कीं या साऱ्या पुढील पिढ्यांच्या गोष्टी आहेत.. आपण आपल्या पिढीपुरते पाहिले म्हणजे झालें. आपलें कर्तव्य फक्त अत्यजांना स्पृश्य लेखणें इतकेंच आहे. त्याहून कमी लेखिलें तर महात्मा गांधींच्या आज्ञाभगाचें पातक जसें आपणाला लागणार आहे तसें त्यांना अधिक लेखूनही लागणार आहे. आम्ही

आज महारमांगाना आमच्याशीं खेटून बसूं देण्यांत आपलें कर्तव्य पूर्णपणें बजाविले आहे. त्यांनींही आपली मागणी वाढवून आम्हांला संकटांत पाडूं नये अशी माझी त्यांना नम्रपणें विनति आहे. आमचा हजारों वर्षे चालत आलेला व महात्मा गांधींच्या आवडीचा सनातन वर्णाश्रम-धर्म सोडण्याची त्यानीं आम्हांकडून मुळींच अपेक्षा करूं नये. तो सोडिल्यास आम्ही जसे पातकाचे अधिकारी होऊ तसे आम्हास कर्तव्य-च्युत करू पहाणारे अत्यजही होतील हे त्यानीं पूर्णपणे लक्ष्यांत ठेवावें. महात्मा गांधींची दुसरीही एक आज्ञा त्यांनी ध्यानात वागविली पाहिजे. आपण सर्वांनीं स्वावलंबी व्हावे अशी त्याची आपणास शिकवण आहे. तिलाच अनुसरून त्यानीं कारखान्यांचा व विलायती कापडाचा निषेध करून चरख्याचा व खादीचा प्रसार केला, सरकारी शाळांचा उच्छेद करून खाजगी राष्ट्रीय शाळा काढिल्या, न्यायमंदिरांचा तिरस्कार करून पंचायतींचा व लवादाचा पुरस्कार केला. हिंदुस्थानाने परदेशावर किंवा पर-कीय सत्तेवर अवलंबून रहाणे हे जितके निंद्य तितकेच अत्यजांनीं वरिष्ठ जातींच्या साहाय्यावर अवलंबून रहाणे आहे. वरिष्ठ जाती जर आमच्या पंक्तीस बसून जेवतील किंवा आमच्या हातचे खातील तरच आम्ही हिंदु धर्मात राहू, नाहीं तर परधर्मात जाऊ हा आग्रह त्यांनी सोडून दिला पाहिजे. जेवणाखाण्याचा व पंक्तिप्रयोजनाचा मक्ता आम्हीं ब्राह्मणानीं घेतला आहे; त्यात त्यानीं ढवळाढवळ करू नये. ( ही विनोदी छटा श्रोत्यांच्या क्षुब्ध मनोवृत्तींस रुचली नाहीं हे पाहून वक्ते गांभीर्याचे उसने अवसान आणून म्हणाले,) आमच्या कामांत ढवळाढवळ न करण्याचे त्यांनी कबूल केल्यास त्यांच्या कामांत ढवळाढवळ न करण्याचे मी स्पृश्य समाजातर्फे त्यांस अभिवचन देतों. त्यांनीं आमच्या वस्तीत रहाण्यास येण्याचा व आमच्या घरांच्या उंबरठ्यांच्या आंत प्रवेश करण्याचा हट्ट सोडून दिला तर आम्हीही त्यांच्या वस्तींत व घरांत पाऊल न ठेवण्याचे कबूल करूं. गेल्या हजारों वर्षांत अस्पृश्य आमच्या वस्तींत फिरत असतां आम्हीं एकदा तरी त्यांच्या वस्तींत जाण्याची आगळीक केली का याचा त्यानींच जबाब द्यावा. आम्ही ब्राह्मण आजपर्यंत क्षत्रियांच्या सत्तेची किंवा वैश्यांच्या संपत्तीची हांव न धरितां भिक्षावृत्तींतच संतुष्ट रहात आलों, त्याप्रमाणें

अंत्यजांनीही इतर जातींच्या विशिष्ट हक्कांचा हेवा करितां कामा नये. त्यांत त्याचा लाभ नसून उलट हानिच आहे. आम्ही परकीयांची नक्कल करू लागल्यामुळे आमचा साधेपणा नष्ट झाला. अत्यजानीं परजातींचे अंध अनुकरण केल्यास त्यांचाही साधेपणा नाहीसा होईल. हल्लीं त्यांचा जीवनक्रम वरिष्ठ जातींनीं हेवा करण्यासारखा आहे. गावांतल्या गलिच्छ वस्तीपासून दूर उघड्या हवेत रहावयाचे आणि मिळेल त्यांत समाधान मानून इतरांचे कल्याण करीत आयुष्य घालवायचे! इतर लोकानीं लोक-सेवेच्या नुसत्या गप्पा माराव्या! खरी लोकसेवा करणारे एकटे अस्पृश्यच आहेत. ज्या प्रकारची सेवा करणे निःसीम देशभक्ताच्याही जिवावर येईल तो सेवेचा प्रकार अस्पृश्यच काय ते करू जाणत. ते आहेत म्हणूनच आम्हां वरिष्ठ जातींची स्वच्छता कायम राहिली आहे आम्हाला स्थानिक स्वराज्याचे हक्क मिळाले. पण अस्पृश्यावाचून त्याचे पानही हलत नाहीं. अस्पृश्य जर वरिष्ठ जातींशीं स्पर्धा करू लागतील तर त्यांच्यात वरिष्ठ जातींचे गुण न येतां ते आपलेही गमावून बसतील. त्यांना जातिभेद नको आहे; पण त्यांचा आपसातील जातिभेद अजून कायमच आहे. चांभाराला महाराच्या हातचे खायला नको, महाराला मांगाच्या हातचं खायला नको आणि तिघांपैकीं एकालाही भंग्याच्या हातचे खायला नको. वरिष्ठ जातींनीं मात्र त्यांच्या हातचें खायला तयार झाले पाहिजे! (अस्पृश्य श्रोत्यांतून "आम्ही एकमेकाच्या हातचे खायला तयार आहोत." अशा आरोळ्या.) तुम्हांमधील भेद अल्प च फिरकोळ असल्यामुळें तुम्ही कदाचित् परस्परांच्या हातचें खायला तयार व्हाल. चिमणपुरांतील ब्राह्मण आणि कुणबीमाळी यांनींही गेल्या दोन वर्षांपासून परस्परांशीं रोटीव्यवहार सुरू केला आहे असे मघाच्या वक्त्याच्या सांगण्यांत आलें. पण वरिष्ठ जातींनीं काय किंवा कनिष्ठ जातींनीं काय, तो व्यवहार परस्परांत करणें निराळे आणि वरिष्ठ जातींनीं कनिष्ठ जातींशीं करणें निराळे. येथें इतके कुणबी माळी जमले आहेत, त्यांपैकीं एक तरी अस्पृश्य जातींशीं अन्नव्यवहार करायला तयार आहे काय! (शूद्र श्रोत्यांमधून "आम्ही आहोत." अशा अर्थाच्या गर्जना ऐकू येतात.) हे नुसते पोकळ आशीर्वाद झाले! ही गोष्ट जर इतकी सोपी आहे, तर यापूर्वीच एखादा शूद्र कां नाहीं महारमांगांच्या हातचें

जेवला ? ("नाना मराठे जेवले आहेत." अशा अर्थाच्या आरोळ्या.) तुम्हांपैकी एकानेंही त्याला जेवतांना स्वतःच्या डोळ्यानीं पाहिले नाहीं. तुम्ही मागाचा पुरावा द्याल. पण तो स्वजातीच्या हिताकरिता वाटेल तें सांगायला तयार होईल. यासबधाने योग्य पुरावा खुद्द नाना मराठ्याचाच आहे. त्याची कबूली त्याच्या हितसबंधांच्या विरुद्ध असल्यामुळे पुराव्याच्या कायद्याच्या दृष्टीनेही ग्राह्य होईल. तो येथे असल्यास त्याने समोर येऊन स्वमुखाने स्पष्ट कबुली जबाब द्यावा; म्हणजे माझें काहीं म्हणणे नाहीं." नाना मराठे गांवात नाहीं हें जाणूनच चिमणरावानीं हा बिनतोड मार्ग सभेस सुचविला होता. त्याने क्षणभर सर्व सभा निरुत्तर होऊन मुकाट्याने बसली.

इतक्यात महार लोकांच्या रांगांत गडबड सुरू झाली, आणि त्यामधून डोक्यावर शुभ्र जटा व हनुवटीखालीं लांब दाढी धारण करणारी एक मूर्ति गंभीरपणें चालत उच्च स्थानावर येऊन उभी राहिली. चारी बाजूनीं "मौनी महाराजकी जय!" या शब्दांच्या ललकाऱ्या सुरू झाल्या.

मौनी महाराज कृत्रिम स्वराने चिमणरावांस म्हणाले, "आपणाला नाना मराठे पाहिजे आहे ना ? मीच नाना मराठे आहे."

चिमणराव उच्च स्वरांत म्हणाले, "माझ्या माहितीप्रमाणें नाना मराठे जोगी किंवा बैरागी नसून हमाल आहे."

इतक्यांत हैवती उच्चासनावर चढून ओरडून म्हणाला, "मौनी महाराजच नाना मराठे आहेत. आजपर्यंत हें रहस्य त्यांना व मला माहित ठाऊक होते. आज त्यांनींच तें फोडिल्यामुळे मला जाहीर करायला कांहींच हरकत नाहीं."

चिमणराव आपल्या स्थानावरून पुढें सरसावून म्हणाले, "उंदराला मांजर साक्षी व्हावयाचेच ! सभ्य गृहस्थहो, हें उघड उघड या दोघांमधील कपटकारस्थान आहे. नाना मराठे स्त्रियांना मोह पाडण्यासारखा सुंदर व तरुण, आणि हा जोगडा तर कुरूप व म्हातारा आहे." ("महाराजांना जोगडा म्हणूं नका. तो शब्द परत घ्या." अशा आरोळ्या.) तुम्हां सर्वांची इच्छा असेल तर परत घेतों बापडा. बाकी मौनी महाराज

आपण नाना मराठे आहोत अशी बतावणी करीत आहेत यावरूनच मीं त्यांना लावलेला शब्द योग्य होता हें उघड होईल."

हैबती म्हणाला, "ही महाराजांनीं चालविलेली बतावणी नाही. हे नाना मराठेच आहेत. मीच दुष्टाने अघाऱ्या रात्रीं त्यांच्या डोक्यावर सोटा मारून त्यांना बेशुद्ध केलें आणि ते बेशुद्धींत असतां त्यांच्या तोंडावर एक भयकर अर्क ओतून ते जन्माचे विद्रूप केले. त्या रात्रीं त्यांना जी दारुण चिंता लागली होती तिनेंच त्यांच्या डोक्याचे केंस पांढरे झाले."

चिमणराव—त्यांचें इतके नुकसान करण्याचें कारण ?

हैबती—केवळ एक निराधार संशय. त्यांनीं त्या दिवशीं अस्पृश्यांच्या हातचें पाणी व अन्न घेऊन मुद्दाम माझ्या पक्षाची फजीती केली आणि पुढे एका सावकाराला चिथावून माझ्या घरावर जप्ती आणविली या संशयावरून मी त्यांचें भयकर नुकसान केले. मीं त्यांचे तोंड तर कायमचें विद्रूप केलेंच; पण त्यांच्यावर व एका साध्वीवर एक घाणेरडा आळही घेऊन त्या साध्वीच्या नवऱ्याचें मन एका निनांवी पत्राच्या द्वारें उभयतांबद्दल बिघडवून टाकिलें. या पाप्याला समाधान वाटायला एकच जागा आहे. माझा संशय निराधार आहे असे एका अकल्पित प्रसगानें कळतांच मीं मौनी महाराजांच्या मठींत जाऊन त्यांचे म्हणजे नाना मराठ्याचेच पाय धरिले आणि त्यांची पश्चात्तापपूर्वक क्षमा मागितली.

चिमणराव—आणि त्या साध्वीच्या अब्रूचें कसें काय ?

हैबती—मीं तिच्या नवऱ्याला दुसरें निनांवी पत्र पाठवून सगळ्या गोष्टीचा खुलासा केला.

चिमणराव—मित्रहो, ऐका ऐका. निनांवी पत्रे लिहून कुलीन स्त्रियांची अब्रू धुळीला मिळवू पहाणारे हे सभावित गृहस्थ आणि साधु-पणाचे सोंग घेऊन बायाबापड्यांना नादी लावणारे हे महाराज या सिद्धसाधकांच्या दुकलीवर विश्वास ठेवून तुम्ही यांना नाना मराठे म्हणून ठरविणार कीं काय ?

इतक्यांत मांगांचा नाईक आपल्या जागेवरून उठून उभा राहिला

व ओरडून म्हणाला, "मौनी महाराज हेच नाना मराठे याबद्दल दुसरा साक्षीदार पाहिजे असल्यास मी हजर आहे."

चिमणराव व हैबती यांचीं उत्तरें प्रत्युत्तरें ऐकत श्याम मुकाट्यानें उभा होता. पण आपल्या मौनाचा परिणाम हैबतीस व नाइकास भोंवणार असें दिसतांच त्यानें त्या उभयतांस उद्देशून "माझ्या मित्रांच्या कळकळीबद्दल मी त्यांचा फार ऋणी आहें. पण त्यांनीं मजकरितां संकटांत पडण्याचें कारण नाहीं." असें म्हटलें, व नंतर आपल्या स्वाभाविक स्वरानें तो सभासदांना संबोधून म्हणाला, "मित्रहो, मी साधु नाहीं हें मीं मठांत आपणाला वारंवार सांगितलें आहे. माझ्या वास्तविक स्वरूपाचा मीं आपणांला पत्ता लागू दिला नाहीं ही गोष्ट खरी आहे. पण तसें करण्याला कारणही तसेंच भारी झालें. महारवाड्यांत व मांगवाड्यांत घडलेले प्रकार कळल्यापासून माझ्या भगिनीवर्गाचा मजवर चांगलाच रोष झाला होता. घर ना दार, गण ना गोत, अशा माझ्यासारख्या अनाथाला ज्या स्त्रियांनीं आपल्या मुलासारखें, भावासारखें वागविलें होतें त्यांनीं मजवर पाठ फिरविल्यावर मला काय वाटलें असेल याचा आपणच विचार करा. त्यांचीं मुलें माझा जीव कीं प्राण. त्यांची व माझी दृष्टभेटही होऊं नये असें वाटण्याइतका पातकी मी त्या माउलींच्या दृष्टीनें ठरलों तेव्हां हें तोंड काळें करण्यावांचून मला कोणता मार्ग राहिला होता ? ज्या कारणाकरितां मीं चिमणपुर सोडिलें त्याच कारणाकरितां मीं आपलें वास्तविक स्वरूपही आपणांपासून गुप्त ठेविलें. असो. मीं चिमणपुर सोडिल्यानंतरची हकीकत माझे एकदाचे हाडवैरी पण हल्लींचे परममित्र हैबतराव यांनीं आपल्या भाषणांत सांगितलीच आहे. केवळ माझ्या हेतूबद्दल गैरसमज झाल्यामुळेंच त्यांनीं माझें नुकसान करण्याचा प्रयत्न केला. पण त्यांच्या अंगीं अपमानाचा पुरा वचपा काढण्याचें सामर्थ्य व चिकाटी जशी आहे तशी झालेली चुकी कबूल करून नुकसानीची भरपाई करण्याचा थोरपणाही आहे हें त्यांच्या प्रांजलपणाच्या कबुली जबाबावरून आपणांस कळलेंच असेल. त्यांनीं मजवर प्रहार केला त्या वेळीं मी महारवाड्याच्या जवळच होतों. ती रात्र मीं भयंकर काळजींत घालविल्यामुळे हे केंस पांढरे झाले.

जवळच हरबा महार यांची झोंपडी होती. त्यांनीं जर माझी मृत्यूपासून सोडवणूक केली नसती तर आज आपली भेट होण्याचा सुयोग आला नसता. माझें त्यांना पहांटेच्या प्रहरीं विलक्षण परिस्थितींत झालेलें दर्शन, त्या प्रसंगीं माझ्या तोंडांतून बाहेर पडलेले कांहीं चमत्कारिक शब्द आणि त्यांचा भाविक स्वभाव या सान्याचा परिणाम होऊन मी त्यांना अवतारी पुरुष वाटावयास लागलों. मी सिद्ध पुरुष नसल्याबद्दल त्यांना व इतरांना मीं परोपरीनें व निक्षून सांगितलें; पण त्याचा परिणाम उलट झालेला पाहून मीं त्यांची समजूत करण्याचा नाद सोडून दिला व अंगीं चिकटलेल्या साधुत्वाचा माझ्या अस्पृश्य बांधवाप्रीत्यर्थ उपयोग करण्याचें ठरविलें. साक्षरतेची अट, भाकरीचा प्रसाद आणि स्पृश्य वर्गाकडून अस्पृश्य वर्गाच्या चालीरीतींत घडवून आणलेली सुधारणा यांचा अर्थ आतां आपल्या लक्ष्यांत आला असेल. चिमणपुरकर स्त्रिया माझ्या दर्शनास आल्या असतां त्यांचा मजवरील राग पूर्णपणें मावळ-ल्याचें मला दिसून आलें, व म्हणूनच मीं अस्पृश्यांच्या चालीरीतींत सुधारणा घडवून आणण्याची कामगिरी त्यांजकडे सोंपविली. त्यांचा नाना मराठ्यावरून उडालेला विश्वास पुन्हां त्याजवर बसलेला मीं पाहिला, तेव्हां आतां चिमणपुरकरांसमोर माझ्या खऱ्या स्वरूपानिशीं प्रकट होण्यास कोणतीच हरकत नाहीं असा मीं मनाशीं निश्चय केला व तसें करण्याच्या संधीची वाट पहात राहिलों. आजच्या सभेंत माझ्या प्रिय अस्पृश्य बांधवांचें आणि पर्यायानें माझ्या प्रिय हिंदु धर्माचें भवितव्य ठरणार हें पाहून त्यांस आपणाकडून कांहीं साहाय्य झाल्यास पहावें या हेतूनें येथें आलों. एखाद्या शूद्रानें मांगाच्या हातचें अन्न खाल्लें असें निर्विवाद-पणें शाबीत झाल्यास आपले आजचे सन्मान्य पाहुणे मातंगसमाजाची मागणी कबूल करण्यास तयार आहेत असा त्यांच्या आव्हानाचा रोख दिसल्यावरून मीं आपलें स्वरूप आपणां सर्वांसमोर प्रकट केलें आहे. माझी कबूली माझ्या स्वतःच्या हितसंबधांविरुद्ध असल्यामुळें त्यांना कबूल असली पाहिजे. मी नाना मराठेच आहें कीं एखादा तोतया आहे याबद्दल त्यांना स्वाभाविकपणेंच संशय वाटत आहे; तसा आपणांस वाटण्याचें कारण नाहीं. आपण मौनी महाराजांच्या दर्शनास पहिल्याच खेपेस

गेलांत तेव्हां त्यांनीं तुम्हांपैकीं बहुतेकांचीं नांवें ताबडतोब सांगितलीं या चमत्काराचें कारण ते व नाना मराठे एकच याशिवाय दुसरें कोणतें असूं शकणार? नाना मराठे ज्या दिवशीं चिमणपुरास परत येईल त्याच दिवशीं आपणही येण्याचें त्यांनीं तुम्हाला अभिवचन दिलें तेंही त्याच्या तादात्म्याच्या बळावरच दिले. मी मौनी महाराज बनलों तो कोणत्याही दुष्ट हेतूनें बनलो नाहीं किंवा स्वेच्छेनेही बनलों नाहीं. त्याचप्रमाणे आज नाना मराठे म्हणून प्रकट होत आहें तोंही केवळ शुद्ध हेतूनेंच होत आहे. आजपर्यंत मला आपला स्वाभाविक स्वर लपवून कृत्रिम स्वर धारण करावा लागला होता. मी आपणांमध्ये असतांना ज्या स्वरानें बोलत असें त्याच स्वरानें या क्षणीं बोलत आहे. आपल्या या पाहुण्यां-प्रमाणे आपणांलाही जर अजून माझ्या खऱ्या स्वरूपाबद्दल शंका असेल तर मला प्रश्न विचारून ती फेडून घ्यावी. यापूर्वी शेकडो वेळा माझे आपणांपैकी बहुतेकांशीं शेंकडो प्रकारचे दर्शनभाषणप्रसंग घडून आले आहेत. त्यांतून एखादी खुणेची गोष्ट आपण मला विचारावी व आपली खात्री करून घ्यावी. मला आपलें खरें स्वरूप आजपर्यंत आपणां-पासून लपवितां आलें; पण आपल्या अर्भकांपासून लपवितां आलें नाहीं. मी मठींत त्यांना जेव्हां जेव्हां जवळ घेई तेव्हां तेव्हां तीं माझ्याशीं पूर्वीप्रमाणेच सलगीनें वागत, याला माझ्या चिमणपुरकर भगिनीच साक्ष आहेत. त्याबद्दल माझ्या बंधूस शंका असेल तर त्यांनीं येथें हजर असलेलें माझ्या पूर्व परिचयाचें कोणतेंही अर्भक घेऊन यावें; म्हणजे तेंच त्यांची व आपल्या पाहुण्यांची खात्री करील. मात्र खात्री झाल्यावर मांगांच्या मागणीस विरोध करण्याचें पाहुण्यांनीं सोडून दिलें पाहिजे."

श्यामचें हें सरळ भाषण सर्व सभासद चित्रांप्रमाणे तटस्थ होऊन ऐकत होते त्यामचा स्वाभाविक स्वर त्यांच्या कानावर पडतांच त्याची त्यांस ओळख पटली. परंतु त्याची मूर्ति डोळ्यासमोर व त्याचा स्वर कानांवर अनपेक्षितपणे आल्यामुळे वाटणारें आश्चर्य, तो त्यांस सोडून गेल्यापासून आतांपर्यंतचा काळ त्यानें कसा घालविला असेल हें कळ-ण्याची उत्सुकता, तो एकदां मृत्यूच्या किती सनिध गेला होता या विचारापासून वाटणारें भय, त्याच्या संकटमुक्ततेमुळे ईश्वराबद्दल वाटणारी

कृतज्ञता, त्याचें आपणावरचें व आपल्या स्वकीयांवरचें प्रेम अजून कायम आहे हें कळल्यामुळें होणारा आनंद, त्यानें लोकोपकाराचा आपला व्यवसाय अजूनही अव्याहतपणें चालविलेला पाहून त्याबद्दल वाटणारा आदर, त्याला काढावे लागलेल्या हालांबद्दलची अनुकंपा, त्यानें केवळ आपल्या सरळपणाच्या बळावर चिमणरावासारख्या कावेबाज वकिलावर मिळविलेल्या विजयामुळें त्याजबद्दल वाटणारा अभिमान, असा थोर पुरुष पुन्हां चिमणपुरास लाभल्याबद्दल वाटणारी धन्यता अशा विविध भावनांमुळें त्याच्या भाषणांत व्यत्यय आणण्याचे भान एकासही राहिलें नाहीं. भाषण संपतांच मात्र सर्वांच्या मनातील रुद्ध झालेल्या त्या भावना भिन्न भिन्न क्रमांस अनुसरून उद्गाररूपानें वेगानें बाहेर पडू लागल्या, व "नानाच हे!", "पुरी खात्री झाली!", "केवढें हें आश्चर्य!", "खैर झाली!", "याला म्हणावें महात्मा!", "नाना, कायहो तुमची अवस्था!", "खूप मात केली!" इत्यादि वाक्यांचा एकच कल्लोळ उडून गेला. काहीं इसम तर श्यामला प्रेमालिंगन देण्याकरिता उच्चासनावर चढावयास पहात होते. पण ते वर आल्यास खूपच गोंधळ माजेल या भीतीने अध्यक्षांनीं त्यांना आपल्या अधिकारी वाणीनें आपापल्या स्थानीं परत जावयाला भाग पाडिलें.

चिमणराव हा सर्व प्रकार पाहून गोंधळून गेला. पण हा प्रसंग आणीबाणीचा आहे, या वेळीं प्रसंगावधान न ठेविल्यास आपली कायमची नाचक्की होईल हें जाणून त्यानें आपलें बावरलेलें चित्त थाऱ्यावर आणिलें, आपलें सारे बुद्धिसामर्थ्य एकवटून एकाग्र केलें व येऊन ठेपलेल्या प्रसंगाचा घाईनेंच पण सर्व अंगानीं विचार केला. सभेंत चाललेला नाना मराठ्याचा बहुमान म्हणजे पर्यायानें आपला स्वतःचा अपमान आहे, नाना ज्या मानानें पूज्य वाटत आहे त्या मानानें आपण तिरस्कार्य वाटत आहोत, नानाच्या सौजन्यानें पौरांच्या हृदयांवर मिळविलेलें स्वामित्व एका क्षणांत खिळखिळें करणें शक्य नाहीं, त्याच्या बुद्धीवर विजय मिळविणे मात्र पूर्णपणे शक्य आहे, तो विजय आपणास मिळाल्यास उभयतांची बरोबरी झाली असें आपणास उजळ माथ्यानें म्हणतां येईल असा विचार करून व आपल्या वैऱ्याचा पाडाव

करण्याचा एक उपाय मनांत योजून तो क्षुब्ध झालेलें वातावरण जरा थांत होतांच म्हणाला, "हे नाना मराठे असल्याबद्दल इतर सभासदां-प्रमाणें माझीही खात्री झाली आहे. पण यांचा माझ्या भाषणासंबंधानें जरा गैरसमज झाला आहे. एकाही शूद्राने मांगाच्या हातचे खाल्ल्याचें सिद्ध झालें तर मी मातंग समाजाची मागणी मान्य करीन अशी अट यांना वाटते त्याप्रमाणें माझ्या भाषणांत गर्भितही नव्हती; मग स्पष्ट असणें दूरच राहिलें."

इतक्यांत मांगांचा नाईक ओरडून म्हणाला, "असे निसटून जाऊं नका. तुमच्या बोलण्याचा झोंक तोच होता."

चिमणरावांनीं तात्काळ प्रत्युत्तर दिलें, "मीं अशी अट ठेवणे संभ-वेल तरी कसें ? शूद्राची अस्पृश्यांबद्दलची भावना किती तीव्र असते याचा मला काय अनुभव ! शूद्रांची जात अस्पृश्यापेक्षां ब्राह्मणाइतकी श्रेष्ठ नसल्यामुळे त्याची भावनाही आमच्याइतकी तीव्र नसायची असाच माझा समज असणे स्वाभाविक होते. शिवाय नाना मराठ्यांनीं मांगाच्या हातचें खाल्लें असल्याबद्दल चिमणपुरकराचा समज आहे ही गोष्ट सभे-पूर्वींच माझ्या कानांवर उडत उडत आली होती, व त्या बातमीस हैबतरावांच्या भाषणाने पुष्टिही मिळाली होती. जी गोष्ट याप्रमाणे खरी ठरण्याचाच विशेष संभव तिजवर या सभेचा निर्णय अवलंबून ठेवण्या-इतका मी वेडा का आहे ! मीं अट ठेविलीच असती तर ती स्वतःच्या जातीबद्दल ठेविली असती. अजूनही तशी अट ठेवून आव्हान करण्याला मी तयार आहे. ते स्वीकारायला कोणी तयार असल्यास त्यानें पुढें यावें."

नाईक—एकदां तुमची शर्त मोठ्याने सर्वांसमक्ष जाहीर करा; म्हणजे पुढें गैरसमजाला जागा रहाणार नाहीं.

चिमणराव—ऐका तर. एकाही ब्राह्मणाने अस्पृश्याच्या घरीं अस्पृश्य स्त्रीनें तयार केलेलें अन्न खाल्ल्याचे या सभेंत सिद्ध झाले तर मी मातंग समाजाच्या मागणीस मोठ्या खुषीने मान्यता देईन.

श्याम—पण जरी एखाद्या ब्राह्मणानें अस्पृश्याच्या हातचे खाल्लें असलें तरी तें सिद्ध होण्यास मघांसारखी कायदेशीर अडचण यायचीच.

चिमणराव— अडचण आली तर ती मधांप्रमाणे दूरही होऊ शकेल. तुम्ही स्वमुखानें कबूली देतांच आम्हीं ती मान्य धरिली त्याप्रमाणें त्या ब्राह्मणानें कबूली दिल्यास तीही मान्य धरूं.

श्याम—बरे, मीच ब्राह्मण आहें असे ठरले तर पुन्हां मला निराळा कबुली जबाब द्यावा लागेल का ?

चिमणराव—मुळींच नाहीं.

श्याम—तर मग मीच ब्राह्मण आहे असे समजा.

चिमणराव—येथें कल्पनेचे काम नाहीं. बाप दाखीव नाहीं तर श्राद्ध कर हाच न्याय येथे लागू पडणार आहे.

श्याम—बरें, मी ब्राह्मण असल्याबद्दल जो पुरावा द्यायचा त्याचें स्वरूप तरी कसें असले पाहिजे ? मीं मौनी महाराजांच्या वेषात असतां वेदांतील ऋचा चिमणपुरकरांस घडाघड म्हणून दाखविल्या होत्या याबद्दल येथील बरेच सभासद साक्ष देतील. आपली इच्छा असेल तर तो प्रयोग येथेंही करून दाखविण्याला माझी हरकत नाहीं. मात्र त्या ऋचा मी बरोबर म्हणत आहे कीं नाहीं हें आपणाला ओळखतां आलें पाहिजे.

चिमणराव—या काळांत शूद्रांनाही वेद पाठ असतात.

हैबतराव मध्येंच ओरडून म्हणाला, "आणि ब्राह्मणांनाही पाठ नसतात."

श्याम—बरें, मी ब्राह्मण असल्याबद्दल आपली खात्री पटविण्यासारखा जो साक्षीदार द्यावयाचा तो ब्राह्मणच असला पाहिजे अशी आपली अट आहे का ?

चिमणराव—ब्राह्मण असलेला बरा. पण दुसऱ्या जातीचाही चालेल. मात्र त्याच्या प्रामाणिकपणाबद्दल माझी खात्री असली पाहिजे. त्या साक्षीदारानें तुमचें बालपण पाहिले असेल तर अहंविशेष.

श्याम—बरें, तो साक्षीदार पुरुषच असला पाहिजे कीं स्त्रीही चालेल ?

चिमणरावः—स्त्रीही चालायला हरकत नाही. मात्र तिचा शब्द मला आप्तवचनाप्रमाणें विश्वसनीय वाटला पाहिजे.

श्यामः—कबूल. तिचें वचन आपणांला आप्तवचनच वाटेल. पण त्या स्त्रीची आपणांविरुद्ध व माझ्यातर्फे साक्ष देण्याला तयारी आहे का हेंही मला पाहिलें पाहिजे.

चिमणराव:—माझ्याविरुद्ध साक्ष देण्याला त्या स्त्रीने कचरण्याचें काय कारण ?

श्याम:—कां बरें ? ती आपली आप्तच असली तर ? बाकी ती खोटें बोलणार नाहीं अशी माझी खात्री आहे. शिवाय ती आपली आप्त आहे तशी माझीही आप्त असण्याचा संभव आहे.

चिमणराव मनांत दचकला. आपल्या पत्नीने आपणाविरुद्ध साक्ष देण्याचा लाजिरवाणा प्रसंग हा बेमुर्वतखोर मनुष्य आणणार कीं काय ? अशी भीतिप्रद शंका त्याच्या मनांत उभी राहिली. श्यामचा त्यास रागही आला. पण ते दोन्ही विकार दाबून तो उसन्या बेपर्वाईने म्हणाला, "काय म्हणतां ? तुमची आणि माझी आप्त एकच ब्राह्मण स्त्री ? माझ्या एखाद्या आप्तस्त्रीकडून भाऊबिजेस ओंवाळून घेतल्यामुळे तर नाहींना तुम्ही तिचे भाऊ बनलां ? किंवा तुमच्या शूद्र आईने तर नाहींना तुम्हाला सांगितलें कीं तुमच्या ब्राह्मण वडिलांची एखादी नातेवाईक स्त्री माझीही आप्त आहे म्हणून ?

उभयतांचे संभाषण कोणत्या थराला जाणार याचा अजमास न कळल्यामुळे संपूर्ण सभा एकदा एकाकडे तर दुसऱ्यादा दुसऱ्याकडे याप्रमाणें टकमक पहात होती. श्यामने वेदांतील ऋचा घडाघड म्हट-ल्याचें स्मरण अनेक सभासदांना होतें. पण चित्तक्षोभामुळे ती गोष्ट ते विसरून गेले होते. श्यामने त्यांची स्मृति जागृत करतांच 'नाना मराठे खरोखर ब्राह्मण तर नाहीं ना ?' अशी त्यांस क्षणभर शंका आली. पण समोर चाललेल्या अत्यंत क्षोभजनक प्रसंगापुढे त्या शंकेच्या संयुक्तिक-तेचा विचार करण्यास त्यांस सवडच झाली नाहीं. चिमणरावाचे अखेरचें कुत्सित वाक्य ऐकून मात्र त्यास त्याची पराकाष्ठेची चीड आली. आपला आवडता नाना आपणास पुनः भेटला असतां त्या आनंदावर विरजण घालणारा हा उपटसुंभ कोठून उपस्थित झाला असे त्यास झालें. नाना लहान गांवचा अशिक्षित रहिवासी असतां त्याने पाहुण्याशी सभावित-पणाचें वर्तन करावें, आणि पाहुणा मोठ्या शहराचा सुविद्य नागरिक असतां त्याची फेड अत्यंत नीच व उर्मट वर्तनाने करीत आहे हे पाहून त्याची

त्यांस किळस आली. ते क्रोधानें लाल झाले. त्यांच्या क्रोधाच्या आगींत त्याच्या पुढील कमालीच्या हलकटपणानें तेलच ओतिलें.

श्यामही चिमणरावांवर संतप्त होऊन गेला होता; तथापि चिमणरावाचा डाव आपणास रागानें बेभान करून आपण स्वीकारलेलें आव्हान विफल करण्याचा आहे हें ओळखून तो आपला राग गिळून गेला. चिमणराव चिमणाताईचा पति आहे हा विचारही त्याच्या आत्मसयमनास कारण झाला. चिमणाताईचा पति चिमणपुरास आला आहे ही गोष्ट त्यास सभेपूर्वीच कळली असून चिमणरावाचें भाषण चालू असतां ती त्याजकडे ज्या मुद्रेनें पहात होती तिजवरून त्यानें त्यास पुरतें ओळखिलें होतें. असा पशुतुल्य पति मिळाल्याबद्दल त्यास चिमणाताईची अत्यंत कींव येत होती. तथापि आपण रागाची चुणूक न दाखविल्यास हा नीच फारच शेफारेल या विचारानें त्यानें त्यास स्थिर व शांत स्वरानें म्हटलें, "आपण काय बोलत आहांत याचें आपणांस भान नाहींसें दिसतें. मला ब्राह्मणाच्या पोटचा शूद्र स्त्रीपासून झालेला लेकवळा म्हणण्याचा आपला इरादा आहे का ? असेल तर आपण शुद्धीवर नाहीं असेंच मला म्हटलें पाहिजे."

"ब्राह्मणाशीं नाते जोडणाऱ्या शूद्राला एकदां नाहीं सातदां लेकवळा म्हणेन. तुम्हीच जरा झोकून आल्यासारखे दिसतां."

इतक्यांत वरील सज्जांतून "नाहीं नाहीं. नाना आईकडून व बापाकडून ब्राह्मणच आहेत. मी त्यांना लहानपणापासून ओळखतें."हें वाक्य क्षीण स्वरानें उच्चारलेलें ऐकू आले. पण तें फक्त श्याम, चिमणराव व गोपाळराव या तिघांनाच ऐकूं आलें, आणि स्वरावरून ते कोणाचें हेंही त्यांनीं ओळखिलें. श्यामनें एकवार सज्जाकडे कृतज्ञतेच्या मुद्रेनें पाहिलें. श्यामचा चिमणाताईची साक्ष देण्याचा विचार ठाम झाला नव्हता. एका बाजूस अस्पृश्यांचें कल्याण व दुसऱ्या बाजूस चिमणाताईची नाजूक परिस्थिति अशा संकटांत त्याचें मन हेलकावे खात होतें. त्या संकटांतून चिमणाताईनें त्याची मुक्तता केली होती, व म्हणून त्यास तिजबद्दल कृतज्ञता वाटणें साहजिक होतें. चिमणराव व श्याम यांचा सामना सुरू झाल्यापासून गोपाळरावांची स्थिति फारच अवघड झाली

होती. चिमणाताईंच्या साक्षीचा फायदा घेऊन त्या स्थितींतून सुटका करून घेण्याचा त्यांनीं विचार केला, व उठून "नाना मराठ्यांनीं आपलें ब्राह्मणत्व पूर्णपणें सिद्ध केलें आहे." असें म्हटले. पण चिमणाताईंच्या वाक्याप्रमाणें तें वाक्यही कोणास ऐकू गेलें नाहीं. चिमणरावाच्या हलकट भाषणानंतर सभासदांच्या क्षुब्ध मनोवृत्ति तुफान होऊन ज्या शिव्या-शापांच्या रूपानें बाहेर पडल्या त्यांच्या खळखळाटांत तीं दोन्ही वाक्यें महासमुद्रातील खसखशीच्या दाण्यांप्रमाणें पूर्णपणे लोपून केव्हांच नापत्ता झालीं. 'दिमाखखोर', 'हरामखोर', 'हलकट', 'पाजी' अशा किंकाळ्या शेकडों मुखांतून निघून कानांवर आदळू लागल्या. हैबती तर रागानें पिसाळल्यासारखा झाला होता. ज्या नानानें आपणास दारूच्या व्यसनापासून सोडविलें त्याजवर चिमणरावानें दारू पिण्याचा आरोप करावा याची त्यास मनस्वी चीड आली. त्याचें भान हरपलें. तो आपला सोटा घेऊन चिमणरावाच्या अंगावर धांवला. ज्या सोट्याचा प्रहार त्यानें श्यामच्या डोक्यावर केला होता त्यानेंच चिमणरावाचा कपाळमोक्ष करण्याचा त्याचा विचार होता. पण श्यामनें त्यास मध्येंच आवरलें. हैबत-रावाचें अनुकरण करून इतरही सभासद उच्चासनावर चढण्यास पहात होते. पण श्यामनें हातानें त्यास परतण्याची खूण करून त्याचें निवारण केलें. आपल्या पत्नीनें व श्वशुरानें आपणाविरुद्ध आपल्या वैऱ्याचा कैवार घेतलेला पाहून चिमणराव निष्फळ कोपानें व मत्सरानें हिरवापिवळा झाला होता. पण खवळलेल्या जनसमुद्राच्या पर्वतप्राय लाटा आपणास गिळण्याकरितां आ करून बसल्या आहेत हा भयंकर देखावा पाहून त्याचा कोप व मत्सर जागच्या जागींच जिरला, व तो केविलवाण्या दृष्टीनें श्यामकडे पाहूं लागला. इतक्यांत "श्यामराव, माझें सौभाग्य तुमच्या हातीं आहे. आपल्या वचनाला जागा." असे चिमणाताईंचे शब्द सज्जांतून ऐकूं आले. ते ऐकून श्यामनें तिकडे पाहून मान हलविली व "चिमणा-ताई, भिऊं नका." असें बोलून तिला आश्वासन दिलें. क्षणापूर्वींचा मगरूर चिमणराव आतां गोगलगाय होऊन कृतज्ञतादृष्टीनें श्यामकडे व चिमणाताईकडे पाहूं लागला. इतक्यांत समोरून मागाच्या रांगा आपल्या स्थानावरून उठून उच्चासनाकडे वावटळीप्रमाणें धांवत येतांना दिसल्या.

आपल्या मार्गांत कपटानें खो घालणाराचा प्राण घेण्याचा त्यांचा विचार त्यांच्या खुनशी दृष्टींत स्पष्टपणें दिसत होता. चिमणपुरकर उदार ब्राह्मणांचें जें सहानुभूतिपर वर्तन आजपर्यंत त्यांच्या अनुभवास आलें होतें त्याहून अगदीं भिन्न असा ब्राह्मण्याचा मासला त्यांना आज चाखावयास मिळाला होता. श्याम त्यांच्या गळ्यांतील ताईत होता. त्याच्याशीं चिमणरावानें शाब्दिक हिसकाहिसकी चालविलेली पाहून त्यानें आपल्याच गळ्यांस हात घातल्यासारखें त्यास वाटलें होतें. त्यांचा हजारों वर्षे सुप्तावस्थेंत असलेला स्वाभिमान एकाएकीं जागृत झाला व कृतीच्या द्वारें प्रगट होण्यासाठीं धडपड करूं लागला. इतक्यांत त्यांच्या नाइकानें "उठा, पहातां काय?" असा इशारा केला. त्याबरोबर एकदम उचल खाऊन त्या सर्वांनीं एक दिलानें उच्चासनाकडे धांव घेतली. धांवतांना आपण मार्गांत कोणास तुडवीत आहोंत याचीही क्षिति आजपर्यंत इतरानीं तुडविलेल्या त्या मार्गांनीं बाळगिली नाहीं. आपल्या मनाच्या वेगाहून आपल्या पायांची चाल फारच मंद आहे हें पाहून त्यानीं धांवतांधांवताच चिमणरावाचा नेम धरून बरोबर आणिलेले दगड फेंकण्यास सुरवात केली. उच्चासनावर त्यांच्या जातीचा एकही इसम नसल्यामुळें दगड नेम चुकून दुसऱ्या कोणास लागतील याचाही विचार करण्याचें त्याना रागाच्या बेभानपणांत कारण दिसलें नाहीं. उच्चासनावर बसलेल्या लोकांत एकच गडबड उडाली. जो तो आपल्या स्थानावरून उठून स्वतःच्या बचावासाठीं निवाऱ्याची जागा शोधूं लागला. दगडांचा वर्षाव होऊं लागलेला पाहून श्यामनें चिमणरावास आपल्या बाहूनीं कवटाळून धरिलें, व स्वर जितका उंच नेववेल तितका नेऊन तो म्हणाला, "थांबा, थांबा; माझे दोनच शब्द ऐका. हे गृहस्थ माझे मेहुणे आहेत. माझ्या बहिणीला विधवा करूं पहातां काय!" या शब्दांचा जादूप्रमाणें परिणाम झाला. साऱ्या नाटकगृहांत एकदम भीषण स्तब्धता पसरली. सभासदांना आपण ऐकिलेले शब्द खरे आहेत कीं काय याचा विचार करण्यास सवड मिळण्यापूर्वींच उच्चासनावर कोणी तरी धाडकन् पडल्याचा आवाज व सज्जांतून एक हृदयभेदक किंकाळी ऐकूं आली. उच्चासनावर पडलेला इसम खुद्द श्यामच होता. त्याच्या अंगास दगडांच्या अनेक जखमा झाल्या असून त्यांतून भळभळा रक्त वहात होतें, व त्यास भयंकर मूर्च्छा आली होती.

## प्रकरण सोळावें

# अखेर

सज्जानून आलेली किंकाळी चिमणाताईची होती. तिला आजच्या सभेस आणण्याचा गोपाळरावांचा व चिमणरावांचा विचार नव्हता. पण सभेत होणाऱ्या दंग्याचें आधीं स्वप्न पडूनच कीं काय, तिनें सभास्थानीं जाण्याचा हट्ट धरिला, व तिच्या क्षीण अवस्थेत तिची मर्जी मोडणें समंजसपणाचें होणार नाहीं हे जाणून त्यांनीं तिचा हट्ट पुरविण्याचें कबूल केलें. मात्र चिमणरावांनीं आपली मान्यता दर्शविण्यापूर्वी तिनें पुरुषांमध्यें न बसता स्त्रियांच्या सज्जांतच बसलें पाहिजे अशी अट घालण्याची खबरदारी घेतली होती. त्या अटीप्रमाणें ती सज्जात जाऊन बसली. पण तिचें सारें लक्ष्य उच्चासनाकडे होतें. पतीनें केलेला थाटमाट तिला मुळींच रुचला नाहीं. चिमणराव आज मांगांच्या सूचनेस पूर्णपणे प्रतिकूल असें धोरण स्वीकारणार असल्याची तिला प्रथमपासूनच भीति वाटत होती. सभासदांकडून पुढें आलेल्या तडजोडीच्या सूचनावरून अस्पृश्यांबद्दल सहानुभूतिच दिसून येत होती हें पाहून तिला समाधान वाटलें, व त्या सूचनावरून तरी लोकमताचा वारा ओळखून आपला पति आपलें प्रतिकूल धोरण सोडून देईल अशी तिला आशा वाटूं लागली. त्यानंतर हैबतीच्या भाषणावरून तोच निनांवी पत्रांचा लेखक असल्याबद्दल चिमणरावांप्रमाणे तिचीही खात्री झाली. पुढे चिमणराव बोलण्याकरितां उभे राहिले तेव्हां त्यांचें भाषण कसें काय वठतें याबद्दल तिला शंका वाटूं लागली. ती शंका जसजशी खरी ठरूं लागली तसतसें तिला सभेंत बसणें क्लेशकारक वाटूं लागलें, व आपण सभेस आलो ही चूक केली असा पश्चात्ताप करीत ती जागच्या जागींच चुळबूळ करीत राहिली. चिमणरावांचा पोषाख व साधेपणाचा उपदेश यांमधील विरोध, त्यांचा उसना विनय व उपजत अहंमन्यता यांमधील विसंगतपणा, त्यांनीं केलेली महात्मा गांधींची वरपांगी स्तुति व प्रच्छन्न निंदा यांतील विसंवाद

महात्मा गांधींचीं मतें आपलीं म्हणून मिरविण्याची व आपलीं क्षुद्र मतें त्यांजवर लादण्याची त्यांची हातचलाखी, 'अस्पृश्यता' या शब्दावरून व स्वावलंबनाच्या उपदेशावरून त्यांनीं काढिलेलीं चातुर्वर्ण्यास पोषक अशीं कुत्सित अनुमानें, त्यांनीं ब्राह्मणास अस्पृश्यांविरुद्ध चिथावण्याचा केलेला प्रयत्न व अस्पृश्यांची केलेली खोडसाळ प्रशंसा हे प्रकार पाहून तिला चिमणरावांचा केवढा अधःपात झाला आहे याची यथार्थ जाणीव झाली, व तिचें मन दुःखांत निमग्न झालें. परंतु इतक्यांत मौनी महाराज तेच नाना मराठे ही गोष्ट कळून तिचे चित्त दुःखाच्या गर्तेतून निघून आनंदाच्या शिखरावर जाऊन बसले. तेथे त्यास फार वेळ रहाता आले नाहीं. कारण त्याचे मागोमाग हैबतराव व श्याम यांच्या दिलदारपणाच्या पार्श्व-भूमीवर चिमणरावाच्या क्षुद्रपणा उठावानें दिसून तिचे मन पुन्हां उद्विग्न झालें. श्याम व चिमणराव यांच्या शाब्दिक झटापटीत श्यामचा थोरपणा व चिमणरावांचा नीचपणा पाहून तिच्या उद्विग्नतेत भर पडली. चिमणरावांनीं श्यामला दिलेला हलकटपणाचा टोमणा ऐकून तर तिला आपल्या नवऱ्या-ची किळस आली, व तिच्या भरांत तिनें श्यामच्या ब्राह्मणत्वाची साक्ष देऊन त्याचा पुरा पाडाव केला. पण यानतर तिजपुढे एक निराळेंच संकट उभे राहिलें. नवरा कितीही नीच असला तरी हिंदु स्त्री त्याचें अहित सहसा चिंतणार नाहीं. मग चिमणाताई तर प्रेमळपणाची मूर्तिच होती. नवऱ्याच्या प्राणांवर बेतलेली पाहून ती भयानें वेडी झाली. त्याजवर होणारा शिव्यांचा वर्षाव जसा तिचे काळीज कांपीत गेला तसा दगडांचा वर्षाव तिच्या मर्मास प्राणांतिक वेदना देऊं लागला. श्यामचें चिमणपुरच्या समाजावर व आपलें श्यामवर केवढे वजन आहे हे तिला चांगले माहीत होतें. श्यामने भाऊबिजेच्या दिवशीं दिलेले वचनही ती विसरली नव्हती. नुक्तीच तिनें त्याच्यातर्फे व आपल्या नवऱ्या-विरुद्ध दिलेली साक्ष ऐकून त्याने तिजकडे कृतज्ञतेने पाहिलें होतें. आतां तिच्या नवऱ्याचे प्राण वांचवून अनृणी होण्याची सोन्यासारखी संधि आली असतां ती तो वायां जाऊ देईल का? कधींच नाहीं. त्याच्या औदार्यावर तिची पूर्ण निष्ठा होती. तिनें संकटसमयीं त्याचा धांवा करून त्याला त्याच्या वचनाची आठवण दिली, व तोही वचनास

जागला. त्यानें चिमणरावाला आपल्या बाहूंनीं वेष्टून त्यास होणारा बाजवी देहदंड आपल्या अंगावर घेतला हें पाहून तिला कांहीं क्षण उत्कट आनंद व उत्कट दुःख यांचा संमिश्र अनुभव आला. नवऱ्याचा ग्याडपणा व संकटमुक्तता आणि श्यामचें औदार्य व प्राणसंकट यांच्या संयुक्त अनुभवामुळें आपण परमावधीच्या दुःखात आहोत कीं सुखांत हेंच तिला कळेना. पण अखेर नवऱ्याच्या सुरक्षितपणाबद्दल निश्चिती होऊन श्याम रक्तस्रावानें बेशुद्ध स्थितींत जमिनीवर पडलेला दिसला। तेव्हां तिच्या आनंदाचें पारडें वर जाऊन दुःखाचें खालीं बसलें, व तिला दुःखाच्या पर्वताखालीं चिरडून गेल्यासारखें वाटलें. ती एकदां श्यामची नेमस्त झालेली वधू असून तो तिच्या मातापितरांप्रमाणें तिलाही पसंत पडला होता. उलट चिमणरावाशीं तिचें लग्न उभयतांच्या स्वभावसादृश्याचा विचार न होताच झालें होतें. चिमणीचें नाव चिमणपुरावरून पडलें असल्याचा जसा संभव आहे त्याप्रमाणें चिमणीचें व चिमणरावाचें लग्न नामसादृश्यावरूनच झालें असल्याचाही संभव आहे. विवाहरूप काव्यात स्वभावसादृश्य हें औचित्याच्या ठिकाणीं असतें. औचित्याशिवाय रसोत्पत्ति होत नाहीं तशी स्वभावसादृश्याशिवाय संसारात सुखप्राप्ति होत नाही. परंतु वयाच्या अप्रौढ व मुग्ध अवस्थेत वधूवरांचे स्वभावच कळत नाहींत; मग त्यांच्यातील सादृश्य किंवा वैषम्य कोठून कळणार? यामुळें होतें काय, कीं औचित्याची ओळख नसलेले कवि ज्याप्रमाणें रसिकजनांची सारी भिस्त वृत्ताची विविधता, शब्दांचें व रचनेचें नावीन्य आणि वैचित्र्य, शब्दालंकार, अर्थालंकार इत्यादि उथळ गुणांवर ठेवितात त्याप्रमाणें वधू-वरांच्या स्वभावाविषयीं अनभिज्ञ असलेली त्यांची वडील मंडळी त्यांच्या सुखाची भिस्त ग्रहबल, गणगोत्रादिकांचा मेळ, वराची गृहस्थिति व हुशारी यांवर ठेवितात. अशा वेळीं नामसादृश्यासही नसतें महत्त्व येण्याचा संभव असतो. चिमणी व चिमणराव यांचें लग्न अशा लग्नांपैकीच होतें, व त्यांचें नामसादृश्य म्हणजे त्यांच्या वडिलांनीं विवाहरूप काव्यांत साधिलेला लाटानुप्रासच होय. तिचें त्याजवरील प्रेम ऐच्छिक नसून जुलमाचें होतें. तथापि दुसऱ्या कोणाही पुरुषाच्यापेक्षां त्याच्या कल्याणाची चिंता वहाणें हें तिचें विवाहित हिंदु स्त्री या नात्यानें कर्तव्य होतें, व त्या

कर्तव्यास ती अत्यंत इमानानें जागली यांत शंका नाहीं. पण तें कर्तव्य पार पडल्यावर श्यामचा जीव संशयित स्थितींत पाहून तिचें श्यामवरील उत्कट बंधुप्रेम जागृत झालें, व आपण केवळ स्वार्थबुद्धीनें अशा उदारधी पुरुषाच्या नाशाला कारण झालों अशी तिच्या मनाला तळमळ वाटूं लागली. त्या दिवशीं तिच्या अंतःकरणास शेंकडों अननुभूत व उत्कट भावनांचा थोड्याच अवकाशांत तीव्र अनुभव आला होता, आणि त्याचा ताण सोसण्याइतकी तिची प्रकृति सुदृढ नव्हती. ज्या क्षणीं श्याम बेशुद्ध झाला त्याच क्षणीं तिच्या पोटांत भयंकर कळ उठली, आणि शारीरिक व मानसिक यातनांचा कळस झाल्यामुळें तिच्या तोंडांतून ती हृदयभेदक किंकाळी निघाली. लौकरच तिला बेशुद्ध स्थितींत गाडींत घालून घरीं पोंचविण्यांत आलें.

इकडे श्यामलाही गाडींतून मल्हारीबाबांच्या घरांतील त्याच्या माडयाच्या खोलींत बंदोबस्तानें पोंचविण्यांत आलें. रक्तस्राव फार झाल्यामुळें त्याला अत्यंत क्षीणता आली असून त्यांतच सडकून तापही भरून आला होता. त्यास अंथरुणावर निजविलें तेव्हां तो तापानें नुसता फणफणत होता. तापाच्या भरांत त्याचें बरळणेंही सुरू झालें. त्यांतील महत्त्वाचे व सुसंबद्ध असलेले कांहीं भाग त्याचा क्रम बदलून खालीं दिले आहेतः—

"बाबा, मी 'ब्राह्मण' या नांवाला पात्र नाहीं हें तुमचें म्हणणें खरें आहे. शिकण्याकडे माझें डोकेंच चालत नाहीं, त्याला मी तरी काय करणार! आईला नाहीं का तुम्हीं निभावून घेतलें! तसें मला कां नाहीं घेत! बायकांची गोष्ट निराळी आणि पुरुषांची निराळी असें म्हणतां! खरें आहे. मी चाललों बापडा घराबाहेर. कोठेंही हमाली करून पोट भरीन. तुम्हांला तोंड दाखवूं नको म्हणतां! कबूल आहे. मी तुमचा मुलगा शोभतच नाहीं; मग तोंड कसें दाखवूं! बाबा, आईला तरी सुख द्या. का मी नेऊं तिला बरोबर! तिचें पोट मला भारी नाहीं वाटणार. तिने नाहीं का माझें ओझें वाहिलें! मग मला तिचा भार कसा वाटेल! कोठेंही मीठभाकरी खात सुखानें राहूं. दगडू, तूं नको येऊंस बरोबर. बाबांना जपायला येथें कोणीच नको का! त्यांच्या

तुरुंग्यातल्याण्यांत तुझ्या हातचें त्यांना चालेल. तुझे कपडे मात्र घेतों. काय म्हणतोस ! मी तालेवाराचा मुलगा, मला कशाला तुझे कपडे पाहिजेत ! गड्या, माझें आतां कोण राहिलें आहे तूच सांग. बाबांनी माझ्या अंगावरून आपली सावली काढून घेतली. तूं आणि आई जर माझें अंग झाकणार नाहीं तर त्याला थंडीचे आणि उन्हाचे चटके नाहींत का बसणार ! आई, ही चौघडी मला पुरे आहे आणखी शाल ती कशाला पाहिजे ! हमालाच्या जवळ अशी श्रीमती थाटाची शाल पाहून लोकांना संशय नाहीं का येणार ! आणि ती शाल चोरीची म्हणून मला फरासखान्यांत पकडून नेलें तर ? तिथे तू थोडीच येणार आहेस मला सोडवायला ! चौघडीनें थंडी कशी राहील म्हणतेस ? कां नये राहूं ! तिला मायेची ऊब आहे ना ! आई, मला आता जगांत मायेवांचून सगळ्या तऱ्हेची ऊब मिळेल. मला खायलाप्यायला कोण घालील म्हणतेस ! आई, तो किड्यामुंग्यांनासुद्धां न विसरणारा जगाचा धनी वर बसला आहेना ! तो मला पोटाला चार घांसही नाहीं देणार !"

"मल्हारीबाबा, मी ब्राह्मण आहे ना ? मग कशी तुमची भाकरी खाऊ ? लोक वाळींत टाकतील ना ! काय म्हणतां ! तुला बापानेच हांकून दिलें, आता तुला जातीशीं काय करायचें आहे म्हणून ! खरें आहे तुमचें म्हणणें. आणा ती भाकरी इकडे. इतक्या प्रेमानें देणारा तरी कोण भेटतो ! आई, तूं आहेस धर्मभोळी; तू नाहीं ना मला वाळींत टाकणार ? छेः, छेः ! भीच तुझा देव आणि धर्म असें तूंच नाहीं का नेहमी म्हणत आलीस ! मी तरी आतां कुणबी होऊनच रहाणार आहे ना ! मग माझ्या हातची भाकरी तुला का नाहीं चालणार ! तुझ्या म्हातारपणीं माझ्याच हातची भाकरी नाहीं का तुला खावी लागणार ! मी कुणबीच काय, पण महारही झालों तरी तुझ्या दृष्टीनें पवित्रच राहीन. काय म्हणतेस? मी महार कुठून होणार म्हणून ! आई, या नेमानेमाच्या गोष्टी आहेत. ब्राह्मणाचा कुणबी होईन असें तरी कुणाला वाटलें होतें ! मग कुणब्याचा महार झालों तर त्यांत काय आश्चर्य आहे ! स्वर्गीची गंगासुद्धां नाहीं का खाली पडतां पडतां पाताळांत गडप झाली ! मग मी तर 'कोटस्थ कीटायते'."

"ब्राह्मण विद्यार्थी म्हणून माझें ज्ञान अपुरें ठरलें. पण तेवढ्याच ज्ञानाच्या जोरावर माझी शूद्र शिक्षक म्हणून चहा होत आहे. आई, माझें विद्यार्थिदशेतील आयुष्य कितीही लाजिरवाणे असलें तरी तुझ्या मायेच्या बळावर त्यांत मला इतरांच्या मानाच्या जागेपेक्षांसुद्धां भूषण वाटे. खरें सुख विद्येंत नाहीं, पैशांत नाहीं, मानसन्मानांत नाहीं, तर केवळ प्रेमांतच आहे. आई, हे निष्प्रेम आयुष्य मीं कसें कढूं!"

"बाळ, तुझी माझी कालचीच तर ओळख; आणि माझ्याकडे येण्याला तुझी केवढी तरी ही उतावळी! बाई, त्याला खुशाल द्या माझ्या कडेवर. तुम्हीच पहाल माझ्याजवळ तो कसा स्वस्थ रहातो तो. मुकीं जनावरें काय आणि मुलें काय, सारींच माझ्यावर असें प्रेम करितात; आणि मला त्याचा अभिमान पण वाटतो. मोठ्या माणसांच्यापेक्षां मुलांचें प्रेम आणि विश्वास मजवर जडण्यातच मला भूषण वाटते. त्यांना अतः-करणाची खरी पारख असते. त्यांच्यासारखें निर्मल अंतःकरण दिसलें म्हणजे नदीला जाऊन मिळणाऱ्या ओढ्याप्रमाणें तीं त्याकडे ओढ घेतात; आणि कावेबाज माणसाकडे तीं ढुंकूनही पहात नाहीत. भीड किंवा खुशामत त्यांच्या ध्यानींमनींही नसते. पाहिलेत माझ्याजवळ लबाड कसा स्वस्थ बसला आहे तें! बाळा, देव करो आणि तुझी व तुझ्या आईची कधीं ताटातूट न होवो!"

"आई, तूं मला लहानपणीं चांदोबाची ओळख करून दिलीस तेव्हां तुला स्वप्न तरी पडले होतें का, कीं हा चांदोबा पुढें तुझा आणि माझा जासूद होणार आहे! लहानपणीं मी तुझ्यापाशीं चांदोबाचा हट्ट धरून बसें, आणि आतां त्याच्यापाशीं तुझा हट्ट धरून बसतों. तो प्रकाशाचा एक झोत तुजवर आणि एक मजवर पाडितो. या झोतांचा मला शिडी-सारखा उपयोग करून घेतां आला असता तर किती चांगले झालें असतें! ताबडतोब तुझ्या पायांशीं येऊन पडलों असतो."

"या जाहिरातीचे शब्द दर आठवड्यास तेच तेच दिसून येतात. पण त्यांचा मला कधीं कंटाळा आला आहे का? उलट मी वर्तमानपत्राच्या अंकाची दोन दोन तीन तीन दिवसांपासून वाट पहात असतों. जसे कांहीं त्यांत नवीन मजकूरच येणार आहे! आठवड्याचे पहिले चार दिव

हातीं आलेल्या अंकाकडे अधाशीपणानें पहात बसण्यांत आणि उरलेले तीन दिवस नवीन अंकाची तितक्याच आसोशीनें वाट पहाण्यांत जातात, म्हणून तर मला जिवाचा कंटाळा येत नाहीं. सारखेपणाचा कंटाळा येत नाहीं असा प्रेमाच्याच बाबतींत. खरें पाहिलें तर तो सारखेपणाच नाहीं. आईच्या प्रेमाची चिकाटी दर आठवड्याला वाढतच चाललेली पाहून त्या प्रेमाचें अधिकाधिक अमर्याद व गाढ स्वरूप प्रत्ययाला येतें. आई, तुझी माझ्या परत येण्याबद्दलची आशा संपणार तरी केव्हां! पण मी किती तरी वेडा! जेथें प्रेमाला अंत नाहीं तेथें आशेलाही नसायचाच."

"चिमणाताई, तू मला पुन्हां भेटलीस, आणि माझें घड्याळही मला परत केलेंस. माझ्या आईचीही अशीच भेट करून देशील का! तें तुला फारसें अवघड जाणार नाहीं. तू येथें आली असून तुम्हां सर्वांची तिला भेटण्याची इच्छा आहे असें गोपाळरावांकडून तिला पत्र घातलें म्हणजे झालें. पण ती कसची येते! ती माझ्या वाटेकडे डोळे लावून बसली असेल. आई, तुला काय माहीत कीं तूं येथें आलीस तरच तुझी मार्गप्रतीक्षा फलद्रूप होणार! पण तूं एकदां येथें आलीस म्हणजे थोडीच परत जाणार आहेस! आणि तू गेली नाहींस म्हणजे बाबा तुला नेण्याकरितां येथे येतील. आणि मग मला हे काळे तोंड घेऊन दुसरीकडे जावें लागणार! आई, इकडे येऊच नकोस तूं! माझ्या परत येण्याच्या आशेचे सुख तुला आहे तेंच पुष्कळ आहे. त्यावर तुला सारा जन्मही काढितां येईल."

"अहो, मी साधु नाहीं म्हणतों ना! मग कां उगीच माझ्या पायां पडतां! मीं आपल्या पापांचा पाढा वाचू! मीं वडिलांच्या आशेची निराशा केली. माझ्या बालमित्राला माझ्यासाठीं जगभर वणवण करायला लाविलें. पण सगळ्यांत मोठें पाप अजून सांगायचें राहिलेंच आहे. मातृ-द्रोहापेक्षां कोणतें पाप मोठें असणार! मीं आपल्या आईला सुख तर दिलेंच नाहीं, उलट तिच्या दुःखाला मात्र कारण झालों. ती माझ्यासाठीं कंठीं प्राण धरून बसली आहे. मग बोला, मी साधु आहें कीं घोर पातकी आहें!"

"हैबतराव, मुळींच वाईट वाटूं देऊं नका. माझ्या अदृष्टांतच हें

होतें; मग तें चुकणार कसें ? तुमचे नुसतें निमित्त झालें. उठा. आधी चिमणाताईच्या नवऱ्याला पत्र टाका. कुलीन स्त्रियांची अब्रू कांचेसारखी असते. एकदां भगली म्हणजे सांधायची नाहीं."

"शाबास, हैबतराव ! तुम्हीं आपल्या चुकीची भरपाई करून पुन्हां माझ्या डोक्यावरच उपकारांचें ओझें करून ठेविलेंत. पण तिच्या नवऱ्याचा राग गेल्याचे लक्षण दिसत नाहीं. पाहिलात आपल्या दोघांकडे कसा डोळे वटारून पहातो आहे तो ! पण त्यांत विशेष असें कांहीं नाहीं. नवऱ्याच्या प्रेमांत विकल्पाचें विरजण पडलें कीं ते कायमचें नासून गेलें म्हणून समजा. दह्याचें पुन्हां दूध झाल्याचे कधीं पाहिलें आहेत का ?"

"गड्यांनो, तुम्ही आम्ही एकाच जन्मभूमीचीं आणि एकाच धर्माचीं लेकरें ना ! मग त्या आईबापांच्या मांडीवर सोवतीनं खेळायचें सोडून असे भांडत काय बसलांत ! हरबा, नाईक, आम्ही वरिष्ठ जाती तुम्हाला हिंदु धर्माच्या मांडीवरून ओढून खिस्ती अगर इस्लामी धर्माच्या मांडीवर दत्तक जायला सांगू का ? छे, छे, ही शंका मनात आणूच नका. उलट इतर धर्मांचा वरचष्मा आम्ही तुमच्याच मदतीनं खची करणार. इतर ठिकाणीं कांहीं असो. आमचें चिमणपुर तरी आजपासून पंढरपुर किंवा जगन्नाथपुरी झाले आहे. मग संकोच कशाकरितां ? खुशाल माझ्या मांडीशीं मांडी भिडवून बसा. माझे सोवळे ओवळे तुम्हाला माहीत आहेच. 'तुम्ही आम्ही भाऊ एका ताटात जेवूं' हे पालुपद विसरू नका. देवळ्यानो, एका ताटांत जेवायला सभेत ठराव का करावे लागतात ! हं, गोपाळराव, मल्हारीबाबा, हरबा, नाईक, या इकडे, आणि माझ्या पंक्तीला सगळेजण बसा पाहूं ! तुमच्या बायका आपणाला वाढतील. बायानो, वाढाल ना ? का पुन्हा माझ्यावर राग धरून बसणार ? हं, आटपा लौकर. आम्ही एका पक्तीस जेवायला बसलो म्हणजे ती जन्मभूमि आणि तो धर्म आम्हांला आनंदाने डोळे भरून पहातील. काय म्हणतां ? तुला जर आई-बापांचे इतकें प्रेम वाटतें तर त्यांना सोडून आलास कसा ? या सवालाला मी काय जबाब देणार ! गड्यांनो, मी एक दुर्दैवी प्राणी आहें हाच त्याचा जबाब. माझे आईबाप मला अंतरले. मला भाऊबहीणही नाहीं. तुम्हीच माझीं भावंडें. तुम्हीं मला दूर करून कसें चालेल ?"

"हायहाय! जीव घाबरा झाला. माझ्या आईला तरी कोणी आणा हो! तिची शेवटची दृष्टभेट तरी होऊ द्या! काय म्हणतां? तुम्हांला आईबापांचा पत्ता पाहिजे? वेडे कुठचे! अरे, मला अपराध्याप्रमाणे छपून जन्म कठायचा आहे हें विसरलांत कसें! माझे वडील हातीं चाबूक घेऊन मला शोधीत आले तर मी महारवड्यांत लपून बसेन; आणि तेथही आले तर मांगवाड्यांत पळून जाईन. त्यांच्याबरोबर आईसुद्धा आली तर काय करीन म्हणून विचारता? हे मीं तुम्हाला सांगितले का पाहिजे? तुम्हांलाही आईबाप आहेत ना? मग झाले तर. मी आईच्या गळ्यांत पडण्याकरितां चाबकाचा मारही सोशीन."

"सारे गांवकरी आले का? नाईक, किती हा उशीर! आणखी एक क्षणभर वेळ लागला असता तर माझे प्राण निघून गेले असते ना! मीं संकल्प सोडण्याचीच ते वाट पहात आहेत. मी कोण संकल्प सोडणार म्हणून विचारतां? आजचे गांवप्रयोजन माझ्याच पदरच्या खर्चानें होत आहे, समजलांत? सहकारी पेढीतील माझी सारी रक्कम मीं त्यापायीं खर्च करण्याला काढून घेतली ना! मला तरी मागें कोण आहे? हो, बरी आठवण झाली. माझ्या आईची चौघडी तिच्याकडे पोंचती करा आणि माझे घड्याळ चिमणाताईकडे परत करा. मला आतां घड्याळाचा काय उपयोग? माझी घटिका भरत आली हे तुम्ही पहातच आहांत."

दोन दिवस झाले, चार दिवस झाले, सहा दिवस झाले, तरी श्यामचा ताप राहीना. त्याच्या बिछान्याभोंवतीं डाक्तर, वैद्य रात्रंदिवस डोळ्यांत तेल घालून पहारा करीत बसले होते, आणि त्यानीं सोडिलेले हुकूम अमलांत आणण्याकरितां भिन्नभिन्न जातींचे शेकडो लोक रोग्याच्या खोलींत व बाहेरील पटांगणांत येरझारा करीत होते; पण तापास उतार पडेना. रोग्याच्या बिछान्याशीं मल्हारीबाबा, हैबती, हरबा, नाईक व ब्राह्मणादि जातींतील इतर कांहीं प्रमुख मडळी चिंताक्रांत मुद्रांनी बसली होती. त्यांमध्यें पूर्वी कितीही वैर असले तरी त्याचा या सर्वसाधारण संकटानें लोप केला होता. श्याम सर्वांचा सारखाच आवडता होता. त्याचें बरेंवाईट झाल्यास सर्वांवर सारखीच आपत्ति कोसळणार होती. जो

एकोपा अनेक सभांनीं किंवा ठरावांनीं घडवून आणिला नाहीं तो श्यामच्या दुखण्यानें घडवून आणिला होता. श्यामचें वास्तव्य लागोपाठ ब्राह्मण, शूद्र व अतिशूद्र या जातींत झालेलें असल्यामुळें त्याच्या जीवित-रूप सूत्राचा तर त्या व त्यांमधील यच्चयावत् जातींशीं एकजीव झालाच होता; पण त्या जातींमध्येंही परस्परांविषयीं पराकाष्ठेचा आपलेपणा उत्पन्न झाला होता. हजारों वर्षें एकमेकांपासून कमी अधिक प्रमाणानें फटकून वागत आलेल्या त्या जाती श्यामच्या गळ्याभोंवतीं सपाट्यानें आंवळत जाणाऱ्या मृत्युपाशांतून त्याची कशी सुटका करावी याचा एक दिलानें विचार करीत बसल्या होत्या. स्वदेशाच्या गळयास लागलेल्या तांतीपासून त्याची मुक्तता करण्याच्या कामीं त्यांचा इतकाच एकोपा दिसून येईल तो सुदिन!

अखेर गांवांतील साऱ्या डॉक्टरांचें व वैद्याचें असें मत पडलें कीं, नाना मराठे या दुखण्यांतून उठणें न उठणें आता सर्वस्वीं ईश्वराधीन असल्यामुळें त्याच्या निकटच्या आप्तास तांतडीनें बोलावून घेणे इष्ट आहे. परंतु त्याचे आप्त कोण याची कोणासही माहिती नव्हती. त्याच्या तोंडांतून भ्रमांत जे शब्द निघाले त्यांवरून त्याला आपले गांव सधन पित्याच्या रागामुळे व आईच्या इच्छेविरुद्ध सोडावें लागले आहे, त्याच्या शोधार्थ त्याचा दगडू नांवाचा बालमित्र देशभर फिरत आहे आणि त्याच्या आईनें एका वर्तमानपत्रांत जाहिरात दिली आहे इतक्या गोष्टी कळल्या. तो प्रथम हरिणपुरच्या स्टेशनावर भेटल्याचें मल्हारीबाबांकडून कळले. पण त्याचें रहाण्याचें गांव हरिणपुरच कीं दुसरें एखादें शेजारचें हें नक्की कळण्याचे कांहींच साधन नव्हते. त्याच्या बरळण्यांत अनेक विषय आले तरी त्या सर्वांचे पर्यवसान आईच्या प्रेमांत होत असे, यावरून उभयतांची परस्परांवरील ममता लोकोत्तर होती हें उघड होत होतें. कांहीं वाक्यांवरून गोपाळरावांशीं व चिमणाताईशीं त्याचा पूर्व परिचय असावासें दिसत होतें. त्यांजकडून अधिक माहिती मिळाल्यास पहावी म्हणून हैबती त्यांजकडे गेला, तों चिमणाताई अत्यवस्थ असून गोपाळराव व राधाबाई काळजीनें वेड्या झाल्या आहेत असें त्यास दिसून आलें. चिमणाताईच्या शारीरिक व मानसिक क्लेशांचें पर्यवसान गर्भपातांत होऊन राधाबाईची धापवाणी

अर्धीमुर्धी खरी ठरली होती. चिमणाताईचा सपाट्यानें शक्तिपात होत होता. तिच्या बिछान्याशीं तिच्या आईबापाबरोबर चिमणरावही खिन्नपणें बसला होता. त्यास त्याच्या बायकोची थोर योग्यता व त्यानें तिच्याशीं केलेल्या वर्तनाचा नीचपणा पूर्णपणे पटला होता असे त्याच्या अनुताप-दर्शक चेहऱ्यावरून दिसत होतें. गोपाळराव येवढे धीराचे पुरुष; पण हैबतीस पहातांच ते भ्रमिष्टाप्रमाणें ओरडून म्हणाले, "हैबतराव, माझी लाडकी चिमणी चालली हो आम्हाला सोडून! माझें सारें सुख मातीला की हो मिळणार!" चिमणाताई शुद्धीवर असून आपलें बोलणें तिला समजत आहे हें कळण्याइतकेंही त्यांना भान नव्हतें. हैबतीनें तिच्या बिछान्या-जवळ जाऊन तिच्या पायावर डोकें टेंकलें व तिच्यापाशीं क्षमेची याचना केली. ती त्याजकडे पाहून किंचित् हसली, व या रीतीने त्यास पूर्ण क्षमा केल्याचें तिनें दर्शविलें. यानंतर हैबती तेथें थांबला नाहीं. तो धावतच परत आला, व त्यानें घडलेलें वर्तमान श्यामच्या भोंवतालच्या मंडळीस सांगितलें. श्यामच्या आजारांत गोपाळराव त्याच्या खोलीकडे मुळींच फिरकले नाहींत याचें कारण चिमणाताईचा आजार हें मंडळीस माहीत होतें; पण तो आजार इतका विकोपाला गेला असेल अशी त्याची कल्पना नव्हती. असो. गोपाळरावांच्या घरीं माहिती मिळण्याची निराशा झाल्यावर सर्वानुमतें श्यामच्या पेटीचें कुलूप फोडण्याचें ठरलें व अमलांतही आलें. पेटींत त्याच्या आईची चौघडी, दगडूस पाठविलेल्या पाकिटाची मुंबईच्या पोस्ट आफिसाची रसीद, 'गरुड'पत्राच्या अंकाचें फाईल व चिमणा-ताईनें परत केलेलें घड्याळ इतक्याच महत्त्वाच्या जिनसा दिसून आल्या. अंकांत नापत्ता झालेल्या मुलाचें नांव 'श्याम' हें दिलें असून घड्याळावर 'श्यामराव बळवंतराव इनामदार' याप्रमाणें वडिलांच्या नांवासह व आड-नांवासह कोरलेलें होतें. रसिदींत दगडूच्या मुक्कामाचें ठिकाण 'हरिणपुर' असें स्पष्टपणें दिलें होतें. याप्रमाणें नाना मराठ्याचें खरें नांव, त्याच्या बापाचें नांव, आडनांव व मूळचें वसतिस्थान कळतांच त्याच्या माता-पितरांस त्याच्या अत्यवस्थ स्थितीचें वर्तमान कळवून शक्य असल्यास बरोबर घेऊन येण्याचें जबाबदारीचें काम हैबतीनें आपल्या शिरावर घेतलें. तो स्टेशनावर जाण्याच्या तयारीनें निघाला तेव्हां श्यामची पुन्हां

भेट होते कीं नाहीं या विचारानें त्याच्या पोटांत मळमळून आलें. परंतु अशा निकडीच्या वेळीं मोहांत गुतल्यास कार्यनाश होईल असा विचार करून त्याने तेथून पाय काढिला.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं श्यामच्या सर्वांगास दरदरून घाम सुटून त्याचा ताप सपाट्याने उतरूं लागला. वैद्यांनीं चिन्ह ठीक नाहीं हें ताडिलें व शेवटचा उपाय म्हणून एक जालीम मात्रा उगाळून त्यास दिली. त्या मात्रेचा रोग्याचें आयुष्य लांबविण्यांत जरी उपयोग झाला नाहीं तरी तिजमुळे त्याला इष्टमित्रांशीं मोकळेपणानें बोलण्याइतकी शक्ति व हुशारी मात्र आली. लवकरच श्यामनें डोळे उघडले, तो त्यास आपणाभोवतां गांवांतील अनेक प्रमुख लोक सचिंत मुद्रांनीं बसलेले दिसले. "गोपाळराव कोठे आहेत!" असे त्याने खोल आवाजांत विचारिलें असतां ते चिमणाताईच्या शुश्रूषेंत आहेत असें त्यास उत्तर मिळालें. श्याम त्याच स्वरात म्हणाला, "मित्रहो, मी आतां फार घटकांचा सोबती नाहीं. माझीं या जगांतील स्थलांतरें व रूपांतरें संपलीं. मी एका फार दूरच्या प्रवासाचें प्रस्थानही ठेविलें आहे. पण अजून माझ्या दोन इच्छा पुऱ्या व्हावयाच्या राहिल्या आहेत. त्या पुऱ्या करण्याची शेवटची भिक्षा मला घालाल का?"

मल्हारीबाबा डोळे पुशीत म्हणाले, "तुमच्या इच्छा आम्हाला तुमच्या आजारांतील बोलण्यावरून कळल्या असून त्या पुऱ्या करण्याची तयारीही आम्हीं केली आहे. समोरील पटांगणाकडे जरा नजर द्या; म्हणजे तेथें गांवांतील सर्व जातींच्या बहुतेक कुटुंबांतील प्रमुख इसम सहभोजनाकरितां तयार होऊन बसलेले दिसतील. त्यांच्या यादवमुलींनी साग्र स्वयंपाक तयार करून ठेविला आहे. तुम्हीं संकल्प सोडायला सांगितला म्हणजे आम्हीही आपापल्या पानांवर बसतों. आम्हांपैकीं फक्त एखादाच इसम तुमच्याजवळ राहील."

श्याम किंचित् हंसून म्हणाला, "मजजवळ कशाला पाहिजे कोणी इसम! माझी कोणी कितीही सेवा केली तरी ती आतां फुकट आहे. त्यापेक्षां तुम्हां साऱ्याजणांना प्रेमानें एकत्र जेवतांना पाहूनच मला अधिक आनंद होईल."

इतक्यांत दार उघडून हैबती आंत आला, व त्याने सुदराबाई आल्याची वर्दी दिली.

श्यामचे तोंड एकदम प्रफुल्लित झालें. तो म्हणाला, "आतां तुम्ही सारे जेवायला गेलांत तरी चालेल. मला जगात आणणारी माउलीच मी जगांतून जातांना माझे मरण सुखाचे व्हावें म्हणून धावत आली आहे. मी जन्मतांच जिनें मला मांडी दिली तिच्याच मांडीवर मला मरण आलें पाहिजे."

श्यामच्या इच्छेला मान देऊन सर्व मंडळी खोलीतून निघून जेवायास गेली. इतक्यांत जिच्या केसाच्या अंबाड्या झाल्या आहेत, घाईनें चालण्यामुळे जिला दम लागला आहे आणि जिचे सर्वांग क्षीणतेमुळे व काळजीमुळे थरथर कांपत आहे अशी सुदराबाई दगडूच्या हातावर टेंकत खोलींत आली. "कुठे आहे माझा बाळ?" असें तिनें विचारतांच हैबतीनें श्यामकडे बोट दाखविलें. पण त्याकडे पाहून ती "हा विद्रूप थेरडा नाहीं माझा बाळ! चल दगडू; आपण येथे येऊन फसलो." असें म्हणत परत जायाला निघाली. इतक्यांत "आई, तूही नाहीं ना मला ओळखिलेस?" हे वाक्य कानांवर येताच ती मधेंच थबकली, एकदां खोलींत घाईघाईनें पण बारकाईनें पाहून आणि आपण, दगडू, हैबती व दुखणाईत याशिवाय तेथें कोणीही नाहीं अशी खात्री करून घेऊन तांतडीनें अंथरुणाजवळ गेली आणि त्यावर बसून श्यामच्या अंगावरून प्रेमानें हात फिरवूं लागली. "बाळा, कायरे तुझी दशा झाली ही!"

श्याम तिच्या अंगाला चिकटून म्हणाला, "आई, माझें तोंड पाहून भ्यालीस होय! ठीकच आहे. हे तोंडावरील डाग, हे पांढरे केस आणि ही दाढी पाहून कोणीही घाबरायचा. मग तूं घाबरलीस तर काय नवल!"

"नाहीं बरं बाळ; मी तुला कशी घाबरेन? इतके दिवस तुझ्या भेटीच्या आशेवर काढिले ते तुला पाहून घाबरायला होय! नाहीं बाळ, मला तुझ्यांत कांहींच फरक दिसत नाहीं. हे डाग तुझ्या तोंडाला वाईट दिसतात असें कोण म्हणतें ते पाहूं दे. माझ्या बाळाचें चंद्रासारखें सुंदर तोंड तें! डागांनीं कधींच विशोभित दिसणार नाहीं. केसांबद्दल म्हणशील तर ते पांढरे कां झाले हें मला ठाऊक आहे. माझे केस नव्हते

का चांगले काळे ! पण तुझ्या काळजीमुळे त्यांच्या सफेत अंबाड्या झाल्याच कीं नाहीं ! तुझेही केंस माझ्या काळजीमुळेंच पांढरे झाले असले पाहिजेत."

" आई, बरोबर ओळखलेंस तूं. तुझ्या भेटीच्या काळजीमुळेंच हे एका रात्रींत काळ्यांचे पांढरे झाले."

" मग असे केंस मला नाव्हडते कसे होतील ? "

" आई, तुला खरें सांगितलें तर घाबरणार नाहींस ना ! तुझ्या मनाची तयारी असेल तरच सांगतो."

" मी नाहीं तुझ्या तोंडांतून कांहीं वेडेंविद्रें ऐकणार. मुळींसुद्धां बोलूं नकोस. तूं आतां लौकरच उठशील, आणि मग आपण दोघेही एका जागीं राहूं. मग पहाते कोण आपली ताटातूट करते तें."

" आई, माझें बरेंवाईट होण्याची कल्पनासुद्धा तुला सोसवत नाहीं. मग तें प्रत्यक्ष घडून आलें तर काय करशील ? "

" तसें कधीं होणारच नाहीं. तूं इतक्या नवसासायासानें भेटलास तो काय फिरून मला सोडून जाण्याकरितां ! देव इतका अन्यायी का आहे! तो तुला नेऊं लागला तर मी त्याला अडवीन आणि माझ्या बाळाला परत घेऊन येईन. सावित्रीने नाहीं का सत्यवानाला परत आणिलें ! देवाच्या मनांत तसें काहीं करायचे असतें तर त्यानें आपली भेट तरी कां होऊं दिली असती ! तूं अगदीं भिऊं नकोस. मी जवळ असता तुला कोण नेतें तें मीच पहातें. तुला वांचविण्याकरिता माझी सारी पुण्याई खर्चीं घालीन."

" आई, तूं खरोखरच पुण्यवान् आहेस. नसतीस तर तुझी माझी भेटच झाली नसती. बरें आई, माझी एक इच्छा पुरी करशील ? "

" माझ्या बाळानें सांगायचाच अवकाश; ती पुरी झालीच म्हणून समज. बाळा, तुला लापशी करून आणूं का ! माझ्या हातचें तूं फार दिवसांत खाल्लें नाहींस. माझ्या हातचे तूं किती आवडीनें खात होतास ! त्यानें तुझा आजारसुद्धां हटत असे. आणूं का थोडीशी करून ? "

" आई, तूं साक्षात् अन्नपूर्णा आहेस; आणि या गांवच्या नशिबानें ऐन प्रयोजनाच्या वेळीं आली आहेस. बाहेर मघांपासून गांवकऱ्यांची पंगत

बसली आहे. ती आतां आटपतही आली असेल. अखेरचें कालवण तूं त्यांना आपल्या हातानें वाढशील तर ते तृप्त होतील. त्यांच्या तृप्तींत माझीही आलीच. शिवाय बायकांच्या पंगतीची अव्वलपासून अखेरपर्यंतची व्यवस्था तुलाच पहावी लागेल."

"मी नाहीं तुला सोडून जाणार. तू आहेस घाबरलेला. भलतीच धास्ती घेऊन बसलेला आहेस. मी गेलें आणि त्या धास्तीनें तुझ्या जिवाचें भलतेंच कांहीं झाले तर ?"

"तूं परत येईपर्यंत माझें कांहीं वाईट होणार नाही असे मी तुला वचन देतों. मग तर झाले ?"

"माझा बाळ सत्यवचनी आहे. तो कधीं खोटें बोलणार नाहीं. मग तुझ्या भरंवशावर जाऊंच तर !"

"खुशाल जा. तूं परत आल्यावर तुझ्या मांडीवर डोकें टेकीन, आणि मग ईश्वराची इच्छा असेल तसे होईल."

"हे पहा, तूं पुन्हा अभद्र बोलूं लागलास !"

"बरें, नाहीं बोलत. हो, पण तुला सांगायचें विसरलोंच. आई, मी आज जे गावप्रयोजन दिले आहे त्याला कोण कोण आले असतील असा तुझा समज आहे ?"

"कोणी येवो; केवढी जरी मोठी पंगत असली तरी तिला वाढण्याची माझ्या अंगांत हिंमत आहे. बाळा, माझें अंग मेहनतीचें आहे. तशांतून ही मेहनत माझ्या लाडक्याच्या शब्दाकरितां करायची आहे. मी मुळींच अंगचोरपणा करणार नाहीं."

"भलतेंच एखादें ! आई, मीं त्या अर्थानें नाहीं तुला म्हटलें. पंगतींत किती जाती बसल्या आहेत असे तुला वाटते ?"

"पुष्कळ पंगती वाढायच्या इतकेंच ना ? कांहीं काळजी करूं नकोस. निभावून नेईन सगळें."

"नाहीं नाहीं. तसेंही नाहीं.. प्रत्येक पंगतींत ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, चांभार, महार, मांग झाडून साऱ्या जातींचे लोक बसले आहेत; आणि त्या साऱ्या जातींच्या बायका बरोबरीनेंच स्वैंपाक करून वाढीत आहेत."

" हें कायरे असें ! अगदींच ताळतंत्र सोडिलास कीं ! आणि श्यल्या ब्राह्मणांच्या बायकासुद्धां बाटग्या झाल्या कीं काय ? अरे देवा ! "

" आई, मीं आपली इच्छा दर्शविली, आणि त्या तावडतोब तयार झाल्या. पण माझा तुला आग्रह नाहीं. तूं थकून भागून आली आहेस. तेव्हां तूं वाढायचे श्रम घेऊं नयेस हेंच वरें. आपण येथेंच बोलत बसूं. तेवढ्या अवकाशात तुझेंहि फराळाचें तयार होईल."

" श्याम, काय म्हणतोस हें ! या साऱ्या परक्या बायका तुझा शब्द झेलायला तयार असता मी तुझी सख्खी आई तो खालीं पडूं देऊं ! मी कंबर कसून त्यांच्या बरोबरीनें वाढीन; मग तर झालें ? ज्या बायांनीं तुझी मर्जी राखण्याकरितां आपला धर्म बाजूला ठेविला त्या मला माझ्या मुलीं-सारख्या आहेत. त्यांचा का विटाळ मी मानीन ? बाळा, मी तरी तुझ्या-सारखीच बाटगी आहे हो ! या दगडूलाच विचार त्याच्या हातचें पाणी घ्यायला मीं कधीं तरी अनमान केला कीं काय तें ! "

" आई, तुझ्या प्रेमाची सर कोणालाही येणार नाहीं. जन्मोजन्मीं देवानें तुझ्याच पोटीं घालावें येवढीच माझी इच्छा आहे."

" हं, पुन्हां बहकलास ! अशानें मी नाहीं पगतींत वाढायला जाणार."

" आई, हा पहा मी गप्प बसलों."

" चल बाबा, दाखीव मला तुमचें ते स्वैंपाकघर." असें हँसतीस म्हणून सुंदराबाई त्याच्यामागून बाहेर गेली.

हा वेळपर्यंत दगडू गुडघ्यांमध्यें मान घालून आपले हुंदके दाबीत बसला होता. सुंदराबाई बाहेर निघून जातांच त्याचा हुंदका बाहेर फुटून निघाला. तो रडत रडत म्हणाला, "श्यामराव, मीं तुमच्या शोधार्थ केवढ्या तरी आशेनें सगळें त्रिभुवन धुंडाळलें ! आणि त्याचा शेवट असा व्हावा ना ! "

:" दगडू, आई प्रेमामुळें अंधळी झाली आहे. तिला माझी खरी स्थिति कळत नाहीं. तुझेंही प्रेम मजवर तसेंच आहे. पण तूं पुरुष आहेस आणि शिकलेला पण आहेस. तेव्हां मी थोड्याच घटकांचा सोबती आहें हें तुला सांगायला नको. म्हणून आपलें दुःख आंवरून मी शेवटचे चार शब्द सांगतों ते शांतपणें ऐकून घे. आपल्यामधील जातिभेद मोडल्या-

शिवाय हिंदुस्थानाला चांगले दिवस येणार नाहींत असे त्यांचे मत असून त्यांनी आपल्या लेखांनी आणि भाषणांनी त्याचे उत्तम रीतीने मंडन केलें आहे. माझ्या अंगीं तेवढी विद्वत्ता नाहीं. तथापि मीं येथें आल्यापासून त्यांची शिकवण मनांत बाळगून त्या दिशेनें प्रयत्न केला; आणि त्याला किती यश आले हें आजच्या गांवप्रयोजनावरून तुला दिसूनच येईल. या कामीं माझ्या आयुष्यातील शेवटचीं वर्षे मला खर्च करितां आलीं, इतकेंच नाहीं तर मला मरणही त्या कामीं झगडण्यामुळेच येत आहे हें पाहून मला मरतांनाही समाधान वाटत आहे. चिमणपुरच्या निरनिराळ्या जातींत जितकें ऐक्य मला जिवतपणीं घडवून आणिता आले नाहीं तितके माझ्या मरणामुळें घडून येणार आहे. जे कार्य चिमणपुरास झाले ते इतर गांवींही झाले पाहिजे. आपल्या हरिणपुरांत या कामाला तू सुरवात केली पाहिजेस. मला येथें गोपाळरावाची मदत मिळाली, तेथें तुला बाबाची मिळेल. बायकामध्ये उदार मतांचा प्रसार करण्याच्या कामी मला येथे चिमणाताई-ची मदत झाली; तुला तेथें आईची होण्यासारखी आहे. ते काम केवळ माझें म्हणूनच ती माउली आपल्या अंगावर घेऊन आपलेपणानें तडीस नेईल. आजपर्यंत उराशीं धरून ठेविलेल्या साऱ्या मतांचा आज तिने माझ्याकरिता किती तत्परतेनें होम केला हे तू यथार्थ पाहिलेस ना? चिमणाताईनें येथल्याप्रमाणें आपल्या सासरच्या गांवींसुद्धां या कार्याचा प्रसार केला असता. तिचा नवरा परवाच्या प्रसंगानें बराच निवळला आहे. पण त्या प्रसंगीं मला तिची जी चर्या दिसली तिजवरून ती फार दिवस वांचेल असें वाटत नाहीं. असो म्हणा. ईश्वराची मर्जी." इतकें बोलून त्यानें एक दीर्घ सुस्कारा सोडिला. तो पुन्हां दगडूस म्हणाला, "मग काय ठरतें तुझें? माझी इच्छा पार पाडायची ना?"

दगडू म्हणाला, "श्यामराव, मीं यापूर्वीच होकार द्यायचा; पण गहिंवरून आल्यामुळें माझ्या तोंडावाटे शब्दच उमटेना. मीं तरी काय करूं? मला क्षमा करा."

"इतर मंडळी येथें येण्यापूर्वी मला तुझ्यापाशीं बाबांना सांगण्या-करितां एक निरोप द्यायचा आहे. त्यांना म्हणावे, माझें मुखावलोकन न करण्याची आपली प्रतिज्ञा पार पाडण्याच्या कामीं मीं आपणांला

साहाय्य केलें आहे. समाजसुधारणेचें आपलें व्रतही मीं यथाशक्ति पार पाडिलें आहे. बुद्धिमत्ता नसल्यामुळें मला अचाट कामें अंगावर घेतां आलीं नाहीत. पण शुद्ध अंतःकरण व निर्मल शील यांनीं जें जे साध्य होतें ते तें करण्याच्या कामी मीं मुळींच कसूर केली नाहीं. आपले आणि आपल्या कुळाचे नांव मीं जगांत गाजविले नसेल. पण त्याला डाग लावण्यासारखें नीच कृत्यही माझ्या हातून झालेले नाहीं. जर एखादे वाईट काम गैरसमजाने माझ्या हातून झालें तर त्याचा उपसर्ग आपणांला किंवा कुळाला पोहोचूं नये म्हणून मी येथील दिवस अज्ञातवासातच काढिले. या साऱ्या गोष्टी लक्ष्यात आणून जर माझ्या बाळपणीं घडलेल्या दोषांची क्षमा करणे आपणांला योग्य वाटले तर आपण ती अवश्य करावी अशी मी मरणाच्या दारीं बसलों असतांना पदर पसरून विनंति केली, असे त्यांना कळीव. कळविशील ना ?"

" तुमची आज्ञाच होते म्हणून कळवीन. नाहीं तर हे काळें तोंड नानासाहेबांना दाखविण्यापेक्षां मीं मरण पत्करिले असतें."

इतक्यात मंडळीची जेवणे आटपून ती खोलींत परत आली. श्यामचा आवाज आतां सपाट्यानें खोल जात चालला होता. तो मंडळीस म्हणाला, "मित्रांनो, माझी वाचा बसण्यापूर्वी माझी आणखीही एक अखेरची इच्छा मला तुम्हांला सांगितली पाहिजे. आजच्या सहभोजनाचें स्मरण जोंपर्यंत तुमच्या चित्तात राहील तोंपर्यंत माझें स्मरण तुम्हांला होत राहील यांत मला संशय वाटत नाहीं. तुम्ही सर्वांनीं सहकार्य करून आज हे प्रयोजन पार पाडिलें यामुळें तुम्हांमध्यें एक नवीन बंधन निर्माण झाले आहे. पण ते दुसऱ्या एका बंधनानें दृढ व्हावें अशी माझी इच्छा आहे. कराल का ती पूर्ण ?"

रुद्ध कंठांमुळे तोंडांतून शब्द काढण्याला असमर्थ होऊन मंडळींनीं आपली संमति माना हलवूनच दर्शविली. श्याम पुढें बोलूं लागला:—

" मी मरण पावल्यानंतर माझें कलेवर एकाच जातीच्या इसमांनीं न नेतां चार भिन्न जातींच्या लोकांनीं वाहून न्यावें; म्हणजे माझा आत्मा वरून त्याकडे पहातांना हें चातुर्वर्ण्याचेंच प्रेत दहन होण्याला चाललें आहे असें समजून समाधान मानील."

हे शब्द अत्यंत क्षीण व खोल आवाजात जरी उच्चारिले होते तरी श्रोत्यापैकी प्रत्येकाचे त्याकडे एकाग्र अवधान असल्यामुळे त्यातील प्रत्येक शब्द त्यांस स्पष्टपणे ऐकू गेला. त्यापुढे मात्र त्यांना धीर निघेना. ते मुक्त कंठाने मोठमोठ्याने रडू लागले. ते पाहून श्यामने त्यास उगे रहाण्याची खूण केली व म्हटले, "गड्यांनो, मला मरणाच्या वेळी शांतिसमाधानाची फार जरूर आहे. तुम्हीच जर असे दुःख करू लागाल तर मला शांति कुठून मिळणार? मला स्वतःला मरणाचे वाईट वाटत नाही; मग तुम्हीच कां वाटून घेता? माझ्या मरणाला जातिभेद कारण होत आहे याची तुम्हाला नेहमी आठवण राहून तुम्ही त्याचा मनापासून तिटकारा कराल या विचारापासून मला अत्यंत समाधान वाटत आहे. तुम्हालाही तसेंच वाटले पाहिजे. तर कृपा करा आणि हा शोक आवरा. माझी आई लौकरच येथे येईल. मी मृत्यूच्या किती जवळ येऊन ठपलो आहे याची बिचारीला कल्पना नाही. तुमचा आक्रोश ऐकून ती वेडीच होईल. ती येण्यापूर्वी मला माझे प्रतवाहकर्ही नेमिले पाहिजेत. कारण तुम्हां सर्वांचेच माझ्यावर इतके निःसीम प्रेम आहे की मी ती नेमणूक आतांच केली नाही तर माझ्यामागे तुम्हांत त्याबद्दल प्रेमाची भांडणे होतील; आणि ती मिटवायला कोणता श्याम, नाना मराठे अगर मौनी बुवा येणार आहे? माझ्या पश्चात् शाळेची व ऐक्यवर्धक संस्थेची व्यवस्था मी या ब्राह्मण गृहस्थाकडे (येथे त्याने समोरच्या ब्राह्मण तरुणाकडे बोट दाखविले.) सोंपविली आहे हे तुम्हाला माहीत आहेच. हे गृहस्थ, हैबतराव, हरबा व नाईक यानी मला खांदा द्यावा अशी माझी इच्छा आहे."

इतक्यात बायकांची जेवणं उरकून सुंदराबाई परत आली. तिने येताना एका वाटींत साबूदाण्याची लापशी आणिली होती. ती श्याम-जवळ जाऊन ममतेने म्हणाली, "बाळ, घेतोसना ही लापशी! ही मीं आपल्याच हातानें केली आहे."

श्याम मोठ्या कष्टाने म्हणाला, "आई, मला मांडी देतेस ना?"

सुंदराबाई म्हणाली, "मांडीवर डोके घेऊन मरणू होय! तसे का होईना." तिने त्याचे डोके मांडीवर घेतले, व ते एकवार प्रेमाने कुर-वाळून ती त्याच्या तोंडात पळीभर लापशी ओतावयास लागते तोच

त्याच्या ओंठांतून 'राम' हा शब्द निघून ते ओंठ मिटले ते कायमचेच. सारा कारभार आटपला होता!

सुंदराबाईने श्यामला पुष्कळ हाका मारिल्या; तरीही तो ओंठ उघडीत नाहीं हे पाहून ती दगडूला म्हणाली, "दगडू, बाळाला झोंप लागली कारे? असे एकदम ओंठ कशाने मिटले?" दगडू रडें दाबीत म्हणाला, "होय, आईसाहेब. झोंपच ही. नेहमीच्या झोंपे-पेक्षां जरा गाढ आहे इतकेंच."

"झोंप लागणार नाहीं तर काय होईल? बाळाला असें माझ्या मांडीवर पडायला किती वर्षे तरी मिळाले नाहीं. बाळा, थांब अं, मी तुझ्या आवडीचा पाळणा म्हणतें." असें म्हणून ती वत्सल माता ताडानें गाणें गुणगुणूं लागली. ते म्हणताना ती श्यामच्या डोक्यावरून हात फिरवीत होती.

अर्धा तास झाला, तास झाला, दोन तास झाले, तरी श्यामच्या महा-निद्रेंत त्याजवर दक्षतेनें पहारा करणारी सुंदराबाई त्यास खालीं ठेवीना. इतक्यात हैबती पुढे झाला आणि म्हणाला, "बाईसाहेब. आता आपणाला मोह आवरून धरिला पाहिजे. श्यामरावांनीं मघाशींच आम्हाला त्याना येथून घेऊन जायला सांगितले आहे. तें काम आता आम्हांला केले पाहिजे. कृपा करून त्याचे डोकें खालीं ठेवा."

सुंदराबाई म्हणाली, "त्याची तशी इच्छा होती म्हणता! मग मी त्याला घेऊन जायला तुम्हाला आडकाठी आणीत नाहीं. पण तो जेथं जाईल तेथे मलाही आलेच पाहिजे. तिने मुकाट्यानं श्यामचे डोकें खालीं ठेविलें.

श्यामने शववाहनाच्या कामीं नियोजित केलेले चौघे इसम शवाचे हातपाय व डोकें धरून त्यास बाहेर तयार असलेल्या तिरडीवर ठेवण्या-करिता घेऊन जाऊं लागले. तें पाहून सुंदराबाई ओरडून म्हणाली, "नका हो बाळाचे असे हाल करूं! ही का नेण्याची रीत झाली! थांबा, मी त्याचें डोकें धरितें." इतके बोलून ती पुढे होते तोंच तिला दगडूनें मागें ओढिलें. त्यास ती आर्जवाने म्हणाली, "दगडू, ते एक परके असले म्हणून तूं तर नाहींस ना! तुला कसे बाळाचे हाल पहा-वतात! मला जाऊं दे ना त्याच्याबरोबर!" शव तिरडीवर करकंचून

बांधिले जात असतां ती ओरडू लागली, "अरे मेल्यांनो, कां रे त्याला विनाकारण छळता? अजून दोन घटकाही झाल्या नसतील तुम्हीं त्याचें अन्न खाऊन; आणि इतक्यातच असे निमकहराम झालात! इतकेंही इमान तुमच्यापाशीं नाहीं ना? निदान माझ्यावर दया करून तरी त्याला दोरखंडानीं असे घट्ट आवळून बांधू नका. त्या हातापायांना मीं या हातांनीं चोळलेंमाखलें, ते त्यांची अशी दशा करण्याकरिता का? दगडू. सोड मला." दगडू आपलें सारें बळ एकवटून तिला मागें खेचीत होता, व ती त्याला हिसडे देत शवाकडे धांव घेत होती. इतक्यात शववाहकांनीं प्रेत खांद्या-वर घेतलें, व ते दोन पावलें जातात न जातात तोंच त्यांस मागें एक भेसूर हास्याचा ध्वनि ऐकू आला. चौघेही थरारून एकदम थबकले, तो मुदराबाई हातवारे करीत त्यास संबोधून म्हणत होती, "न्या बापडे माझ्या बाळाला. तो पुन्हा माझ्या भेटीला येईलच येईल. त्याची माझ्यावर मायाच तशी आहे. तो परत आला म्हणजे मी दोरखंडाच्या करकोचाना तेल लावून शेकून काढीन. त्या करकोचाचा मागमसही नाहीं ठेवणार. मग कसें कराल?" इतकें बडबडून ती पुन्हा मोठ्यानें हसली. तें भयंकर दृश्य पाहून प्रेतयात्रेबरोबर जाणाऱ्या हजारों लोकांचा थरकाप झाला. पण "या बिचारीच्या दुःखाला वेड व मृत्यु हे दोनच उपाय असावयाचे; आणि त्यांपैकीं एक दयाळू परमेश्वरानें पाठवून दिला ही त्याची कृपाच आहे." असें एकमेकांचें समाधान करीत ते स्मशानयात्रेबरोबर निघून गेले.

ते स्मशानांत जाऊन पोंहोचतात तों दुसऱ्या बाजूनें दुसरी एक प्रेतयात्रा तेथें येऊन पोंहोचली. तिजबरोबरचें शव चिमणाताईचें होतें. पुढें दुःखाच्या भाराखालीं वांकलेल्या गोपाळरावांस हाताचा टेंका देत चिमण-राव उभे होते. बायकोबद्दल लोकांनीं आदर दर्शविल्यास तें चिमण-रावास आवडत नाहीं असा चिमणपुत्राचा समज झाल्यामुळें या प्रेतयात्रेबरोबर दहाविसांपेक्षां अधिक इसम नव्हते. ती मागें सासरीं जाण्यास निघाली असतां तिला निरोप देण्याकरितां जितके लोक स्टेशन-वर जमले होते त्याच्या अष्टांशानेही तिच्या परलोकच्या प्रवासयात्रेबरोबर नव्हते. तथापि तिचें शव जमिनीवर ठेवतांच जमलेल्या जनसमूहांतून दुःखाचा एकच प्रचंड ध्वनि निघाला. मृतांनीं ज्या समाजांत मनोभावें खपून

चैतन्य व प्रेम ओतिले होते त्या समाजासमोर त्यांचे अचेतन देह समोरासमोर पडलेले पाहून त्यास साहजिकच शोकाचा अनिवार उमाळा आला, आणि त्यांतील प्रत्येक व्यक्ति आपापल्या स्वभावधर्माप्रमाणे दुःख व्यक्त करू लागली. श्यामच्या स्मशानयात्रेत शेकडो स्त्रिया होत्या. त्यांपैकीं अनेक स्त्रियानीं आपापली अपत्यें बरोबर आणिली होतीं, व त्या त्यांना "देवबाप्पाच्या घरी गेला." असे म्हणत त्याचा आवडता नाना व चिमणाताई बोटानीं दाखवीत होत्या. त्या बिचाऱ्या अर्भकांना समोरील दृश्याचा कांहींच अर्थ कळत नसल्यामुळे तीं 'देवबाप्पा आमच्या लाडक्या नानाला आणि चिमणाताईला नेण्याऐवजीं स्वतःच कां नाहीं आमच्यामध्यें येऊन रहात !' हे अतर्क्य कोडे सोडविण्यात निमग्न होऊन गेलीं.

शवास स्वजनांकडून अग्नि लावण्यात येताच दोन्ही चिता एकदम भडकल्या. शवाच्या अंगास लागणारे चटके आपल्याच अंगास बसत आहेत असा प्रेक्षकांना भास होत होता. सर्वभक्षक अग्नीच्या जिव्हा सर्वभक्षक मृत्यूच्या जबड्यांत सापडलेल्या मृतांच्या निर्जीव शरीरास चाटून वर आकाशापर्यंत पोंचत होत्या. तीं शरीरें सजीव अवस्थेत धारण करणाराचे आयुःपथ जसे परस्परापासून जवळ पण अलग चालत आले होते तसे त्याच्या चितांच्या ज्वालाचे मार्गही निकटवर्ती पण समांतर दिशांनीं वरपर्यंत जाऊन भिडत होते. अग्नीची ज्योत पुण्यात्म्यास स्वर्गी पोंचविणारी शिबिका असल्यास यापेक्षा शुद्धतर आत्मे स्वर्गी नेण्याचा योग तिला आजपर्यंत क्वचितच आला असेल.

चिमणपुरचे स्मशान खोलगट जागेत आहे. तेथून गांवांत जाण्याचा जो उंचवटा आहे त्याजवर दोन आकृति उभ्या असलेल्या दिसत होत्या. त्यांपैकीं एक बळवतरावांची असून दुसरी दगडूची होती. सुंदराबाईस हैबतीच्या तोंडून श्यामकडील वृत्त कळलें तेव्हां बळवतराव सरकारी कामाकरितां कचेरीत गेले होते. त्यांजपाशी चिमणपुराला जाण्याची परवानगी मागितल्यास ती त्यांजकडून न मिळतां ते आपल्या जाण्याला अडथळा मात्र करितील असे वाटून सुंदराबाई दगडूबरोबर एकटीच निघून आली होती. तिनें त्यांजकरितां मागे पत्रही ठेविले नव्हतें. बळवतराव सध्याकाळीं घरीं परत आले तेव्हां त्यांस ती निघून गेल्याचें

कळलें. त्यांनीं तावडतोब स्टेशनावर जाऊन शोध केला असतां ती चिमणपुरास गेली असा पत्ता लागला. पुढीलच गाडीनें ते चिमणपुरास निघून आले. त्यांस सारे गांव शून्य झाल्यासारखें दिसले. रस्त्यांत एखादेंच माणूस दिसत होते. तथापि सुंदराबाईच्या मुक्कामाचें ठिकाण शोधून काढण्यास त्यांना वेळ लागला नाहीं. श्यामची खोली त्याच्या चैतन्यहीन देहाप्रमाणेच निस्तेज झाली होती. तिच्या एका अंधाऱ्या कोपऱ्यांत सुंदराबाई व तिजजवळ पहारा करीत असलेला एकनिष्ठ दगडू त्यांस दिसला. सुंदराबाईनें त्यांना ओळखिलें नाहीं. तिच्या हातवाऱ्यांवरून त्यांनीं तिची मानसिक स्थिति ओळखिली. दगडूनें त्यांस घडलेली साद्यंत हकीकत सांगितली. बळवंतरावांच्या डोळ्यात जन्मांत कधींही अश्रु उभे राहिले नव्हते, ते या वेळीं उभे राहिले. त्यांना त्यांची लाजही वाटली नाहीं. श्यामच्या शवाला अग्नि मिळाला नसल्यास त्याचें अखेरचें दर्शन अजून घडण्यासारखें आहे या आशेनें ते सुंदराबाईच्या सोबतीस मल्हारी-बाबांची एक आस स्त्री ठेवून दगडूबरोबर स्मशानाकडे जावयास निघाले. तों उंचवटयावरूनच चितेच्या गगनचुंबी ज्वाला दिसून आल्यामुळें त्यांनीं तेथपर्यंत जाण्याचा विचार सोडून दिला, व ते समोरील भव्य देखाव्याकडे पहात तेथेंच मुकाटयानें उभे राहिले. श्यामच्या अंगीं बुद्धिमत्ता किंवा विद्वत्ता नव्हती तरी त्यानें केवळ प्रेमबलाच्या साहाय्यानें जें कार्य केलें होतें तें प्रचंड बुद्धिमत्तेच्या किंवा अगाध विद्वत्तेच्या जोरावर साधणें कधींच शक्य झालें नसतें. श्यामनें साऱ्या तीन वर्षांत चिमणपुरांतील यच्चयावत् व्यक्तींचीं अंतःकरणें आकर्षून घेतलीं होतीं. त्याचें त्यांजवरील प्रेमाकर्षण इतकें दांडगें होतें कीं, त्याच्या मृत्यूच्या दिवशीं त्याची प्रत्येक आज्ञा समग्र समाजानें एखाद्या अजाण अर्भकाप्रमाणें निमूटपणें मान्य केली होती. त्याचे प्राण वांचवितां आले असते तर त्यांतील प्रत्येक इसमानें त्यांबद्दल आपले प्राण आनंदानें समर्पण केले असते. त्याजविषयींची आपली पूज्यबुद्धि व्यक्त करण्यासाठीं सारा समाज एका व्यक्तीप्रमाणें स्मशानांत गोळा झाला होता. त्याचा आर्तस्वर बळवंतरावास स्पष्टपणें ऐकूं येत होता.

त्या घटकेस बळवंतरावांचा विद्वत्तेचा व कर्तृत्वशक्तीचा सारा अभिमान

गळून गेला. स्मशानांत गेलेले लोक घरीं यावयास परतले तेव्हा तेही श्यामच्या खोलींत परत आले तेथून सुंदराबाईस घेऊन ते दगडूबरोबर गोपाळरावांच्या घरीं गेले. येवढा अभिमानी पुरुष अशा प्रसगीं तरी आपल्या घरीं आपण होऊन कसा चालत आला याचें गोपाळरावांना आश्चर्य वाटलें. हे कदाचित् स्मशानवैराग्य असेल असें त्यांस प्रथम वाटले. पण दोन दिवसांच्या अवकाशांत त्याच्या स्वभावातील क्रांति शाश्वत स्वरूपाची असल्याबद्दल त्यांची खात्री झाली.

बळवतराव पत्नीसह परत हरिणपुरास जावयास निघाले तेव्हा गोपाळ-रावांस बहिणीची अगतिक स्थिति पाहून भडभडून आले. ती चिमण-पुरच्या भूमीवर आपला प्रिय पुत्र व त्याबरोबर आपले चित्तही ठेवून चालली होती. ती आता अगदीं अजाण अर्भकाप्रमाणे सर्वस्वीं परावलंबी बनली होती व माणसाची ओळख विसरून गेली होती. बळवतरावांनी म्हणतांच ती गाडींत मुकाट्याने जाऊन बसली. आमाचा निरोप घेण्याचेही तिला भान नव्हते.

बळवंतराव आपल्या मुलापासून जो धडा शिकले तो ते जन्मभर विसरणार नाहींत असे दिसते. चिमणपुरातल्याप्रमाणे आपल्याही गावी त्यांनीं रात्रीची शाळा व ऐक्यवर्धक समाज या संस्था काढिल्या आहेत, त्या संस्थाकरिता त्यांनी एक प्रशस्त सभा मंदिर उभारिलें असून त्याचें 'श्यामसुदर' हे नाव ठेविलें आहे. मंदिरात शिरल्याबरोबर समोर उच्च स्थानीं यशोदा व गोपालकृष्ण यांच्या सुंदर मूर्ती दिसतात. नवख्या इसमांस जरी त्या इतर सुदर मूर्तींसारख्याच दिसल्या तरी परिचितांस त्यात सुंदराबाईच्या व श्यामच्या चेहऱ्यांचें सादृश्य दिसल्यावांचून रहात नाहीं. एके काळीं अत्यत अप्रिय, पण आतां फार उशिरानें अत्यंत प्रिय झालेल्या त्या अत्यंत निकटच्या आप्ताचें परस्परावरील प्रेम हें मंदिर उभें आहे तोपर्यंत तरी जगापुढें मूर्त स्वरूपांत रहावें हाच हेतु बळवतरावांच्या या योजनेच्या मुळाशीं होता. ते दगडूबरोबर रोज नेमानें त्या मूर्तींचें दर्शन घेत. त्यांचे प्रेम पाहून धन्यता मानण्यास श्याम जिवत नाहीं व सुंदराबाई भानावर नाहीं. हेंच प्रेम तीन वर्षांपूर्वी प्रकट झालें असतें तर त्यानें बळवंतरावाच्याप्रमाणे त्या दोघांच्याही अतःकरणास जीवन

दिलें असते. पण त्याचा आतां काय उपयोग ? बुदसे गई वो हौदसे आती नही !

बळवंतरावाच्या घरासमोरील रस्त्यानें जाणारास वरील सज्जात एक प्रौढ स्त्री स्टेशनच्या वाटेकडे आपली आशाळभूत दृष्टि लावून बसलेली दिसते. मधून मधून ती हातवारे करीत व आपणाशींच हसत खालील-प्रमाणें शब्द पुटपुटत असते.

" माझ्या बाळाला घेऊन जाता तर जा बापडे ! तो माझ्याकडे परत आल्यावांचून रहाणारच नाहीं. बाळ, तू परत येणार ना ? मी अशी दुर्बळ म्हातारी, पण तुझा पत्ता लागताच कशी धावतच तुझ्याकडे आले ! बाळा, तू वचनाचा धड आहेस. मला मांडीवर डोकं घेऊ दिल्याशिवाय प्राण सोडणार नाही हें वचन तूंच दिलेस ना ? मग तें तू पार पाडणार यांत शंकाच नको. बाळा, तू महारमांगावर देखील प्रेम करितोस. मग तुझ्या आईलाच दूर का ढकलशील ? छेः, तें होणेंच नाहीं. ते चौघे यमदूत तुला खेचून नेऊं लागले तेव्हाच मी त्यांना सांगितलें कीं तुम्ही बाळाला कुठं मसणांत जरी घेऊन गेलात तरी तो माझ्याकडे परत आल्यावाचून रहावयाचा नाहीं. चुकलेलें वासरूं गाईकडे परत आल्यावाचून कुठें राहिलें आहे ? बाळा, तुझ्या वाटेकडे डोळे लावून लावून ते दुखायला लागले. ते जाण्यापूर्वी तू आलास म्हणजे तुला एकवार डोळे भरून पाहीन आणि मग ते आनंदानें मिटीन. चल, चल बाळा लौकर ! "



# शुद्धिपत्र

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ४७ | २५ | घेतो. | घेतों. |
| ५३ | २८ | व्रत पर | व्रतःपर |
| ९५ | २५ | स्वच्छदान | स्वच्छंदानें |
| १०४ | १ | गुणाबद्दलही | गुणाबद्दलही |
| १०६ | ७ | पोट जातींमध्यें | पोटजातींमध्ये |
| ११७ | १७ | पुरुषांतल्या | पुरुषांतल्या– |
| १२७ | १८ | त्याच्वी | त्यांची |
| १३५ | १३ | होतें. तिचें | होतें तिचे |
| १४५ | २९ | असही | असेही |
| १४७ | २६ | कुकू | कुंकू |
| १४८ | २३ | असे | असें |
| १८२ | १६ | अभितानेही | आभितानेंही |
| १८८ | २८ | पहातों | पहातो |
| २१० | २९ | झांपटा कितात | झाप टाकितात |
| २११ | २४ | अका | अशा |
| २२५ | ७ | कुटुबाच्या | कुटुंबाचा |
| २३२ | २६ | सर्वा– | सर्वां– |